# साहित्य-संग्रह

## भाग पहिला

लेखक

कै० शिवराम महादेव परांजपे

द्वितीयावृत्ति

१९३७

किंमत १॥ रुपया



कै० प्रो. शिवरामपंत परांजपे

# अनुक्रमणिका

## भाग १ ला

| | | |
|---|---|---|
| १ | मनाची मीमांसा ... ... ... | १ |
| २ | भासाची भवितव्यता ... .. ... | १८ |
| ३ | वेदांतविषयक गोष्ट—कर्म ... ... ... | ३३ |
| ४ | दुसरी एक वेदांतविषयक गोष्ट—माया ... ... | ५४ |
| ५ | विष्णुसहस्रनाम ... ... ... | ६७ |
| ६ | मेघदूतावरून कालिदासाविषयीं ... ... | ८८ |
| ७ | चारुदत्त आणि मृच्छकटिक ... ... ... | १०२ |
| ८ | प्रियदर्शिका, नागानंद हीं नाटकें कोणाचीं ? ... | १४१ |

अभ्यासाच्या तयारीसाठीं अधिकारी प्राध्यापकांनीं लिहिलेलीं

## कॉलेजचीं पुस्तकें

**१ इंटर संस्कृत-गाईड ३८-३९** प्रो. वाटवे, एम्. ए. पाठ्य-पुस्तकांतल्या टीपांच्याशिवाय स्वभाव-रेखाटन वगैरे अनेक प्रकारची माहिती पुरवणारें उत्कृष्ट टीका-पुस्तक किंमत अवघी १० आणे.

**२ इंटर मराठी-गाईड** Second Language मध्यें कमी पडणारे गुण मराठीच्या चांगल्या अभ्यासानेंच भरून निघतील. मराठीच्या नामवंत प्राध्यापकांचे उत्कृष्ट अभिप्राय कि. १२ आणे.

**३ Answers in civics economics** Prof. V. M. Joshi, B. A. (Oxford), M. A. नव्या अभ्यासक्रमापैकीं या विषयाच्या तयारीसाठीं सर्वांत अभ्यास व माहितीपूर्ण पण बाजारांतील कोणत्याहि पुस्तकांपेक्षा स्वस्त असें हें प्रश्नोत्तररूप पुस्तक आहे. किं. १० आणे.

**४ Logic made easy** As. 12

**५ अर्धमागधी व्याकरण** ५ आणे

**६ स्वाक्षऱ्यांचें पुस्तक** आपल्या आवडत्या मोठ्या लोकांच्या व मित्रांच्या सह्यांच्या संग्रहासाठीं उत्कृष्ट बांधणीचें मोहरेदार कागदांचें मूल्यवान पुस्तक; किंमत अवघी ३ आणे.

वरीलपैकीं कोणतीहि २॥ रु. किंमतीचीं हीं पुस्तकें
१७-७-३८ च्या आंत पैसे पाठविल्यास फक्त २ रु.
(ट. ख. ४ आणे निराळा) शिवाय बरोबर सुंदर
फोटोकव्हरची एक 'स्कूल-कॉलेज' डायरी मोफत.

— याशिवाय कोणतेंही पुस्तक वा गाईड पाठवूं —

प्रकाशकः—**पुरुषोत्तम रा. भिडे**, प्रकाशक व पुस्तक विक्रेते,
टिळक रोड, पुणें २. अथवा
सर्व प्रसिद्ध बुकसेलर्स अथवा
**बापट-खाडिलकर** आणि कं., ८४३ सदाशिव, पुणें २.

# साहित्य-संग्रह

## मनाची मीमांसा

कोणतीही गोष्ट एकदम परिपूर्णतेला येत नाहीं, हा जगांतील एक नियमच दिसतो. ठेचा लागून लागून मनुष्य शहाणा होतो, ही म्हण मनुष्याच्या बाबतींत नेहमीं उपयोगांत आणली जाते. आणि हिची व्याप्ति मनुष्याच्यापुरतीच असावी अशी सकृद्दर्शनीं सहज कल्पना होते; परंतु ही स्थिति फक्त मनुष्यालाच लागू नसून एकंदर सृष्टीच्या रचनेमध्यें आणि वाढीमध्येंही हें तत्त्व दृष्टोत्पत्तीस येतें. उत्क्रांतीचें तत्त्व हें हल्लीं जिकडे तिकडे लावण्यांत येतें; आणि हें तत्त्व नवीन शोधून काढण्यांत आलेलें आहे, असें समजलें जातें; परंतु वस्तुस्थिति ह्याच्या अगदीं उलट आहे. उत्क्रांतीचें तत्त्व फार पुरातन आहे; किंबहुना जगाच्या प्रारंभापासूनच या तत्त्वाचा प्रारंभ झालेला आहे, असें म्हटल्यास हरकत नाहीं. जगाचा आद्य उत्पत्तिकर्ता हा एक ओबडधोबड कारागीर आहे. तो पहिल्यानें कांहीं तरी परमाणु एकत्र गोळा करून त्यांची कांहीं तरी एखादी ओबडधोबड आणि वेडीवांकडी वस्तु बनवून टाकतो व पुढें तें ओबडधोबड आणि वेडेंवांकडें भांडें उत्क्रांतीच्या चरकावर धरलें जाऊन तेथें तें चौऱ्यायशीं लक्ष वेळांच्या परिभ्रमणानें गरगर फिरूं लागलें, म्हणजे मग त्या भांड्याला नीटनेटकें आणि चकचकीत असें स्वरूप प्राप्त होऊं लागतें. अर्वाचीन सुधारलेल्या काळांतील एखाद्या कारखान्यामध्यें आपण गेलों, तर तेथेंही वाईटसाईट, घाणेरड्या आणि ओबडधोबड, अशा कच्च्या मालापासून सुरेख, निर्मळ आणि नीटनेटका असा पक्का माल हळूहळू क्रमाक्रमानें उत्क्रांत

होऊन बाहेर पडत असलेला आपण जसा पाहतों, तशीच स्थिति या जगाच्या कारखान्यामध्यें चाललेली असते. अलीकडच्या काळांतील एखाद्या यांत्रिक कारखान्यांतल्याप्रमाणें या जगाच्या कारखान्यामध्येंही मोठमोठे बॉयलर्स आहेत, फ्लायव्हील्स आहेत, कधींही न तुटणारे असे पट्टे आहेत, आणि कधीं न थांबणारीं अशीं असंख्य चक्रें रात्रंदिवस गरगर फिरत आहेत. मात्र ही यंत्रसामग्री स्थूल दृष्टीला भासमान होत नाहीं. तरी पण या कारखान्यांतूनही इतर कारखान्यांप्रमाणेंच तेथील वस्तु नेहमीं गैरसोईच्या स्थितींतून सोईच्या स्थितीमध्यें उत्क्रांत होत असतात. पण ह्या उत्क्रांतीनें पूर्णावस्थेकडे चाललेल्या वस्तु आणि त्यांचीं मूळचीं स्वरूपें ह्यांच्यामध्यें किती तरी जमीन-अस्मानाचें अंतर असतें. मूळची ओबडधोबड वस्तु आणि शेवटची नीटनेटकी उत्क्रांत वस्तु यांना जर एकमेकांच्या समोर उभें केलें, तर त्या एकमेकांना क्वचितच ओळखूं शकतील; आणि आपल्या उभयतांमध्यें समानवंशत्वाचें नातें आहे, असें त्यांना कोणी सांगितलें, तर तें त्यांना खरें सुद्धां वाटणार नाहीं. उदाहरणार्थ, आपण ज्या स्वच्छ आणि सुंदर कागदावर लिहितों आणि ज्यावरून वाचतों, त्या कागदाच्या वंशांतील मूळ पुरुष, किंवा मूळ स्त्रिया, ज्या घाणेरड्या आणि विद्रूप चिंध्या, त्यांना आपल्या वंशांत निर्माण झालेला शेवटचा कुलदीपक कागद पाहून कदाचित् त्यांच्या स्वर्गलोकामध्यें मोठें समाधान वाटेल; पण चिंध्यांसारखे घाणेरडे पदार्थ आपले पूर्वज आहेत, ही गोष्ट कबूल करण्यालाही तो कबूल होईल किंवा नाहीं, याची वानवाच आहे. कागद हा हल्लीं प्रौढ आणि उत्क्रांत स्थितीमध्यें आहे; तो आपल्या मनाशीं म्हणेल कीं, 'मी किती सुंदर आणि किती मूल्यवान् आहे! कवि माझ्यावर काव्यें लिहितात आणि राजे माझ्यावर तहनामे लिहितात! असा जो मी, त्या माझा जन्म या चिंध्यांपासून झाला असेल, ही गोष्ट अगदीं खोटी असली पाहिजे!' तरी पण मूळ चिंध्या आणि परिणाम कागद, ही स्थिति कांहीं खोटी नव्हे. सारांश, हल्लीं ज्या वस्तु ज्या स्थितीमध्यें दिसत आहेत, त्याच स्थितीमध्यें त्या वस्तु मूळपासून आहेत, असें म्हणतां यावयाचें नाहीं.

आणि हीच गोष्ट मनुष्यालाही लागू आहे. मनुष्यप्राणी हल्लीं ज्या स्थितीमध्यें दिसत आहे, त्याच स्थितीमध्यें तो पहिल्यापासून आहे, असें

नाहीं. त्याच्यांत पुष्कळ स्थित्यंतरें झालेलीं आहेत. माकडापासून मनुष्याची उत्पत्ति झालेली आहे, हा उत्क्रांतिशास्त्रांतील शोध सर्वांना माहीतच आहे. उत्क्रांतिशास्त्राची दुर्बीण उलटी लाविल्यानें मनुष्यापासून पाठीमागच्या स्थित्यंतरांत जातां जातां शास्त्रीय शोध माकडाच्या मजलेपर्यंत गेलेले आहेत. परंतु त्याच्याही पाठीमागें माणसाच्या शरीररचनेच्या घटनेमध्यें कांहीं फेरफार झालेले नाहींत, असें मात्र म्हणतां येणार नाहीं. या दृष्टीनें मागें मागें शोध करीत चालल्यास मनुष्याच्या शरीररचनेंतील कित्येक अश्रुतपूर्व चमत्कार आपल्या दृष्टोत्पत्तीस येण्याचा संभव आहे.

हल्लींच्या मनुष्याच्या शरिराचे शास्त्रीय विभाग सांगण्याचें प्रकरण चाललें असतां त्यांत मनुष्याला दहा इंद्रियें आहेत म्हणून सांगण्यांत येतें. त्या दहांपैकीं हस्तपादादिक हीं पांच कर्मेंद्रियें होत; व घ्राण, चक्षु, श्रोत्र, जिव्हा आणि त्वक्, हीं पांच ज्ञानेंद्रियें होत. परंतु एवढ्यानें ज्ञानेंद्रियांची संख्या परिपूर्ण होत नाहीं. 'मनःषष्ठानींद्रियाणि' इत्यादि वचनामध्यें मन हें एक सहावें ज्ञानेंद्रिय असल्याचें सांगितलें आहे. या सहाव्या ज्ञानेंद्रियाच्या-संबंधानें आपण थोडासा विचार करूं.

हें सहावें इंद्रिय जें मन तें हल्लीं कोठें आहे, याच्याबद्दल कोणाला बरोबर पत्ता लागत नाहीं. कारण कीं, त्याच्या जागेसंबंधानें कित्येकांमध्यें मतभेद आहेत. परंतु पूर्वी याच्यासंबंधानें असा संशयात्मक प्रश्न उत्पन्न होत नसे. कारण, पूर्वी एकदां अशी वेळ असावी असें दिसतें कीं, ज्या वेळीं मनुष्याच्या शरिरांतील मन हें सहावें ज्ञानेंद्रिय बाकीच्या पांच ज्ञानेंद्रियांप्रमाणेंच अगदीं वर आणि उघडें असावें. नाक, डोळे, कान हीं जशीं बाहेरून दृश्यमान होणारीं इंद्रियें आहेत, त्याचप्रमाणें मन हेंही पूर्वी एकदां बाहेरून दृश्यमान होणारें इंद्रिय असलें पाहिजे. परंतु पृथ्वीच्या पाठीवरील जड सृष्टीमध्यें ज्याप्रमाणें पुष्कळ उलाढाली झालेल्या असल्याचें भूगर्भशास्त्रवेत्त्यांनीं प्रतिपादिलें आहे, त्याचप्रमाणें शरीररचनेमध्यें या मनाच्या बाबतींतही पुष्कळ फेरफार झालेले असले पाहिजेत. हल्लीं जीं पर्वतांचीं शिखरें आहेत, तीं पूर्वी एकदां मोठमोठ्या गलबतांच्या सफरींच्या सोईचीं बंदरें होतीं, आणि हल्लीं जेथें समुद्रांचे तळ आहेत, तीं मनुष्यांना राहण्यासारखीं मैदानें आणि झाडांना उगवण्यासारखीं अरण्यें होतीं, असले

प्रचंड आणि विलक्षण फेरफार सृष्टीमध्यें झालेले ऐकून मनुष्याचें मन आश्चर्यचकित होतें; परंतु खुद्द त्या मनाच्यासंबंधानें किती फेरफार झालेले आहेत, याची मात्र मनुष्याला क्वचितच कल्पना असेल. कित्येक लोकांची अशी कल्पना आहे कीं, सीलोन म्हणून हल्लीं जें नकाशामध्यें बेट आहे, ती कांहीं पूर्वीची खरी लंका नव्हे. पूर्वी एक निराळी लंका होती, व त्या वेळीं ती पृथ्वीच्या पृष्ठभागावर दृष्टिगोचर होत असे. परंतु तिच्यावर आवरणें पडतां पडतां ती आतां झांकून जाऊन इतकी दिसेनाशी झाली आहे कीं, तिचा आतां कोणालाही पत्ता लागेनासा झाला आहे. आणि मनुष्याच्या मनाचीही बहुतेक अंशीं तशीच स्थिति झालेली आहे. ज्ञानेंद्रियत्व हा सामान्य-धर्म सगळ्या सहाही इंद्रियांमध्यें सारखाच असल्याकारणानें नाक, कान, डोळे, हीं जशीं शरिराच्या बाह्य पृष्ठभागावर उघडपणें दिसणारीं आणि उजळ माथ्यानें वावरणारीं इंद्रियें आहेत, त्याचप्रमाणें पूर्वी मन हेंही होतें. पूर्वी शरिराच्या पृष्ठभागावर मन हें उघडपणें दिसत असे, व तें उघडपणें आपला मननाचा व्यापार चालवीत असे. कोणी एखाद्यानें दुसऱ्या एखाद्याच्या शरिराकडे पाहिलें, तर हें नाक, हे कान, हे डोळे, याप्रमाणें त्याला जशीं हीं ज्ञानेंद्रियें पाहतां येत, त्याचप्रमाणें 'हें मन' म्हणूनही त्याला पाहतां येत असे. आपण जसे हल्लीं डोळे पाहत असलेले पाहतों, किंवा जिव्हा रस चाखीत असलेली पाहतों, त्याप्रमाणें पूर्वी मन हें मनन करीत असलेलें, विचार करीत असलेलें किंवा विकल्प करीत असलेलें प्रत्यक्ष पहावयाला सांपडत असे. व बाकीच्या ज्ञानेंद्रियांप्रमाणें मनाचेही सर्व व्यापार उघड्या बाजारामध्यें उघड उघड रीतीनें आणि उजळ माथ्यानें चालत असत. अंतःकरण हें नांव मनाला मागाहून पडलेलें आहे. पुढें जें स्थित्यंतर त्या मनाला प्राप्त झालें, त्याला अनुलक्षून अंतःकरण हें त्याचं नांव पडलें. परंतु त्याचें पहिलें साधें, सरळ, आणि स्वाभाविक नांव म्हटलें, म्हणजे जें मनन करणारें तें मन हेंच होय. पण कालांतरानें आणि कारणांतरानें लंका जशी भूपृष्ठावरून नाहींशी होत होत समुद्राच्या खालीं कोठें दिसेनाशी झाली, त्याप्रमाणें मन हेंही ज्ञानेंद्रिय शरिराच्या पृष्ठभागावरून नाहींसें होत होत शरिराच्या आंत आंत कोणीकडे दडून आणि दडपून गेलें आहे, त्याचा कांहीं तपास लागत नाहीं.

पूर्वी तें अगदीं उघड्यावर असे. हल्लींचीं घड्याळें जशीं सगळीं झांकलेलीं आणि वर फक्त कांटे तेवढे मात्र दिसावयाचे, तशी मनाची पूर्वीची स्थिति नव्हती. हल्लींच्या झांकलेल्या घड्याळाच्या वरचे कांटे अमुक विवक्षित दिशेनेंच आणि विवक्षित अंतरानेंच कां फिरतात, ते उलटे सुलटे कां फिरत नाहींत वगैरे गोष्टी बाहेरून समजण्याला कांहीं मार्ग नाहीं; परंतु अपरिपक्व आणि अपरिपूर्ण अशा स्थितीमध्यें जर एखादें घड्याळ असलें, आणि त्याच्यावरचीं कांचांचीं आणि पत्र्यांचीं झांकणें जर दूर करण्यांत आलेलीं असलीं, तर ज्याप्रमाणें घड्याळाच्या आंतील निरनिराळ्या चक्रांच्या गति आणि त्यांचे व्यापार कां व कसकसे होत आहेत, हें आपल्याला प्रत्यक्षपणें दिसूं शकेल, त्याप्रमाणें मनुष्याच्या मनाची पूर्वीची स्थिति होती. सर्व कांहीं उघडें होतें. मनाच्या सर्व हालचाली बाहेरून पाहणाराला प्रत्यक्षपणें दिसत असत; आणि हरिद्वारच्या गंगेच्याप्रमाणें स्वच्छ असलेल्या पाण्याच्या तळाशीं पडलेली एखादी वस्तु ज्याप्रमाणें स्पष्टपणें दिसते, त्याप्रमाणें पूर्वी मनांतील हेतु निःसंशयपणें दिसत असत. एखादी गोष्ट मनावर ठसविणें किंवा एखाद्या गोष्टीचा मनावर परिणाम घडविणें, किंवा एखादी गोष्ट मनामध्यें चिंबविणें, इत्यादि जे कांहीं शब्दप्रयोग मनुष्याच्या हल्लींच्या भाषेमध्यें अवशिष्ट राहिलेले आहेत ते, मन ज्या वेळीं उघडें होतें त्या वेळचे आहेत. कारण, त्या वेळींच या गोष्टी मुख्यार्थानें शक्य होत्या. कारण, हल्लींच्या स्थितींत मनामध्यें एखाद्या वस्तूचें प्रतिबिंब पाडणें ही गोष्ट लक्षणेने अर्थ केल्याशिवाय सर्वथैव अशक्यच आहे.

हल्लीं जसें मन पुष्कळ आवरणांच्या खालीं दडपून गेलें आहे, तसें तेव्हां तें नव्हतें. आणि निरभ्र आकाशांतील चंद्राप्रमाणें तें जेव्हां स्पष्टपणें आणि स्वच्छपणें बाहेर उघड दिसत असे, त्या वेळीं जगांतील पुष्कळ व्यवहार पुष्कळ सुलभ रीतीनें चालत असत. त्या वेळीं एकमेकांचीं मनें एकमेकांना बाहेरून स्पष्टपणें दिसत असल्याकारणानें सर्व गोष्टींचा ताबडतोब खुलासा होत असे. एखाद्याच्या मनांत काय असेल आणि काय नसेल अशा ह्या हल्लींच्या काळच्या शंका त्या वेळीं कोणाला येत नसत. कारण, जे मनांत असेल तें सगळ्यांना स्पष्टपणें प्रत्यक्षच दिसत असल्यामुळें अशा शंकांना जागाच उरत नसे. आपल्या कानावर जर एखादें फूल

असलें, आपल्या नाकाशीं जर एखादें सुगंधि द्रव्य असलें, किंवा आपल्या डाळयांत जर आरक्तता उत्पन्न झालेली असली, तर या गोष्टी ज्याप्रमाणें आपल्याला हल्लींच्या काळांत दिसतात, त्याप्रमाणें पूर्वी मनांत एखादी चांगली कल्पना आली किंवा एखादें वाईट पाप आलें, तर त्या गोष्टी पूर्वींच्या काळांत प्रत्यक्ष दिसल्या जात असत. त्या झांकून ठेवण्याला कांहीं साधन नसे. अशी स्थिति असल्यामुळें त्या वेळचें जग अगदीं साधेंभोळें, निष्पाप आणि निष्कलंक असें साहजिकपणेंच बनलेलें होतें.

पूर्वी मन उघडें असल्यामुळें आणखी एक फायदा होता. हल्लीं आपलें नाक, डोळे, वगैरे ज्ञानेंद्रियें हीं उघडीं असल्याकारणानें तीं जशीं आपल्याला स्वच्छ ठेवतां येतात, त्याचप्रमाणें पूर्वी मनेंही धुऊन पुसून स्वच्छ ठेवतां येत असत. एखादा डाग पडला आहे किंवा पडत आहे, असें समजल्याबरोबर तो डाग धुऊन किंवा खरडून काढण्याचा अगदीं साधे लोक सुद्धां तावडतोब प्रयत्न करूं शकत असत. परंतु हल्लींच्या आंतड्याप्रमाणें मनुष्याचें मनही शरिराच्या आंत आंत कोठें तरी गडून गेलेलें असल्याकारणानें तें मन पूर्वींच्यासारखें आतां धुऊन पुसून स्वच्छ ठेवतां येत नाहीं व त्यामुळें कांहीं दिवसांनीं आंतडयांत जसा गाळ सांचतो आणि तीं कुजून कुजून जातात, त्याप्रमाणें मनाचीही तशीच अवस्था होते. परंतु पूर्वी मनाला असले रोग कधींही होत नसत, आणि त्यामुळें पूर्वीचे लोक मोठे सुखी असत. त्यांचीं मनें निष्पाप असत. त्यांना मनामध्यें पाप आणतांच येत नसे. कारण, मनांत पाप उत्पन्न झाल्याबरोबर तें दुसऱ्याला दिसूं लागल्याकारणानें तें मनांत गुप्त ठेवण्याची पूर्वी सोयच नव्हती. मनांत एक ठेवून बाहेर दुसरें दाखवावयाचें, ही कला त्या वेळीं शक्यच नव्हती. 'मनस्येकं वचस्येकं' असल्या प्रकारचीं काव्यें हीं अगदीं अर्वाचीन काळांतील होत. पूर्वी मन आणि वाणी यांच्यामध्यें भेद उत्पन्नच होऊं शकत नसे. आणि एकमेकांचीं मनेंच एकमेकांना प्रत्यक्ष वाचतां येत असल्याकारणानें जिभेचे पुष्कळसे श्रम त्या वेळीं वांचत असत; आणि त्यामुळें अर्थातच तिला देवाचें नांव घेण्याला पुष्कळ फुरसत मिळत असे. ज्याला इंग्रजीमध्यें Thought reading असें म्हणतात, त्या मनकवडेपणाच्या गुणाचें पूर्वी नांव सुद्धां कोणाला माहीत नव्हतें. आपल्या मनांतील विचार छपवून ठेवण्याची जेव्हां सोय सुरू

झाली, तेव्हांच अर्थात् या मनकवडेपणाच्या गुणाला महत्त्व येऊं लागलें. कारण, पूर्वी जेव्हां एकमेकांच्या मनांत काय आहे, हें अगदीं लहान मुलें देखील एकाद्या कागदावर लिहिलेल्या अक्षरांप्रमाणें पाहून वाचूं शकत असत. तेव्हां या मनकवडेपणाच्या चेटकी कृत्याला आणि फसवेगिरीच्या कसबाला काय किंमत असणार?

हा मनाचा आरसा खोल शरिरांत दडविला न जातां जेव्हां शरिराच्या-वर प्रत्यक्ष दिसत असे, तेव्हांचें जें युग त्याला सत्ययुग असें म्हणत असत. कारण, त्या वेळीं असत्याला दडण्याला कोठें जागाच मिळत नसे. त्या वेळीं कोठें अंधार नव्हता, किंवा कोठें तळघरें नव्हतीं, किंवा पर्वतांना गुहा नव्हत्या, किंवा जंगलांतून दाट झाडी नव्हती, असें नाहीं. जेथें असत्याला दडून बसतां येईल, अशीं पुष्कळ ठिकाणें त्या वेळींही होतीं. पण असत्याचें मूळचें आणि मुख्य दडण्याचें हल्लींचें ठिकाण म्हटलें म्हणजे मन होय. तेथें त्याला आश्रयाला निवाऱ्याची आणि गुप्ततेची जागा पूर्वी मुळींच मिळत नसल्याकारणानें अर्थातच बाकीच्या बाह्य गुप्त जागा ओसाड पडलेल्या होत्या. असत्य मनांत आणावें, तर तें मनात आणल्याबरोबर दुसऱ्याला दिसणार! आणि दुसऱ्याला दिसल्याबरोबर तो त्याच्या प्रति-काराला सुरुवात करणार! अशी स्थिति असल्यामुळें कोणीही असत्याला आपल्या मनामध्यें आश्रय देत नसे. आणि त्यामुळें तें युग अगदीं अक्षरशः सत्ययुग झालेलें होतें.

तें सत्ययुग होतें; पण त्यांत विशेष नांवाजलेले असे साधुपुरुष कोणीच नव्हते. हें विधान पाहून कोणालाही आश्चर्य वाटल्यावांचून राहणार नाहीं. इतकें चांगलें युग असून चांगले साधुपुरुष त्यांत नाहींत, हे व्हावें कसें, असें गूढ पुष्कळांना पडणें अगदीं साहजिक आहे. परंतु याचें कारण अगदीं निराळें आहे. सगळेच लोक जेव्हां अतिशय दुर्जन असतात, तेव्हां त्यांच्याचपैकीं जे कांहीं थोडेसे लोक थोडे कमी दुर्जन असलेले आढळतात, त्यांना हल्लींच्या काळांत साधु म्हणून म्हणण्याचा परिपाठ पडलेला आहे. दुर्गुणांच्या शर्यतीमध्यें आघाडी मारण्यासाठीं आणि बक्षीस मिळविण्यासाठीं सगळे घोडे भरधांव पळत सुटलेले असतांना, दुर्गुणांच्या बाबतींत जे मागासलेले असतात, ते साधु, सत्पुरुष आणि सज्जन या नांवाखालीं

मोडतात. परंतु पूर्वी सत्ययुगांत जेव्हां सगळीकडे सत्यच भरलेलें असे, आणि असत्याला दडावयाला मनामध्यें बिलकूल जागाच मिळत नसे, तेव्हां तेथें सज्जन आणि दुर्जन हे भेदच उत्पन्न होत नसत. सगळेच जेथें सज्जन, तेथें एका सज्जनाचें स्तोम माजविण्याला आणि त्याच्या साधुत्वाबद्दल डंका वाजविण्याला दुसरा कोणता सज्जन तयार होणार आहे? अशा कारणामुळें तें युग साधूंच्या बाबतींत अगदीं नापेर, नापीक आणि निष्फळ असें झालेलें होतें.

एकदां ख्रिस्ती लोकांच्या कुराणांतील प्रख्यात पुरुष जो सैतान तो त्या काळीं चुकून जन्माला आला होता. परंतु मनामध्यें लबाडी छपवून ठेवण्याच्या त्या पारदर्शक मनाच्या काळामध्यें जागाच नसल्यामुळें त्याची एकही विद्या लागू पडेना. त्याला एकही लबाडी साधेना, त्याचा एकही फसवणुकीचा प्रयत्न शेवटास जाईना, किंवा एकही सावज त्याच्या जाळ्यामध्यें सांपडेना. त्या दिवसांत जगांत पाप कमी असल्यामुळें त्या वेळच्या लोकांचें आयुष्यही पुष्कळ दीर्घकाळपर्यंत टिकत असे. त्यामुळेंही सैतानाची जास्तच गैरसोय होऊं लागली. जगांत कांही त्याला करमणूक उरली नाहीं, आणि त्यामुळें त्याचे आयुष्याचे दिवस त्याला अगदीं कंटाळवाणे होऊं लागले. लबाडी, लुच्चेगिरी, भांडणतंटे, मारामाऱ्या, लढाया, खून यांच्यावांचून सगळें जग त्याला शून्य, निःसत्त्व, आणि बेचव वाटूं लागलें. असल्या निर्जीव आणि निष्पाप जगांत जगण्यांतही कांहीं हंशील नाहीं असा त्याचा ग्रह होत चालला. चांगल्या, बुद्धिमान, धूर्त, आणि कारस्थानी लोकांना राहण्याला लायक असें जर हें जग व्हावयाला पाहिजे असेल, तर या जगांत सुधारणा अवश्य झाली पाहिजे, असा त्याचा निश्चय झाला. व मन हें उघडें आणि प्रत्यक्ष दिसणारें असल्यामुळें या सगळ्या अनर्थपरंपरा धूर्त बुद्धीच्या लोकांवर कोसळत आहेत, असें पाहून हें मन जेणेंकरून मनुष्याच्या शरिरामध्ये खोल खोल कोठें तरी गाडलें जाईल, अशी कांहीं तरी तजवीज झाली, तरच या जगाची कांहीं तरी धडगत आहे, नाहीं तर निष्पापपणाच्या नीरसपणानें, अतिरेकानें आणि अत्याचारानें हें सगळें जग फुकट जाईल, असे परोपकाराचे आणि जगत्कल्याणाचे उदात्त विचार त्याच्या मनामध्यें येऊन दीर्घश्वास सोडण्यांत आणि दीनमुद्रेनें आक्रंदन करण्यांत तो रात्रीच्या रात्री

घालवूं लागला. अखेरीस तो अतिशय वैतागला. लबाडी करण्याची अंगांत अतिशय शक्ति असूनहि दिवसांतून एकदां सुद्धां लबाडी करण्याला संधि मिळेना, म्हणून त्याचें शरीर अगदी झुरणीस लागलें. सत्य, निष्पापपणा, निष्कपटपणा, निष्कलंकपणा, इत्यादि शत्रूंच्या जाचाखालीं आणि गांजणुकी-वरून त्याचें डोकें भडकून गेलें, आणि तो वेडाच्या भरामध्यें भलभलतें बरळूं लागला. 'मी कांहीं या जगामध्यें पुण्यकर्मे करण्याकरितां किंवा सात्त्विक तपस्वी बनण्याकरितां आलों नाहीं! माझ्या हातून एक दिवसांत निदान एक तरी खून आणि एक वर्षांत पुष्कळ खुनांची मिळून बनली जाणारी अशी एक तरी लढाई झाली नाहीं, तर मग माझ्या जन्मापासून जगाला फायदा तो काय! परंतु ह्या मोठ्या गोष्टी तर राहोतच, परंतु या जगाच्या रसिकतेच्या आणि वैचित्र्याच्या बाबतींतील अगदीं पहिले ओनामा —चोरी, चहाडी, शिंदळकी—हे जे अगदीं साधे गुण, ते सुद्धां जेथें कोणाला अवगत नाहींत, त्या जगाचा जितक्या लवकर प्रळय होईल तितका चांगला! असे उद्गार काढीत वेडाच्या भरांत तो एका उंच पर्वताच्या शिखरावर चढून गेला आणि या जगांत पातकें करण्याला अवसर नाहीं म्हणून नाराज होऊन त्यानें त्या पर्वताच्या कड्यावरून उडी टाकून अखेरीस आत्महत्या करून घेतली!

तेव्हां पृथ्वी दुभंग झाली आणि आकाश अतिशय मोठ्यानें कडाडलें. सैतानाच्या अधःपतनामुळें आणि आत्महत्येमुळें जिकडे तिकडे मोठा हल-कल्लोळ उडून गेला, आणि वातावरणामध्यें दुष्ट आणि पापी लोकांच्या आत्म्यांची जी एक मोठी थोरली वसाहत होती, तिच्यामध्यें फार खळबळ उडाली, व तेथें दंगेधोपे आणि बंडें होण्यापर्यंत देखील मजल जाईल कीं काय, अशी भीति वाटूं लागली. 'पातकाच्या वृद्धीसाठीं आणि विजयासाठीं आमच्या पुढाऱ्यानें केवढा तरी हा आत्मयज्ञ केला आहे!' असे उद्गार त्यांच्या तोंडून निघूं लागले, आणि पातकाच्या दिग्विजयाचे झेंडे जगाच्या किल्ल्यावर उभारल्याशिवाय आम्ही कधींही राहणार नाहीं, अशी महत्त्वा-कांक्षा त्या आत्म्यांच्या डोक्यांत उसळूं लागली. ही त्यांची ओरड दीर्घ काळपर्यंत चाललेली होती.

इकडे जगाच्या वाढीचें काम धिमेपणानें चाललेलें होतें. सृष्टीच्या

कारखान्यांतील बॉयलर तापत होते, चक्रें फिरत होतीं आणि पट्टे गतीची वांटणी करीत होते. नवीन वस्तु अस्तित्वांत येत होत्या, आणि ओबड-धोबड वस्तु नीटनेटक्या होत होत्या कच्च्या वस्तु पक्क दशेला येत होत्या आणि पक्क वस्तु नाशाप्रत चालल्या होत्या, उघड्या वस्तु होत्या त्यांच्यावर झांकणें वाढत होतीं आणि ज्यांच्यावर झांकणें होतीं त्या वस्तु उघड्या पडत होत्या, ठेंगण्या वस्तु उंच वाढत होत्या आणि उंच वाढलेल्या वस्तु अधः-पतनाच्या तयारीला लागल्या होत्या. अशा या सार्वत्रिक घडामोडीच्या फेऱ्यामध्यें बिचारें मनही सांपडल्याशिवाय अपवाद म्हणून कसें सुटणार? मनुष्याच्या शरिरावर या सृष्टीच्या उलाढालीचे परिणाम होत होते. डोळ्यांच्या ज्ञानेंद्रियावर पापण्या हळूहळू वाढूं लागल्या होत्या, आणि बहुतेकांच्या दातांवरील ओठांचें आच्छादन खावयाचे दांत पूर्णपणें झांकून टाकण्याइतकें पुढें सरसावत चाललें होतें. या इतर अवयवांच्या फेरफारांबरोबरच मनाच्या स्थितीमध्येंही फेरबदल होत चालला होता. पूर्वी मन जें उघडें आणि प्रत्यक्ष दिसणारें असे, त्याच्याभोंवतालची कातडी आपलें वर्धिष्णुत्व हळू-हळू प्रकट करूं लागली. डोळ्यांप्रमाणें मनालाही प्रसंगविशेषीं उघडझांप करतां येण्याकरितां मनाला या पापण्याच करण्यांत येत आहेत कीं काय, असा कित्येक दिवसपर्यंत कित्येकांचा समज अथवा गैरसमज होत चाललेला होता; परंतु अखेरीस त्या दोन्ही पापण्या एक होऊन त्यांच्या दुहेरी जाड थराखालीं मन झांकून गेलें! हा सृष्टिक्रमांतील फेरबदल जेव्हां अगदीं नवीनच होता, तेव्हां हल्लीं जशी वैद्यलोक नाडी पाहतात, त्याप्रमाणें बोट ठेवून पाहिलें असतां मनाची हालचाल हाताच्या स्पर्शेंद्रियाला थोडी बहुत कळत असे. परंतु पुढें पुढें तेही दिवस गेले. कातड्याचे थर मनाच्या पृष्ठभागावर दिवसेंदिवस जास्त जास्तच वाढत गेले, आणि त्याबरोबरच मनुष्याचें मन खालीं दडपत जातां जातां किती खोल गेलें आहे किंवा कोणीकडे गेलें आहे, ह्याचा पत्ताच नाहींसा झाला. असे फेरफार मानवी शरिरामध्यें फक्त मनाच्यासंबंधानें झालेले आहेत, असें नाहीं. शंकराच्या समकालीन मानवी जातीमध्यें कित्येक प्राण्यांना मस्तकावर तिसरा डोळा असला पाहिजे, अशी कित्येक प्राणिशास्त्रवेत्त्यांची कल्पना आहे. पण तो डोळा आज कोणाच्या मस्तकावर दिसतो आहे? कठोर अस्थि आणि

अप्रबुद्ध चर्मपटलें यांनीं तो झांकून टाकलेला असला पाहिजे. आणि तीच गति बिचाऱ्या मनाचीही झालेली आहे. या क्रियेमध्यें एखाद्याचें मन ज्या मानानें कमी अधिक खोल गेलेलें असेल, त्या मानानें तें मन दाखविण्याकरितां 'उथळ मन', 'खोल मन', हे शब्दप्रयोग तेव्हांपासून प्रचारांत येऊं लागले.

जेव्हां मन उघडें आणि प्रत्यक्ष दिसणारें होतें, तेव्हांच्या परिस्थितीसंबंधानें कित्येक लोकांचे आत्मे अगदीं नाराज आणि नाखुष होते, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. 'जेथें उघडया मनानें व्यवहार चालावयाचा, तें जग आपल्याला फार गैरसोईचें आहे; असल्या जगांत जन्म घेऊन आपल्या अंगच्या गुणांचें मातेरें करून घेण्याची आमची इच्छा नाहीं!' असें म्हणून त्या सर्व आत्म्यांनीं संप केला होता; आणि उघडया व मोकळया असलेल्या मनाच्या जगाशीं आपला कांहीं संबंध ठेवावयाचा नाहीं, अशा त्यांनीं शपथा घेतल्या होत्या; व या जगापाशीं भांडून, त्यांतून फुटून निघून आपल्याकरितां मुद्दाम बनविलेल्या पापी आत्म्यांच्या वसाहतीमध्यें (याला कित्येक जुनेपुराणे लोक Purgatory वगैरे नांवें देतात) आपल्याला अनुकूल वेळ येईपर्यंत वाट पाहण्याचा निश्चय करून ते स्वस्थ बसले होते. आणि त्यामुळें या जगामध्यें बिचारे साळसूद लोकच तेवढे आपले सरळ व्यापार करून सत्याच्या आश्रयानें नीरसपणानें कसेबसे दिवस काढीत होते! इकडे उलट बाजूनें त्या वसाहतींतील आत्मे जरी त्या वसाहतीमध्येंच रहात असत, तरी जगांत आपल्याला अनुकूल अशी परिस्थिति कांहीं उत्पन्न होते आहे कीं नाहीं, या गोष्टीकडे त्यांचें लक्ष असे, व याबद्दल ते नेहमीं गुप्त तपास ठेवीत असत. असा कांहीं काळ लोटतां लोटतां पुढें पुढें त्यांच्या कानांवर बातम्या येऊं लागल्या कीं, जगांतील मन या ज्ञानेंद्रियाच्या रचनेमध्यें कित्येक हितकारक असे फेरबदल होऊं लागले आहेत. उघडया मनावर जीं कातडयाचीं झांकणें वाढत चाललीं होतीं, त्यांच्या वाढीची अगदीं बरोबर बातमी ते ठेवीत असत, आणि मन हें मनुष्याच्या शरिराच्या पृष्ठभागावरून अजिबात नाहींसें झालेलें असून शरिराच्या आंतमध्यें सुद्धां त्याचा कोठें मागमूस लागत नाहींसा झालेला आहे, ही शेवटची बातमी जेव्हां त्यांनीं ऐकिली, तेव्हां त्यांनीं आपल्या वसाहतीमध्यें सगळीकडे निशाणें उभारिलीं, आणि मोठा दीपोत्सव केला. व आतां या जगामध्यें

आपल्या कर्तबगारीला अनुकूल अशी भूमिका तयार झालेली आहे, असें पाहून त्या वसाहतींतील सगळ्या नागरिकांनीं आतां आपली वेळ आली आहे, असें समजून या जगांत जन्म घेण्याचा निश्चय केला.

हे लोक या जगांत येऊं लागल्यापासून जगामध्यें बरीच सुधारणा झाली, आणि झांकलेल्या मनाच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या अनेक कला-कौशल्याच्या योगानें जगाच्या सुखदुःखांमध्यें या लोकांनीं बरीच भर घातली. पूर्वी मन उघडे आणि मोकळें असल्यामुळें त्यांत कांहीं दडवून ठेवतां येत नसे. परंतु आतां मन झांकून गेल्यामुळें त्यांत पाहिजे तें दडवून ठेवावें, अशी नवीन सोय उत्पन्न झाली. त्यामुळें एकेका मनांत दोन दोन, तीन तीन, चार चार, किंबहुना त्याहूनही अधिक विकार दडून राहूं लागले; म्हणजे पर्यायानें मनाची तितक्या पटींनीं धारणाशक्ति वाढली, असें म्हणण्यास हरकत नाहीं! पूर्वी कोणताही विकार दुसऱ्याला कळल्यावांचून मनांत दडवून ठेवतां येत नसे; परंतु आतां वाटतील तितके कुविचार मनामध्यें दडपून ठेवून एक चांगला विचार बाहेरच्या लौकिक व्यवहाराकरितां बाहेर फिरता ठेविला म्हणजे झालें! दुटप्पीपणाचा फायदा हा पूर्वी शक्यच नव्हता. कारण, खरा विकार मनांत झांकून ठेवून खोटा विचार बाहेर दाखविण्याची पूर्वी सोयच नव्हती. कां कीं, मन उघडे असल्यामुळें मनांत आलेले खरे आणि खोटे दोन्हीही विचार लोकांना कळावयाचेच. अशा स्थितींत आपल्या मनांतली गुह्य गोष्ट लोकांपासून छपवून ठेवणें कोणाला साधतच नसे.

परंतु ही दुटप्पीपणाची अथवा मनांत एक असून बाहेर दुसरेंच दाखविण्याची विद्या अस्तित्वांत आल्यापासून जिव्हेवरची जबाबदारी जास्त वाढली. पूर्वीच्या युगांत जेव्हां एकमेकांचीं मनेंच एकमेकांना प्रत्यक्ष पहावयाला मिळत असत, तेव्हां जिभेला किंवा डोळ्यांना विचारीत होतें कोण? जीभ काय बतावणी करते किंवा डोळे काय हावभाव दाखवितात, हें पाहण्यांत आणि त्यावरून अनुमानें काढण्यांत आपला वेळ खर्च करण्याला पूर्वी तयार होतें कोण? जेथें प्रत्यक्ष राजाची गांठ पडणें सुलभ असतें, तेथें भालदार आणि चोपदार त्यांना फारशी किंमत उरत नाहीं, हें उघडच आहे. त्याचप्रमाणें मनांतले हेतु किंवा विकार मन आपण होऊनच

आरशांतल्या प्रतिबिंबाप्रमाणें स्पष्टपणें दाखवीत असल्याकारणानें दुसऱ्याची खात्री करून देण्यासाठीं जिभेला पूर्वी क्वचितच बोलण्याचा प्रसंग येत असे. पण आतां मात्र ती स्थिति पूर्णपणें बदलली होती. आतां मनांत काय आहे तें दुसऱ्यांना समजून सांगण्याची सगळी जोखीम जिभेवर येऊन पडूं लागली, व चक्षुरिंद्रिय वगैरे अवयवांना जिभेची री ओढून तिची साथ करण्याचें काम करणें भाग पडूं लागलें. त्यांतल्या त्यांतही ज्या वेळेला मनांत असेल तेंच जिभेला बोलून दाखवावयाचे असेल, तेव्हां जिभेला स्वाभाविकपणेंच थोडे परिश्रम पडत. परंतु मनांत निराळे असून जनांत निराळे दाखवावयाचें असेल, त्या वेळीं मात्र जिभेची पंचाईत उडूं लागली. तोंपर्यंत जिभेला खोटें बोलणें कसे तें माहीत नव्हते. तो जिभेवर खोटें बोलण्याचा पहिला प्रसंग. तेव्हापासून तिला हळूहळू संवय पडूं लागली व ती क्रमाक्रमाने खोटेपणामुळें अवघड झालेले शब्द उच्चारण्याला वळूं लागली. आणि संवईनें काय होत नाहीं? प्रथमारंभीं खोटे शब्द उच्चारण्याला कचरणारी आणि अडखळणारी ही जीभ सबंध खोटे बोलणें, अर्धवट खोटें बोलणें, दुटप्पीपणाचें बोलणें, धरसोडीचें बोलणें, द्व्यर्थी बोलणे, इत्यादि खोटें बोलण्याच्या अनेक पकडींमध्यें एखाद्या साक्षीदाराप्रमाणें अगदीं तरबेज होऊन गेली. आणि तेव्हापासून वक्तृत्वाच्या कलेला उत्तेजन मिळालें. पूर्वी सत्ययुगांत जेव्हा मनें उघडीं होतीं तेव्हां वक्तृत्व ही कला नव्हती. ही वक्तृत्वाची कला मनें झांकलीं गेल्यानंतर अस्तित्वात आलेली आहे. आणि तेव्हांपासून मनांतले खरे विचार छपवून ठेवून खोटे विचार पसरविण्याकडे या कलेचा बरेच वेळां उपयोग होऊं लागला. व त्यामुळेच 'Speech was given to man to conceal his thoughts.' 'Men talk only to conceal the mind.' 'Language is the art of concealing thought.' अशा प्रकारच्या म्हणी पाश्चात्य देशांतून प्रचारत आलेल्या आपल्या दृष्टोत्पत्तीस येतात.

कोणाच्या मनांत काय आहे हें प्रत्यक्ष जाणण्याला कांहीं साधन न उरल्यामुळें आणि जिभेला खरें बोलण्याप्रमाणें खोटेंही बोलणें शक्य आहे असें दिसून आल्यानंतर खोट्याबरोबर खऱ्या भाषणाबद्दलही संशय उत्पन्न होऊं लागला, व त्या संशयाच्या निवृत्तीला दुसरें कांहीं

साधन नसल्यामुळें 'मी आपलें हृदय फाडून माझ्या मनांत खरोखर काय आहे तें दाखवूं काय?' असेही उद्गार आवेशाच्या भरामध्यें बोलून दाखविण्याला माणसें शिकलीं. परंतु ही भाषा पूर्वींच्या युगांत नव्हती. तेव्हां मनें शरिराच्या पृष्ठभागावर प्रत्यक्षपणें दिसण्यासारखीं असल्यामुळें हृदय फाडून दाखविण्याचा आविर्भाव आणण्याचा कोणत्याही नाटकांतील पात्रावर आवेशातिशयाचा प्रसंग येत नसे.

'स्त्रियो नाम चपलाः। अन्यं मनुष्यं हृदयेन कृत्वा अन्यं ततो दृष्टिभिराह्वयन्ते।' या श्लोकांत स्त्रियांच्या हृदयाची स्थिति आणि नेत्रांचें चापल्य यांच्यामधील विसंगतता जी कवीनें वर्णिली आहे, तीही अर्थातच मनाच्या परिस्थितीमध्यें वर सांगितलेला फेरबदल झाल्यानंतरची आहे. त्याच्यापूर्वीं मनें जेव्हां प्रत्यक्ष दिसणारीं होतीं तेव्हां कोणत्याही स्त्रीला किंवा पुरुषाला असें दुटप्पी वर्तन करतां येणें शक्यच नव्हतें; आणि म्हणून पातिव्रत्य हा प्रेमाचा फक्त एकच राजमार्ग त्या वेळीं खुला होता. व त्या वेळीं प्रेमाच्या सत्यपणाच्या शपथा या संशयाच्छादित न होतां प्रत्यक्षपणानें सिद्ध केल्या जाऊं शकत असत. म्हणून त्या काळांत शेक्सपियर उत्पन्न झाला असता तरी, त्याला 'अथेल्लो'सारखें नाटक लिहितां आलें नसतें. परंतु मन दिसेनासें झाल्याच्या योगानें या बाबतींतही जगांत किती तरी नवीन सोई आणि गैरसोई उत्पन्न झाल्या आहेत.

'अन्यं मनुष्यं हृदयेन कृत्वा अन्यं ततो दृष्टिभिराह्वयन्ते' ह्या वर दिलेल्या श्लोकाच्या अर्थसादृश्यानें 'वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा' या वचनाची सुद्धां सहजगत्या कोणालाही आठवण झाल्यावांचून राहणार नाहीं. हा नृपनीतीच्या दुटप्पी वर्तनाच्या वर्णनाचा समग्र श्लोक येणेंप्रमाणें आहे. 'सत्यानृता च परुषा प्रियवादिनी च हिंस्रा दयालुरपि चार्थपरा वदान्या। नित्यव्यया प्रचुरनित्यधनागमा च वारांगनेव नृपनीतिरनेकरूपा॥' या श्लोकांत वारांगनेशीं सादृश्य दाखवीत राजनीतीच्या परस्परविरुद्ध स्वभावाचें वर्णन कवीनें अतिशय मार्मिकपणानें दिलें आहे. परंतु हें कोणत्या काळचें? जेव्हां राजांचीं अंतःकरणें राजांच्या शरिराच्या वर प्रत्यक्ष दिसणारीं असतील तेव्हां अशी स्थिति असूं शकेल काय? त्या वेळीं कोणीही कवि कितीही प्रतिभासंपन्न असता, तरी त्याला असलें वर्णन कल्पनेच्या जोरावर करतां

आलें असतें काय ? त्या वेळीं असल्या गोष्टींचें अस्तित्वच मुळीं अशक्य झातें. कारण कीं, त्या वेळच्या कोणत्या राजांना मनामध्यें कपट ठेवून आपल्या लोकांपाशीं वरवर गोड बोलतां आलें असतें ? लोकांनीं तावडतोब राजाच्या मनाकडे पाहिलें असतें, आणि तेथें त्यांना कपट स्पष्टपणें दिसल्यानंतर त्याच्या गोड शब्दांना कोण फसलें असतें ? जें वचन उद्यां मोडावयाचा हेतु एखाद्या राजाच्या मनामध्यें असेल, त्या वचनावर आज विश्वास ठेवण्याला त्या वेळीं कोण लोक तयार झाले असते ? त्या काळांत सगळा उघड्या आणि मोकळ्या मनाचा व्यापार चालू असल्यामुळें राज्य करण्याचें काम मोठें कठिण झालें होतें. कारण, शहाजोगपणानें राज्य करावयाचें कसें ? राज्य उभारावयाचें आणि तें फिरून कोणाला फसविल्यावांचून किंवा कोणाचा घातपात केल्यावांचून उभारावयाचें, या अशक्य गोष्टींची सांगड घालणार तरी कोण ? त्यामुळें पूर्वींच्या त्या काळांत राजांची संख्या साहजिकपणेंच अगदीं थोडी होती. व जास्त कोणी राजे मिळतील तर त्या वेळीं पाहिजे होते. आणि म्हणून पूर्वी सांगितलेल्या आत्म्यांच्या वसाहतीमध्यें कंस, जरासंध, दुर्योधन, इत्यादिकांसारख्या राजांचे आणि शकुनीसारख्या मंत्र्यांचें जे आत्मे कुंभीपाकामध्यें शिजत होते, त्यांना 'तुम्ही राज्य करण्याकरितां येतां का ?' म्हणून अतिशय आग्रहानें विनंति केली असतांही 'आम्ही असल्या अजागळ युगामध्यें राज्य करूं इच्छीत नाहीं ! आम्ही मागाहून अवतार घेऊं !' असें त्यांनीं साफ जबाब दिले ! अशा रीतीनें पूर्वी राजे मिळण्याला विरळा असल्याकारणानें बिचाऱ्या पूर्वींच्या लोकांना राजांच्या जुलुमावांचून आणि लढायांवांचून नैसर्गिक मरणानेंच मरावें लागत असे !

परंतु मनुष्यांचीं मनें शरिराच्या आंत गडप झाल्याबरोबर, अस्ताचलाच्या आड सूर्य नाहींसा झाल्याबरोबर ज्याप्रमाणें काळोख पसरतो, त्याप्रमाणें किती तरी लोकोपयोगी गोष्टी या जगावर पसरल्या ! पूर्वींच्या काळांतील एखाद्या महापंडितालाही 'पुराव्याचा कायदा म्हणून काय ?' म्हणून विचारिलें असतें, तर तो बिचारा बुचकळ्यांतच पडून गेला असता. त्याला पुराव्याच्या कायद्याची काय माहिती ! पुराव्याचें शास्त्र ही एक त्याच्यानंतरच्या काळांतील अजब चीज ! ती त्या वेळीं कशाशीं खातात हें सुद्धां

कोणाला माहीत नव्हतें. त्या वेळीं मनांतील सर्व गोष्टी सर्वांना प्रत्यक्ष दिसत असल्याकारणानें त्या लोकांना हातचें कांकण पाहण्याला आरशाची जरूरी लागत नसे. पण कोणाच्या मनांत काय आहे किंवा काय होतें हें दिसेनासें झाल्याबरोबर पुराव्याचा कायदा, तर्कशास्त्र, अनुमानपरंपरा, इत्यादि पुढें सरसावल्या आणि असत्यावर सत्याचा किंवा सत्यावर असत्याचा वाटेल तसा रंग चढविण्याचीं कलाकुसरीचीं कामें या जगांत सुरू होऊं लागलीं.

परंतु मनुष्याचें मन दिसेनासें झाल्यापासून जरी हे व आणखी कित्येक फायदे झालेले आहेत, तरी या फायद्यांनीं त्रासून गेलेल्या कित्येक अल्पबुद्धि आणि अदूरदृष्टि लोकांना असें वाटत असतें कीं, फिरून ते मोकळ्या मनाचें सत्ययुग येईल तर बरें होईल. असें म्हणतात कीं, इच्छा असली म्हणजे कार्य होतें. त्याप्रमाणें याही बाबतीमध्यें कांहीं थोडेंसें कार्य झालेलें आहे.

हल्लींचा काळ हा यांत्रिक सुधारणेचा काळ आहे, हें सर्वांना माहीतच आहे. या काळांत काय नवीन शोध निघतील, याचा कांहीं नेम नाहीं. एक्स-रेजच्या साधनानें अपारदर्शक वस्तु पारदर्शक कशा बनतात, हें सगळ्यांना अलीकडे माहीत झालेलेंच आहे. आणि डॉक्टर बोस यांच्या नवीन शोधांनीं अतिशय सूक्ष्म हालचालींचेही परिणाम पदार्थांवर कसे होतात हें समजूं लागलें आहे. अशाच या शोधाच्या पायरीनें आणि परंपरेनें पुढें जातां जातां अमेरिकेंतील एका प्रख्यात तत्त्ववेत्त्यानें मनुष्याच्या मनांतील विचार जाणण्याचें एक नवीन आणि अजब यंत्र शोधून काढलें आहे! अजून तें प्रयोगाच्याच अवस्थेमध्यें आहे; तरी पण शेंकडा नव्वद या प्रमाणामध्यें त्या यंत्राचीं उत्तरें बरोबर येऊं लागलीं आहेत, व लौकरच या शोधाबद्दल पेटंट घेण्याचा त्या शोधकाचा इरादा आहे. परंतु असल्या यंत्राला पेटंट मिळेल, अशी त्याला बिलकूल खात्री वाटेनाशी झाली आहे. कारण, तें यंत्र घेऊन दाखविण्याकरितां तो ज्या ज्या अधिकाऱ्यांकडे गेला होता, त्या त्या अधिकाऱ्यांनीं 'तुमचें हें यंत्र फार चांगलें आहे, याला आम्ही अवश्य पेटंट देऊं!' असें जरी अघळपघळ आश्वासन दिलें आहे, तरी त्या शोधकानें त्या यंत्राचा त्या अधिकाऱ्यांच्या मनांत या बाबतीसंबंधानें खरें

काय आहे तें पाहण्याकरितां त्यांच्यावरच प्रयोग केला, त्या वेळीं 'असल्या खरें बाहेर फोडणाऱ्या यंत्राला मुळींच पेटंट देऊन उपयोगी नाहीं!' असें त्या अधिकाऱ्यांच्या मनांत आलेलें त्याला स्पष्टपणें आढळून आलें. त्यामुळें तो निराश झालेला आहे; परंतु आपल्या यंत्राच्या खरेंपणाबद्दल मात्र त्याला पूर्ण आशा वाटूं लागली आहे. त्याच्या या यंत्राच्या शोधाची बातमी आंतून आंतून बऱ्याच ठिकाणीं बाहेर फुटलेली असल्याकारणानें पुष्कळ लोक त्याच्याकडून तें यंत्र गुप्तपणानें मागून नेत असतात. अमेरिकेंतल्या एका बाईचें एका तरुणाशीं नुकतेंच लग्न झाल्यानंतर थोडक्याच दिवसांत त्याचें आणि तिचें बनेनासें झालें, तेव्हां आपल्यावर लग्नाच्यापूर्वी असलेलें याचें इतकें प्रेम गेलें कोठें, हें पाहण्यासाठीं तिनें या यंत्राचा चोरून एक दिवस उपयोग केला, तों नवऱ्याच्या मनामध्यें दुसरी एक श्रीमंत तरुणी बसलेली तिला आढळली! पोलिसांनाही या यंत्राचा फार उपयोग होतो. त्यांनीं या साधनाच्या प्रयोगानें अमेरिकेंतील कित्येक न सांपडलेले असे गुन्हे शोधून काढले आहेत! न्यूयॉर्कमधील एका आरोपीवर एक आरोप नुकताच आणण्यांत आलेला होता; तसला गुन्हा तो करील हें प्रत्येकाला अगदीं अशक्य वाटत होतें; तरी पण त्या कामांत त्याचा कबुली-जबाब दाखल करण्यांत आला होता; तेव्हां हें गूढ काय आहे, हें उलगडून पाहण्याकरितां डिफेन्सच्या बाजूनें एकानें या यंत्राचा उपयोग केला; तेव्हां 'टॉर्चर ( Torture )' हें कारण त्याच्या मुळाशीं असल्याचें दिसून आलें! असे बारीक सारीक उपयोग या यंत्रापासून झाल्याचें प्रसिद्ध आहे. पण या यंत्राच्या शोधकानें या यंत्राचा थोडे दिवसांपूर्वी एका चमत्कारिक प्रसंगीं उपयोग केला होता. पूर्वी जेव्हां No indemnity, no annexation! हीं तत्त्वें युरोप खंडांतील कांहीं लोक बोलत होते, तेव्हां या लोकांच्या मनांवर त्या शोधकानें आपलें यंत्र लावून पाहिलें. तेव्हां 'लढाईचा खर्च चोपून घेणें' आणि 'जर्मन ईस्ट आफ्रिका सामील करून घेणें' हे हेतु त्या वेळीं त्याला दिसले होते, असें त्यानें लिहून ठेविलें आहे, असें म्हणतात! हिंदुस्थानांतील सेल्फ डिटरमिनेशन आणि मांटेग्यू-चेम्सफर्ड स्कीम यांच्यावर त्या शोधकानें हें यंत्र लावून पाहिलें होतें किंवा नाहीं, याच्याबद्दल नक्की माहिती बाहेर आलेली नाहीं; परंतु अमेरिकेंतील लोकांना

हिंदुस्थानासंबंधानें फारशी उत्सुकता असण्याचें कारण नसल्यामुळें बहुधा त्यानें या दिशेनें प्रयत्नच केलेला नसावा, असें दिसते. परंतु जेथें जेथें त्यानें प्रयत्न केले आहेत, तेथें तेथें त्याचे प्रयोग यशस्वी झालेले आहेत. फक्त त्याच्या यंत्राला राजरोस विक्रीचें पेटंट मिळण्याच्या प्रयत्नाला सध्यांच्या जगाच्या स्थितीमध्यें यश येईल किंवा नाहीं, याबद्दल मात्र पुष्कळ वानवा आहे.

---

# भासाची भवितव्यता

अलीकडे भासकवीसंबंधानें जी कांहीं थोडीशी माहिती उपलब्ध झालेली आहे, तिच्यावरून सर्वांना हे कळलेंच आहे कीं, भास हा एक चांगल्यापैकीं कवि होता, त्यानें पुष्कळ नाटकें लिहिलीं होतीं, आणि तीं बहुतेक लुप्तप्राय झालेलीं आहेत. तीं कोणत्या कारणानें लुप्त झालीं, हें निश्चयात्मक सांगतां येण्याला हल्लीं तरी निदान कांहीं साधन नाहीं. “ भासनाटकचक्रेऽपि छेकैः क्षिप्ते परीक्षितुम् । स्वप्नवासवदत्ताया दाहकोऽभून्न पावकः ॥ ” या श्लोकावरून त्याचीं नाटकें जाळलीं गेलीं असावींत, असा पुष्कळ लोकांचा तर्क आहे. हा तर्क खरा असेल, तर ती किती खेदाची व दुःखाची गोष्ट आहे ! दुसऱ्याही कांहीं कारणांनीं कदाचित् त्याच्या काव्यांचा नाश झाला असेल; नाहीं असें म्हणवत नाहीं. किंवा त्याची वेळ आणि आतांची वेळ यांच्यामध्यें जें दीर्घकालीन महदंतर आहे, त्यामुळेंही कदाचित् त्याची कविता उपलब्ध होणें अशक्य झालें असेल. परंतु ही कल्पना फारशी सयुक्तिक

दिसत नाहीं. कारण भासाचीं नाटकें आतां जशीं दुर्मिळ आहेत, तशींच तीं हजार-पांचशें वर्षांच्या पूर्वींही दुर्मिळच असलीं पाहिजेत. कारण, त्या वेळच्या लेखकांपैकींही फारशा लोकांना भासाच्या कवितेची प्रत्यक्ष माहिती होती, असें दिसत नाहीं. यावरून त्याचीं नाटकें बहुधा जाळलींच गेलीं असावींत, हें अनुमान जास्त प्रामाण्यास्पद दिसतें. आणि तें खरें असेल, तर ही किती शोचनीय गोष्ट आहे! अलीकडे दोन तीन वर्षांत भासाचीं कांहीं थोडींशीं नाटकें सांपडलीं आहेत, ही गोष्ट अलाहिदा आहे. पण या दोन तीन वर्षांच्या पूर्वींची भासाच्या नाटकांची अज्ञेयत्वाची अवस्था लक्षांत घेतली असतां, आणि इतक्या चांगल्या कवीचें एकही नाटक उपलब्ध नसणें ही कल्पना मनामध्यें आली असतां, कोणाही सहृदय मनुष्याच्या हृदयाची कशी विदीर्ण अवस्था होत असली पाहिजे, याची कोणालाही कल्पना आल्यावांचून राहणार नाहीं.

हे हतभाग्य भासा! तूं असें काय पातक केलें असावेंस, कीं ज्यासाठीं तुझ्या इतक्या अनेक नाटकांपैकीं कांहींही अवशिष्ट राहूं नये! तुझीं नाटकें कोणीं जाळलीं? सुंदर काव्यें हे जाळण्याचे पदार्थ आहेत काय? ज्यांनीं तीं तुझीं नाटकें जाळलीं, त्यांना परमेश्वरानें फक्त विचारशून्य हातच दिले होते काय, आणि विचारशाली अंतःकरणें त्यांच्या वांट्याला परमेश्वराच्या एवढ्या विस्तीर्ण, उदार आणि समविभागी सृष्टीमध्यें मुळींच आलीं नव्हतीं काय? तुझीं काव्यें जाळणारे ते लोक काळेगोरे कसले होते, तें तरी तूं पाहिलें होतेंस काय? ते राक्षसांसारखे दिसत होते काय? रामायणकालीं राक्षस होते, असें म्हणतात. पण ते बहुतेक रामानें मारून टाकले होते, असेंही म्हणतात! त्या रामाच्या तावडींतून चुकून राहिलेले कांहीं राक्षस तुझ्याही वेळीं बहुधा जिवंत असले पाहिजेत. एरव्हीं मनुष्यांच्या हातून असलें अमानुष कृत्य कसें होईल? पण ज्या राक्षसांनीं तुझीं काव्यें भस्मसात् केलीं, त्यांचें तूं काय केलें होतेंस? सापाला सुद्धां धक्का लागल्याशिवाय तो दंश करीत नाहीं. तेव्हां खात्रीनें तूं त्यांचा कांहीं तरी अपकार केला असला पाहिजेस. राक्षस माणसें खातात, अगर मोठे क्रूर असतात, असलें कांहीं वर्णन तूं कोठल्या नाटकांत केलें होतेंस काय?— निदान 'सीतेला रावणानें चोरून नेली,' याचा तरी उल्लेख तुझ्या कोठल्या तरी रामायणविषयक

नाटकांतून आलेला असला पाहिजे. एरव्हीं त्यांच्या हातून असा अन्याय कसा घडेल? किंवा पिशिताशनांना पैशुन्य दाखविण्याला कारणच पाहिजे, हा तरी सामान्य मनुष्यांचा भाबडा नियम त्यांच्या ठिकाणीं जरूर लागत असेल, असें कशावरून? अथवा असो. आजच्या कृत्यांचेंही कारण जेथें आज सांपडत नाहीं, तेथें इतक्या जुन्या दुष्ट कृत्यांचें कारण कोणाच्या कल्पनेला सांपडणार आहे? तेव्हां हजार गोष्टींतली एक गोष्ट ही खरी कीं, कोणत्याही कारणामुळें कां होईना, पण तुझीं काव्यें कोणी तरी जाळलीं खास!

भासा, ही गोष्ट झाली—तुझीं नाटकें जाळलीं—तेव्हां तूं जिवंत होतास? तुझ्या डोळ्यांदेखत ही गोष्ट झाली असेल, तर ती पाहून तुझ्या मनाला काय वाटलें असेल! तुझीं पुस्तकें होरपळलेलीं पहात असतांना तुझें अंतःकरण होरपळून गेलें असेल! तुझ्या पुस्तकांतून अग्नीच्या ज्वाळा निघत असतांना तुझ्या हृदयांतूनही तितक्याच लाल क्रोधाच्या ज्वाळा निघत असतील! तुझ्या जळणाऱ्या ग्रंथांतील आणि डोळयांतील ठिणग्या एकदमच बाहेर पडल्या असतील. भासा, कांहीं वेळानें तुझ्या पुस्तकांची आग विझली असेल; पण तुझ्या मनाची आग कधीं तरी विझली असेल काय रे? बहुधा ते बाहेरचे अंगार धुमसण्याचें थांबल्यानंतरही अनेक वर्षें-पर्यंत तुझ्या अंतर्यामांतील क्रोधांगार तसेच धुमसत राहिले असतील! तुझीं नाटकें जळलेलीं पाहून तूं रडला असशील, ओरडला असशील, हळहळला असशील, तळमळला असशील! त्या आगीच्या उष्णतेनें तुझे हातपाय गार पडले असतील! आणि त्या नाटकांची प्रसवित्री ती तुझी जीभ दुःखातिरेकानें वांकडी पडल्यानंतर कंठाच्या अग्रभागीं आलेले तुझे पंचप्राण त्या पेटलेल्या अर्चीवर आरूढ होऊन त्या सुप्रसिद्ध अर्चिरादि मार्गानें ब्रह्म-लोकाला जाण्याला खरोखर उत्कंठित झाले असतील!

अशा स्थितींत, भासा, कोणाला तुझी दया आली नाहीं? आणि कोणी तुझें सांत्वन करण्याला उद्युक्त झालें नाहीं? या उत्कृष्ट कवीचे उत्कृष्ट ग्रंथ जाळूं नका हो नका, असें कोणी म्हटलें नाहीं? का सगळेच लोक दुर्बळ होऊन बसले होते? पण माणसें कांहीं कारणानें दुर्बळ झालीं असलीं तरी त्या वेळीं अलीकडच्याप्रमाणें या भरतभूमीचें पाणी ज्यांच्यांत खेळत

आहे, अशा मेघांचो आकाशामध्यें संचारण्याची चाल होती ना? त्या आर्द्र अंतःकरणांच्या मेघांच्या अंगांत इतकें पाणी असतांना ते या अन्यायाच्या अग्निप्रलयाकडे अगदीं उदासीनपणानेंच पहात होते? त्यांचीं अंतःकरणें फाटलीं कशीं नाहींत? आणि त्यांनीं निदान आपल्या अश्रुधारांनीं तरी ती आग विझवली कशी नाहीं? --अथवा, भासा, तुझें अनुकरण करणाऱ्या कालिदासानें म्हटल्याप्रमाणें 'धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः' अशा जड स्वरूपाचा जो मेघ, त्याच्यामध्यें इतकी तेजस्विता कोठून असणार? कारण, त्याची सगळी तेजस्विता विजेपासून उसनी आणलेली!

पण त्याला ही गोष्ट कदाचित् समजली नाहीं, तरी त्या वेळीं आकाशामध्यें संचार करणारे यक्ष, गंधर्व, किन्नर, सिद्ध, विद्याधर, हे कोणी नव्हतेच काय? सिद्ध, विद्याधर, इत्यादिकांचीं चरित्रें, हे भासा, तूं वर्णन केलेलीं नाहींस काय? आणि ह्या वर्णनांच्या माधुर्यानें मोहित झालेले यक्ष, गंधर्व अमृतपान थांबवूनही तुझ्या मधुरतर कविता सुस्वर आवाजावर गात असतांना, हा मंजुळ आवाज कोठून येत आहे हें पाहण्याकरितां चकित झालेल्या मनुष्यांनीं पृथ्वीतलावरून आकाशाकडे नेत्र थोडे वेळां लाविले आहेत काय? असें असतांना त्यांनीं तुझ्या काव्यांचें संरक्षण करण्याकरितां कांहीं देखील प्रयत्न कसे केले नाहींत? शकुंतलेला ज्याप्रमाणें मेनकेनें एकदम उचलून आकाशांत नेलें, त्याप्रमाणें त्यांनीं आपलीं विमानें खालीं उतरवून त्यांत तुझी कविता बसवून स्वर्गलोकांत नेऊन ठेविली असती, तर पुण्यवान् सहृदयांना तेथें तरी तिचा आस्वाद घ्यावयाला सांपडला असता! पण तसें कोणींच कांहीं केलें नाहीं!

पण कदाचित् आकाशांतील त्या इंद्राच्या कचेरींतील स्तुतिपाठकांना पृथ्वीतलावरील माधुर्याचें महत्त्व वाटलें नसेल. परंतु हे वनदेवतांनो आणि जलदेवतांनो! तुम्ही पृथ्वीवरील देवता ना! तुम्हाला पृथ्वीवरील आनंदाचा अभिमान वाटावयाला नको काय? मग तुम्ही त्या वेळीं कशी उपेक्षा केली? तुम्ही कशा स्वस्थ बसलां? शिवाय भासाच्या कवितेमध्यें जें सौंदर्य होतें, तें कोणाचें होतें? तें तुमचेंच होतें! त्यानें आपल्या काव्यांतील मधुरता कोठून आणिली होती? त्यानें ती तुमच्यापासूनच घेतलेली होती! त्याच्या काव्यांचा नाश हा तुमचाच नाश होय, हें तुम्हा मूढांच्या कसें

लक्षांत आलें नाहीं ? भासाच्या काव्यांतील सौंदर्याच्या संरक्षणाकरितां नव्हे, तर तुमच्या स्वतःमधील सौंदर्याच्या वर्णनाच्या संरक्षणाकरितां तरी तुम्ही कांहीं करावयाला पाहिजे होतें ! —तुमचें महत्त्व कोण वाढवितो ? चांगला कवि हा तुमच्या कीर्तीला कारणीभूत होतो. तुमची सर्व सृष्टि ही बोलूनचालून अचेतन ! तिच्यामध्यें सरसतेचें चैतन्य कोण उत्पन्न करितो ? कवि ! आणि त्याच्यावर त्याचीं काव्यें जाळण्याचा प्रसंग आला असतां तुम्ही तटस्थ ! असें होऊं लागलें, तर नवीन कवि होण्याची इच्छा धारण करण्याला कोण तयार होईल ! हे कृतघ्न वनदेवतांनो आणि जलदेवतांनो ! तुमच्या अंगामध्यें परमेश्वरानें आम्हां मनुष्यांपेक्षां देवतारूपानें जी जास्त शक्ति ठेविली आहे, ती कशासाठीं ? योग्य प्रसंगींही अशी उपेक्षा करण्यासाठीं आणि उदासीनपणा दाखविण्यासाठीं होय ? दुष्ट हात जेव्हां भासाचीं काव्यें जाळूं लागले असतील, तेव्हां तुम्ही सृष्टीमध्यें भयंकर उत्पात कां उत्पन्न केले नाहींत ? तुम्ही अंतरिक्षांत वादळें आणि जमिनीवर धरणीकंप ह्यांचा कहर कां करून सोडला नाहीं ? भासानें तुमच्यांतील सृष्टिसौंदर्याचीं जीं इतकीं हृदयंगम वर्णनें केलीं, त्याबद्दल त्याला किती श्रम पडले असतील, यांची तुम्हांला कल्पना तरी आहे काय ? बिचारा तुंग पर्वताच्या शिखरावर चढला असेल, आणि तेथें एखाद्या नवशाद्वल भूमिकेवर अथवा पर्जन्यधूत शिलातलावर बसून त्या पर्वताचे सुळके गगनोदराला कसे टोंचीत आहेत, कडे कसे तुटलेले आहेत, खोल दऱ्या कशा लांबवर पसरल्या आहेत, त्यांतून अरण्यें कशीं वाढलीं आहेत, पाण्याचे धबधबे कसे पडत आहेत, नद्यांचे उगम कसे होत आहेत, नवीन मेघांची रचना कशी बनत आहे, इत्यादि सृष्टिसौंदर्याचे अत्यद्भुत देखावे तल्लीन मनानें पहात असतां तदाकार वृत्ति होऊन, बाहेरचें कांहीं दिसेनासें होऊन, आणि बाहेरच्या सर्व देखाव्यांचें चित्र अंतर्यामामध्यें प्रतिबिंबित होऊन, त्यापासून उत्पन्न होणाऱ्या अद्वितीय आनंदाचा आस्वाद घेत देहभान विसरून बिचारा दिवसच्या दिवस ध्यानस्थ राहिला असेल ! एखादें फूल पाहिलें, म्हणजे त्याचें कौतुक करीत तो तेथेंच बसला असेल ! हिरवीगार वनश्री पाहून त्यांच्या प्रकृतींतील सत्त्व, रज, आणि तम यांचे रंगही हरितवर्ण झाले असतील ! कोकिळेचा आवाज ऐकून ती कोकिळा कोणत्या झाडाच्या

झाडीवर बसून हें मधुर गायन करीत आहे, हें पाहण्यासाठीं तो वेड्या-सारखा किती तरी ठिकाणीं फिरला असेल! मेघ, विजा, पाऊस, यांचीं वर्णनें हुबेहुब करतां यावीं, म्हणून पावसांतून किती तरी वेळां तो भिजला असेल! चकोर चंद्रकिरण कसे प्राशन करीत आहेत, आणि मेघोदकांनीं चातकांची तृषा कशी शांत होत आहे, हें आकाशाकडे टक लावून पहात असतांना त्याची मान किती तरी वेळां खुडी झाली असेल! तो रात्रीच्या अंधकारांतून मुद्दाम एकटाच फिरला असेल! मित्रांची संगति कितीही सुखकर असली, तरी सुद्धां एकांताशिवाय सृष्टिसौंदर्याशीं आपली एकतानता बरोबर होणें शक्य नाहीं, तें लक्षांत आणून त्या मित्रांना चुकवून तो एकटाच किती तरी वेळां अरण्यांतील डोंगरांपाशीं आणि वृक्षांपाशीं कवींच्या रसात्मक भाषेंत बोलत उभा राहिला असेल! तो जलाशयांच्या कांठीं बसला असेल, आणि त्यांत प्रतिबिंबित झालेलीं सभोंवतालच्या वनश्रीचीं चित्रें पाहण्यांत त्यानें प्रहरच्या प्रहर घालविले असतील!

परंतु इतकीं संकटें सोसून अखेरीस सगळें व्यर्थ झालें! भासा, तूं कवि होऊन ह्या अचेतन आणि अकृतज्ञ अशा सृष्टिसौंदर्याचें वर्णन करीत बसलास, त्यापेक्षां एखादा भगवद्भक्त होऊन त्या करुणाघन प्रभूचें कीर्तन करीत बसला असतास, किंवा एखादा योगयुक्त वेदान्ती होऊन त्या चैतन्य-घन परमात्म्याचा अपरोक्ष अनुभव घेत बसला असतास, तर त्यांनीं तुला अशा संकटकालीं खात्रीनें दगा दिला नसता! पण तूं तरी काय करणार? पूर्वजन्मींचे संस्कार मनुष्याला त्या त्या विषयाकडे ओढून नेत असतात. तुझ्या पूर्वकर्मानुसार तुला बुद्धि झाली. तुझ्या पूर्वजन्मीं तूं आपल्या-पूर्वींच्या कवींचीं काव्यें वाचलीं असशील, आणि सृष्टिसौंदर्यें अवलोकन करीत बसला असशील, त्याचा हा परिणाम असला पाहिजे! त्याच्याबद्दल आतां तुला पश्चात्ताप वाटत असेल! पण तो आतां फार उशिरां होय!

भासा, तुझ्यावरील संकटांबद्दल तूं अजून सुद्धां शोक करीत अस-शील! अजून सुद्धां तुझ्या डोळ्यांतील अश्रु वाळले नसतील! भासा, तुला हें जग सोडून गेल्याला किती वर्षें लोटलीं हें ठरविण्याचा पुष्कळ लोक प्रयत्न करीत आहेत; परंतु अद्यापि निश्चित असें कोणालाच कांहीं सांगतां येत नाहीं. कोणी तुला ख्रिस्ती शकाच्या मागें ढकलीत

आहेत, तर कोणी तुला खिस्ती शकाच्या पुढें ओढीत आहेत! अशी तुझ्यासारख्या चांगल्या कवीची ओढाताण होत असलेली पाहून कोणा सहृदय मनुष्याचें हृदय फाटणार नाहीं! तुझीं नाटकें उपलब्ध असतीं, तर असा प्रसंग कां आला असता! पण सामान्यतः बोलावयाचें असेल, तर तुला आज सुमारें दोन हजार वर्षें झालीं असलीं पाहिजेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. इतकीं दोन हजार वर्षेंपर्यंत तुझा आत्मा तळतळत राहिला असेल! इतक्या दीर्घ दुःखाची कल्पना देखील करवत नाहीं. भासा, तुझीं काव्यें जाळल्यानंतर तुला दुसरा तिसरा कांहीं सुद्धां रोग झाला नसेल! केवळ त्या दुःखाच्या असह्य वेदनांनींच तुझा प्राणान्त झाला असला पाहिजे. आणि अवशिष्ट आयुष्याच्या जिवंतपणीं जसा तुझा देह झुरत असेल, तसाच मरणोत्तरकालीं तुझा आत्मा झुरणीस लागला असेल! तुझ्यासारखा धर्मशील आणि पुण्यवान कवि मेल्याबरोबरच मोक्षाला जावयाचा. परंतु तें भाग्य तुला अजूनही लाभलें नसेल. तुझा हेतु खात्रीनें गुंतून राहिलेला असेल. जिवंतपणीं "माझीं नाटकें! माझीं नाटकें!" म्हणून ज्याप्रमाणें तूं धाय मोकलीत असशील, त्याचप्रमाणें त्या तुझ्या जड देहाच्या कोशांतून मुक्त झाल्याबरोबर तुझ्या लिंगदेहांतील तो तुझा आत्मा आपल्या अश्रवणीय वाणीनें "माझीं नाटकें! माझीं नाटकें!" असे तेच शब्द फिरून उच्चारूं लागला असेल! आणि सूक्ष्मदेह ज्या लोकामध्यें राहतात, त्या लोकामध्यें प्रथमच नवीन राहण्याकरितां गेलेल्या तुझ्या लिंगदेहांतील आत्म्यानें आपल्या काव्यासंबंधींच्या करुण विलापांनीं तेथील अपरिचित अशा रहिवाश्यांना देखील रडविलें असेल! आणि पुढें तेथें राहूं लागल्यावर तुझ्या आत्म्याचा परिचय झाला असला, तरी तो कोणाशीं झाला असेल? त्याचे तेथील प्रथम परिचयाचे स्नेही कोण बनणार? ज्यांनीं 'पुत्र! पुत्र!' करीत इहलोकीं प्राण सोडले असतील, आणि जे तिळांजळींतील जलकणांसाठीं परलोकीं तृषाक्रांत झालेले असतील, अशा समानदुःखी आत्म्यांशींच तुझ्या आत्म्याची पहिली ओळखदेख जमली असेल! कृष्ण आणि कृष्णद्वैपायन यांच्या कृपेनें धृतराष्ट्र आणि गांधारी हीं उद्धरून गेलीं नसतीं, तर पुत्रशतनाशाच्या दुःखानें तळमळणाऱ्या त्यांच्या आत्म्यांशीं तुझ्या आत्म्याचें चांगलेंच सख्य जुळलें असतें! तुझ्या और्ध्वदेहिक क्रियेमध्यें तुला ज्या वेळीं पिंड देण्यांत

तिला वास्तविक नऊ महिने पुरे झालेले होते; परंतु कल्पनेची एक चूक झाली, म्हणजे दुसरी होण्याला फारसें अवघड पडत नाहीं, या नियमाप्रमाणें गिरजाबाईची अशीही दृढ समजूत झालेली होती कीं, नऊ महिन्यांच्या आधींच हिनें मुद्दाम गर्भपात करून घेतला असला पाहिजे! तिनें मुद्दाम कांहीं माणसें ठेवून या दोघांच्या हालचालींवर बारीक टेहळणी ठेविलेली होती, त्यावरून मूल कोठें नाहींसें झालें आहे, व भोलानाथ हा एका भिकाऱ्याच्या रूपामध्यें आपलें वेषांतर करून घेऊन एका क्षेत्रांतील एका मठांत राहिलेला आहे, अशी बातमी तिला कळली. ही बातमी कळतांच आपल्या पूर्वीच्या कुकल्पनेचें संविधानक तिनें शेवटपर्यंत अगदीं बरोबर जमविलें! मूल जर कोठें नाहीं, तर तें मारलेंच गेलें असलें पाहिजे; आणि भोलानाथ जर भिकाऱ्याचा वेष घेऊन एका मठांत दडून बसला आहे, तर या गर्भपाताच्या शासनाच्या भीतीशिवाय असें करण्याला त्याला दुसरें कारण काय असूं शकणार आहे? असे सर्व धागे संगतवार जुळल्यासारखे वाटून ती मत्सराची प्रत्यक्ष मूर्तीच जी गिरजाबाई, तिनें आपल्या नवऱ्याचें हें अन्यगामी प्रेम आपल्यावर दुर्लौकिकाच्या धास्तीनें तरी परत येऊन बसावें या हेतूनें ती गोष्ट राजदरबारीं कळविली. पूर्वीचे ते जुन्या काळचे दरबार! त्यांत एवढा बारीकसारीक न्याय अन्याय कोण पाहतो? चोर सोडून संन्याशाला सुळावर देण्याची म्हणही तेव्हांपासूनच पडलेली आहे! ती कांहीं अलीकडची नव्हे!

× × ×

सकाळची वेळ होती. आकाशांतील नक्षत्रें अर्धवट दिसेनाशीं झालेलीं होतीं. पूर्व दिशा किंचित् आरक्त झालेली होती. निरनिराळ्या वृक्षांमधून पक्ष्यांचे मंजुळ ध्वनि ऐकूं येत होते; आणि सकाळच्या मंद वाऱ्याची बारीक झुळूक हवेमध्यें तरंगत होती. बरेच दिवस अंधारकोठडीच्या तळघरांत राहून अशा वेळीं एकदम हें विश्वसौंदर्यदर्शन झाल्यामुळें त्या हतभाग्य भोलानाथाच्या मनाची किती उल्लसित वृत्ति झाली असेल, याची कल्पना करणें फारसें कठिण नाहीं. ज्या क्षेत्राच्या ठिकाणीं तो रहात होता, तेथील नदीजवळच्याच एका उंच पहाडामधून निघालेली होती. आणि त्या नदीचा त्या पहाडांत जेथें उगम झालेला होता, त्याच्या वरच फार उंच

गेलेल्या अशा एका डोंगराच्या सुळक्यावर एक प्रचंड, विस्तीर्ण आणि मजबूत असा किल्ला बांधलेला होता. त्या किल्ल्याच्या अंधारकोठडींत आपल्या कडेलोटाच्या दिवसाची वाट पहात भोलानाथ कित्येक दिवस कुजत पडलेला होता. अखेरीस तो दिवस एकदांचा उजाडला. पहारेकऱ्यांनीं अंधारकोठडीचीं कुलुपें काढलीं. दरवाजा उघडला. पायांतील शृंखळांचा आवाज अतिशय हृदयद्रावक रीतीनें उत्पन्न होऊं लागला. व तो हतभाग्य प्राणी त्या जड बेड्या उचलीत आणि हळूहळू पावलें टाकीत त्या कडेलोटाच्या टोंकाकडे जाण्याकरितां निघाला.

जेथून कडेलोट करावयाचा तो एक भयंकर तुटलेला कडा होता. वरून खालीं पाहिलें, तर पाहणाराची दृष्टि तळापर्यंत कधीं पोंचत नसे. खालच्या वाढलेल्या गवतांचे लाल गोंडे सोसाट्याच्या वाऱ्यानें अतिशय वर उडविले, तरी ते त्या दरींत मध्येंच कोठें तरी टोळासारखे तरंगत रहात असत. तळापासून उंच म्हणून उडणारे पक्षी देखील त्या कड्याच्या जेमतेम मध्यापर्यंत उडत येऊन थकून मध्येंच कोठें तरी बसत असत. या पक्ष्यांमध्यें बहुतेक गिधाडांचीच गर्दी फार असे. अशा त्या तुटलेल्या कड्याच्या समोरच कांहीं अंतरावर दुसरा एक डोंगराचा उंच सुळका वाढलेला होता. त्याच्याकडे पहात हातापायांत बेड्या घातलेला तो कैदी पहारेकऱ्यांची आणि अधिकाऱ्यांची कडेलोट करण्याची तयारी होईपर्यंत तटस्थ उभा राहिला होता. परंतु त्याच्या मनामध्यें मात्र विचारांची भयंकर खळबळ चाललेली होती. मरणसमयीं आपलें सगळें पूर्ववृत्त मनुष्याला दिसूं लागतें असें म्हणतात, तीच अवस्था त्याची या वेळीं झालेली होती. त्याचें सगळें विचित्र चरित्र त्याच्या डोळ्यांपुढें प्रत्यक्ष उभें राहिलें. तेव्हां तो आपल्या मनाशींच म्हणाला, "मला मरण येत आहे, ही फार आनंदाची गोष्ट आहे. जें मरण मला या संकटांतून सोडविण्याकरितां येत आहे, त्याचें मी मोठ्या मित्रभावानें स्वागत करतों. परंतु हीं संकटें तरी माझ्यावर कां आलीं ? मी असें केव्हां आणि काय केलें होतें, कीं ज्यासाठीं मीं अशा ह्या यातनांना पात्र व्हावें ? मीं आजन्म धर्माचरण केलें, आणि लोकांवर उपकार करण्यासाठीं मीं आपल्या स्वतःच्या सुखावर पाणी सोडलें ! असें असतां माझ्यावर हीं संकटें विनाकारण कां यावींत ? ज्यांचा उच्चारही करण्याची मला किळस येते, अशीं अघोर

आणि अमानुष पातकें केल्याचा आरोप मजवर कां यावा ? आणि त्याबद्दल मला देहान्त शासन कां मिळावें ? असें हें कां होत आहे ? आणि हें कोण करीत आहे ?"

हा शेवटचा प्रश्न त्याच्या मनामध्यें उद्भवत आहे, तोंच त्या कड्याच्या समोरच्या मुळक्यावर त्याला पूर्वी अनेक वेळां दिसलेली ती त्या कर्माधिकाऱ्याची आकृति दिसूं लागली. ती आकृति पूर्वी जेव्हां दिसे, तेव्हां ती सामान्य पुरुषाच्या आकाराची असे. या वेळींही प्रथमतः ती तेवढीच दिसली; पण पुढें हळूहळू ती वाढूं लागली. ती इतकी मोठी वाढली कीं, तिचे पाय त्या पहाडावर टेकलेले, तर तिचें मस्तक थेट आकाशापर्यंत पोंहोचलेलें ! अशी ती भव्य, प्रचंड आणि विराटस्वरूपी कर्माधिकाऱ्याची आकृति पाहून तो अगदीं विस्मित आणि क्रुद्ध झाला, व त्याच्याकडे पाहून म्हणाला, "अरे कर्माधिकाऱ्या, या वेळेसही तूं येथें आहेसच ! जेथें तेथें तूं माझी पाठ सोडीत नाहींस, असा तूं आहेस तरी कोण ? जी जी माझी संकटाची वेळ, त्या त्या वेळीं माझ्या वैऱ्याप्रमाणें मला चिडविण्याकरितां नेमका तूं माझ्यापुढें येऊन उभा राहतोस, याचा अर्थ तरी काय ?" यावर त्या कर्माधिकाऱ्याच्या त्या आकृतीनें असें उत्तर दिल्याचा भास झालाः– "माझें नांव कर्माधिकारी, म्हणून मीं तुला पूर्वी सांगितलेंच आहें. ज्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें त्या त्या प्राण्याला फळ देण्याचा अधिकार माझ्याकडे सोंपविण्यांत आलेला आहे ! मी तुझें कर्म आहें ! तसेंच तो उपाध्या, तो तुझा दत्तक बाप, ती तुझी दत्तक आई, ती तुझी बायको, तो तुझा नवीन भाऊ, हीं सगळीं अंशतः अंशतः तुझ्या कर्मांचीं फळें आहेत ? ज्यांच्यापासून जसजसें सुखदुःख प्राप्त व्हावयाचें असतें, तसतसें कर्मानुसार योगायोग जुळून येत असतात ! तेव्हां हें सारें तुझेंच कर्म आहे, आणि त्या कर्मांचीं फळें तुला भोगिलीं पाहिजेत !"

प्रश्नः—पण अशीं भयंकर फळें भोगण्याला मीं अशीं भयंकर कर्में तरी काय केलीं होतीं ! मीं कोणाच्या द्रव्याचा अपहार केला होता, कीं ज्यासाठीं इतकीं भुतें माझ्या अंगावर चवताळून यावींत ? आणि मीं कोणाचा प्राणघात केला होता, कीं ज्यासाठीं मला ही कडेलोटाची शिक्षा प्राप्त व्हावी ?

उत्तरः—या यातनांना पात्र होण्यासारखींच कृत्यें तुझ्या हातून जन्मान्तरीं झालेलीं आहेत !

प्रश्नः—हें मीं कशावरून समजावें ? माझ्या इहजन्मीच्या आचरणावरून आणि मनःप्रवृत्तीवरून अशीं कृत्यें माझ्या हातून पूर्वी झालीं असतील असें मला वाटत नाहीं. आतां जर माझ्या हातून पूर्वजन्मीं अशीं घोर पातकें झालेलीं असतीलच, आणि या जन्मीं मला जर त्यांबद्दल शासन द्यावयाचेंच असेल, तर मला त्या माझ्या पूर्वपातकांबद्दल या वेळीं तरी निदान स्मृति करून द्यावयास नको काय ? अगदीं अतिशय अन्यायी न्यायाधीश असला, तरी देखील 'तूं अमुक ठिकाणीं, अमुक वेळीं, अमुक अन्याय केलास, म्हणून त्याबद्दल मी तुला ही शिक्षा देतों', असें तो सांगतो. आणि असें असून परमेश्वरासारख्या न्यायी राजाच्या राज्यकारभारामध्यें इतकी अंदाधुंदी असावी ? गुन्हेगाराला शिक्षा मात्र चोपून मिळावी, पण गुन्हा काय तो मात्र कोणीही त्याला सांगूं नये, सर्वांनीं कानांवर हात ठेवावे, आणि मूग गिळून बसावें, आणि शिक्षा देणाराचें मोफत वकीलपत्र घेऊन कोणी वकिली करूं लागलाच, तर "तूं शिव्या दिलेल्या नसल्यास तर तुझ्या बापानें दिलेल्या असतील ! कारण, एरवीं न्यायी लांडगा तुला खाईल कसा ?" या लांडग्याच्या गोष्टीप्रमाणें इहजन्मीं हातून पातक घडलें नसलें, तर तें पूर्वजन्मीं घडलें असलें पाहिजे', अशा प्रकारचें आनुमानिक सिद्धांत त्यानें ठोकून द्यावें, हें आश्चर्य नव्हे काय ? तसेंच, पूर्वजन्मीं मीं कांहीं घोर पातक केलें, असें क्षणभर कबूल केलें, तरी त्या वेळीं तरी मला तसें करण्याची बुद्धि कां झाली ? आणि सत्कर्म करण्याचीच बुद्धि मला कां झाली नाहीं ? 'त्याच्या पूर्वींच्या कर्मांचें तें फळ होय', असें तूं म्हणशील, तर तें पूर्वींचें कर्म तरी माझ्या हातून कां घडलें ? ही अशी कारणपरंपरा तुम्ही मागें कोठपर्यंत ढकलीत नेणार ? आदिकारणाच्या परंपरा अज्ञेय किंवा दुर्ज्ञेय अशा ढगांच्या आड दडवून ठेवून पुढील परिणामाबद्दल मात्र गरीब बिचाऱ्या जीवकोटींतील प्राण्यांना जबाबदार धरून त्यांच्यावर नाहक जबर शिक्षेची अंमलबजावणी करावी, आणि अशा रीतीनें त्यांची तोंडें दाबून धरून त्यांना बुक्क्यांनीं यथास्थित मार द्यावा, ही कोणती नीति आहे, हें मला समजत नाहीं. हे कर्माधिकाऱ्या, या माझ्या

शंकेचें तूं समाधान करशील, तर मी ही कडेलोटाचीच शिक्षा काय पण याच्यापेक्षां तुझ्या कर्मांच्या शस्त्रागारांत सहस्रपट जास्त भयंकर शिक्षा असल्या, तरीही त्या मी मोठ्या आनंदानें सोशीन !

उत्तरः—नाहीं! या शंकेचें समाधान माझ्यापाशीं नाहीं! मला एवढेंच माहीत आहे, कीं मनुष्याला सुख मिळतें त्या वेळेला हें माझ्या कोणत्या जन्मीच्या कर्माचें फळ आहे, याच्या स्मरणाची अपेक्षा बाळगण्याला तो कधीं थांबत नाहीं, तर दुःखाच्या वेळींच त्यानें हे आक्षेप कां काढावे ?

असें म्हणून ती त्या कर्माधिकाऱ्याची आकृति वातावरणामध्यें वितळून नाहींशी झाली! तें पाहून व त्याचे ते शेवटचे सुयांसारखे टोचणारे शब्द ऐकून "निष्ठुर! निष्ठुर!!" असे उद्गार त्याच्या तोंडून निघाले. हे उद्गार निघत आहेत, तों पहारेवाल्यांची सर्व तयारी झाली. त्याचे डोळे बांधले गेले. तुटलेल्या कड्याच्या कांठावर त्याला नेऊन उभें करण्यांत आलें. त्यानें 'राम राम' म्हणून मोठ्यानें देवाचें नांव घेतलें. आणि त्याला त्या क्षणीं कड्याच्या खालीं ढकलून देण्यांत आलें!

---

# दुसरी एक वेदांतविषयक गोष्ट

## माया

फार पुरातन काळच्या एका कल्पांतली गोष्ट आहे. त्या वेळीं एकदां जिकडे तिकडे प्रलय होऊन अनेक वर्षें लोटून नवीन सृष्टीच्या रचनेची वेळ समीप येऊन ठेपलेली होती. तेव्हां मागील मन्वंतरांच्या पद्धतीप्रमाणें प्रथम श्रीभगवान् विष्णूच्या नाभिकमलांतून ब्रह्मदेव उत्पन्न झाले. आणि त्यांनीं आपल्या मनापासून उत्पन्न केलेल्या एका मनूला जवळ बोलावून सृष्टि

उत्पन्न करण्याविषयीं त्याला आज्ञा केली. ती आज्ञा शिरसावंद्य मानून मनु आपल्या उद्योगाला लागला. पावसाळा संपला म्हणजे भेंड्या, दोडकीं, पडवळें वगैरेच्या वाळलेल्या बिया पुढल्या वर्षींच्या पावसाळ्याच्या प्रारंभीं पेरण्याकरितां ठेवण्याची जशी सामान्य प्रापंचिकांची वहिवाट आहे, तशीच वहिवाट ब्रह्मदेवाच्या घरींही असते. त्या वहिवाटीबरहुकूम मागच्या सृष्टींतील सर्व जिनसांच्या बियांच्या पुड्या ब्रह्मदेवानें नीट जपून ठेविल्या होत्या. त्या पुड्या नवीन जग निर्माण करण्याच्या अत्युत्कट लालसेमुळें मोठ्या लगबगीनें गोळा करून घेऊन मनु निघाला, व आपल्या ठिकाणीं येऊन तो जगदुत्पत्तीच्या कामाला बसला. पण या गडबडींत त्याच्या हातून मायेची एक पुडी खालीं पडून कोठें गहाळ झाली, ती त्याच्या लक्षांत आली नाहीं. पुढें एक एक बियांची पुडी घेऊन आपण मृगनक्षत्राच्या सुमारास जसें बीं पेरतों, त्याप्रमाणें इतस्ततः बीं फेंकून तो एक एक जातीची सृष्टि निर्माण करूं लागला. तेव्हां हळूहळू या सृष्टींतील जिनसांची संख्या वाढत जाऊं लागली. पृथ्वी स्थिर झाली, जल वाहूं लागलें, अग्नि पेटूं लागला, वायु वाहूं लागला, आणि आकाश या सगळ्यांना व्यापून राहूं लागलें. बहुतेक जड सृष्टि तयार झाली. पृथ्वीच्या पाठीवर पाषाण, डोंगर, पर्वत हे बनले गेले. आणि पृथ्वीच्या गर्भाशयामध्यें सुवर्ण, रजत, लोह इत्यादि सर्व प्रकारच्या धातूंची गर्भधारणा झाली. लहान तृणापासून तों गगनचुंबी वृक्षापर्यंत सर्व प्रकारच्या अठराभार वनस्पति पृथ्वीच्या पोटांतून वर डोकावूं लागल्या. जलामध्यें जलचर प्राणी पोहूं लागले. भूचर प्राणी अरण्यांत जाऊन आपल्याला राहण्याला योग्य अशीं ठिकाणें पाहूं लागले. आणि नानाविध पक्षी आकाशामध्यें निरतिशय आनंदांत निमग्न होऊन तरंगूं लागले. आकाशांत सूर्य-चंद्र प्रदक्षिणा घालूं लागले. सूर्याच्या मर्जीचा कल पाहून नक्षत्रेंही आकाशामध्यें डोकावूं लागलीं. आणि अशा रीतीनें ही बहुतेक पूर्वतयारी झाल्यानंतर या विश्वनाटकांतील मुख्य गौण-पात्र, जो मनुष्य, त्याचीही मनूनें उत्पत्ति केली. सगळी सृष्टि कांहीं विवक्षित वेळामध्यें करण्याविषयीं मनूला हुकूम झालेला होता. परंतु ही बाकीची जड आणि अर्धवट जड सृष्टि निर्माण करण्यांतच त्याचा पुष्कळसा वेळ गेल्याकारणानें मनुष्य प्राण्याची उत्पत्ति करण्याला वेळ थोडी उरल्यामुळें त्याची फार धांदल झाली. आणि

त्या धांदलीचा परिणाम बऱ्याच मनुष्य लोकांना भोगावा लागला. त्या धांदलींत मनुष्यरचनेच्या कामीं मनूची इतकी गडबड उडाली कीं, तो कोणाला हात द्यावयाचा विसरला! कोणाचा पायच लावावयाचा त्याच्या हातून राहिला! कोणाला एकच डोळा मिळाला, तर कोणाच्या दोन्ही कानांत ऐकण्याचीं यंत्रें बसविण्याचींच अजिबात राहून गेलीं! कोणाच्या हाताला मुळींच बोटें मिळालीं नाहींत, तर कोणी कोणी आपल्या एकेका हाताला अधाशीपणानें सहा सहा बोटें चिकटवून घेतलीं! कोणाच्या तोंडाच्या वांटणीला एक एक जीभ सुद्धां येण्याची मुष्कील पडली, तर कोणी भावी फायद्यासाठीं दोन दोन जिभा उपटल्या! कोणाला नाक नाहीं, तर कोणाच्या डोळ्याच्या बाहुल्याच उलट्या बसविल्या गेल्या! असे अंदाधुंदीचे आणि धांदलीचे प्रकार एक का दोन म्हणून सांगावे! तरी पण एकंदर इतक्या मोठ्या कामाच्या मानानें असे कांहीं दोष गडबडीनें राहून गेले असले, तरी ते अगदीं क्षम्य आहेत, यांत शंका नाहीं.

असो; असे कांहीं किरकोळ दोष वगळले असतां बाकीच्या सर्व सृष्टीच्या उत्पत्तीचें काम मनूच्या हातून बऱ्याच चांगल्या रीतीनें एकदांचें शेवटास गेलें. जारज, अंडज, उद्भिज आणि स्वेदज, अशी चारी प्रकारची सृष्टि तयार झाली. चौऱ्यायशीं लक्ष योनींची सिद्धता झाली, मनुष्य, तिर्यक्, पशु, वनस्पति, इत्यादि सर्व कोट्या अस्तित्वांत आल्या. आब्रह्मस्तंबपर्यंत सर्व रचना यथास्थित झाली. मग कांहीं उत्पन्न करावयाचें उरलें तर नाहीं ना, हें पाहण्यासाठीं म्हणून मनूनें नवीन सृष्टींतील सर्व जिनसा तपासून पाहिल्या. आणि त्या तपासणीमध्यें कोठें कांहीं चूक आढळून येत नाहीं, अशी आपल्या मनाची चार चार वेळां खात्री करून घेऊन, नंतर आतां या जगाचा व्यवहार सुरू करून देण्यास कांहीं हरकत नाहीं, असें समजून एके दिवशीं सकाळीं सर्व लोकांच्या समजुतीकरितां त्यानें ठिकठिकाणीं एक जाहिरनामा प्रसिद्ध केला. त्या जाहिरनाम्यांत पुढीलप्रमाणें मजकूर होताः—

"सर्व मानव हो, श्रीभगवान् विष्णूच्या आज्ञेबरहुकूम मीं हें जग तुमच्याकरितां निर्माण करून दिलें आहे. या जगांत तुम्ही आनंदानें रहा! येथील सर्व पदार्थ तुमच्या उपभोगाकरितां मीं निर्माण करून दिले आहेत.

त्यांचा उपभोग घेऊन तुम्ही या जगताचा व्यवहार यथापूर्व अव्याहतपणें पुढें चालूं ठेवा!"

हा जाहिरनामा तमाम लोकांना वाचून दाखवून आतां लोक आप-आपल्या व्यवहाराला लागतील, अशा समजुतीनें तो कांहीं दिवस विश्रांति घेण्याकरितां स्वस्थळीं गमन करता झाला. जाते वेळीं "तुम्ही आपलें संसारचक्र पूर्वयुगांतल्याप्रमाणें बरोबर रीतीनें चालवीत आहां किंवा नाहीं, हें पाहण्याकरितां मी विश्रांति घेऊन झाल्यावर आणखी कांहीं कालानंतर तुम्हांला आपल्या दर्शनानें आनंदित करीन!" असें त्यानें आश्वासन दिलें, व त्या मुदतीमध्यें हें संसाराचें रहाटगाडगें कसें काय चालतें, याच्यावर नजर ठेवण्याचें काम त्यानें नारदाकडे सोंपविलें.

अशी सर्व व्यवस्था करून मनु विश्रांति घेण्याकरितां गेला होता. परंतु त्यानें तयार केलेलें तें लोकांचें संसाराचें गाडें चालू होईना. अली-कडच्या यंत्रांच्या गोष्टी आपणांला माहीतच आहेत. एखाद्या कारागिरानें एखादें उत्तम घड्याळ तयार केलें आणि त्यांत स्प्रिंग घालावयाची तो विसरला, तर तें घड्याळ चालत नाहीं. यंत्रामधील प्रत्येक भाग जेथल्या तेथें बरोबर असल्यावांचून त्या यंत्राची घडगत नाहीं. एखादें आगगाडीचें एंजिन नीट रीतीनें तयार झालें; पण त्यांत वाफ उत्पन्न करण्याची तेवढी राहिली, तर तें एंजिन चालणार आहे काय? तशीच अवस्था मनूच्या या एंजिनाची झाली! मनूच्या या संसारचक्राला गति मिळेना! जो मनुष्य पहावा, तो आपला विरक्त आणि उदासीन! हें संसाराचें गाडें चाल-विण्याला कोणीही इसम तयार होईना! जो तो म्हणे कीं, "हे फुकट खटाटोप करून करावयाचें आहे काय?"

ही सार्वजनिक मनःप्रवृत्ति बदलण्याकरितां नारदानें आपल्याकडून पुष्कळ उपाय केले. निरनिराळ्या प्रकारचीं रूपें धारण करून व निर-निराळ्या लोकांमध्यें मिसळून त्यांना या नवीन मन्वंतराच्या बाजारांतील जिनसांची गोडी लावण्याकरितां तो अनेक युक्त्या करूं लागला. एके ठिकाणीं त्यानें लोकांना घरेंदारें बांधून राहण्याचा मोठ्या कळकळीनें उपदेश केला, परंतु त्या उपदेशाच्या पाण्याचा एक थेंब देखील त्यांच्या डोक्याच्या

पालथ्या घड्यामध्यें शिरला नाहीं. उलट, ते नारदालाच असे प्रश्न विचारूं लागले कीं, " हीं घरेंदारें करून करावयाचें आहे काय ? रानांतील लांकडें तोडून आणा, आणि तीं आयतीं चांगलीं जाडजूड असतात, तीं झोडून व तासून त्यांच्या बारीक काटक्या करा, आणि मग एखाद्या चिमणीच्या घरट्याप्रमाणें त्या लोखंडाच्या खिळ्यांनीं एकमेकांला चिकटवा; याच्यावांचून काय खोळंबलें आहे ! जी माती जमिनीवर आयती सपाट पसरलेली आहे, तिचे गोळे एकावर एक रचून मुद्दाम तिला सरळ रेषेमध्यें उभी करावयाची, आणि तिची कंबर मोडून ती खालीं पडेपर्यंत तिला तिष्ठत उभी ठेवावयाची, यांत काय अर्थ आहे ? त्याच्यापेक्षां घरेंदारें नसलीं, म्हणून आमचें काय अडलें आहे ? हा सूर्य आहे ! हा चंद्र आहे ! हें विस्तीर्ण आकाश आहे ! हा वायु वाहत आहे ! हें अफाट पृथ्वीतल आहे ! येथें आम्ही खुशाल आनंदानें राहूं ! हे अरण्यांतील पशु आणि आकाशांतील पक्षी नाहीं का तसेच रहात ? त्यांनीं कोठे माड्या आणि राजवाडे बांधले आहेत ? " हा युक्तिवाद ऐकून खजिल होऊन नारद तेथून निघाला आणि दूरवरच्या दुसऱ्या एका लोकामध्यें वेषांतर करून शिरून तेथें संपत्तीसंबंधाचे सोनें, चांदी, वगैरे जे अनेक प्रसिद्ध प्रकार त्यांच्याकडे त्यांचीं मनें वळविण्याचा तो प्रयत्न करूं लागला. पण या ठिकाणीं या कामांत तर त्याची मुळींच डाळ शिजेना. लोक म्हणाले, " तुम्ही ज्याला सोनें म्हणत आहां, तें वास्तविक काय आहे ? बाकीची माती जशी तांबडी किंवा काळी असते, तशी ही एक पिवळ्या रंगाची माती आहे ! तसेंच, ही दुसरी पांढऱ्या रंगाची माती आहे ! काळ्या रंगाची माती आम्ही पायांखालीं रोज तुडवीत असतां ही पिवळ्या किंवा पांढऱ्या रंगाचीच माती कणगे लावून कोण कशाला सांठवून ठेवील ! " असा नारदाचा जागोजाग हिरमोड होऊं लागला ! संसारांतील ज्या ज्या वस्तूंची तो लोकांपुढें तारीफ करूं लागला, ती ती वस्तु निरुपयोगी किंवा अनावश्यक आहे, असें लोक उलट प्रतिपादन करूं लागले. अखेरीस त्याला स्त्रियांच्याबद्दल मोठी आशा वाटत होती; आणि त्या तरी निदान पुरुषांना आवडतील अशी त्याला खात्री वाटत होती. परंतु " ह्या स्त्रिया कोणी कशाकरितां उत्पन्न केल्या आहेत ? ह्या कोणाला पाहिजे होत्या ? शिव शिव ! काय घाण ही ! रक्त, मांस, आणि हाडें एका कातड्याच्या पिशवींत घालून हीं कोणाकरितां पाठविलीं आहेत ? ह्याचा

उपयोग काय? असल्या स्त्रियांवर कोण भुलून पडणार आहे?" अशी जेव्हां स्त्रियांच्यासंबंधाची अश्रुत आणि अनपेक्षित मीमांसा पुरुषांच्या तोंडून नारदाच्या कानांवर आली, तेव्हां तर त्याची कंबरच खचून गेली. त्याला खात्रीनें वाटलें कीं, या जगांत कांहीं तरी भुताटकीचा प्रकार शिरला असला पाहिजे. आणि आतां याबद्दलची वर्दी मनूला दिल्यावांचून सोय नाहीं, असें जाणून तो तावडतोब मनूकडे आला. आणि मनूच्या विश्रांतीची मुदत संपण्याला अद्यापि जरी कांहीं थोडे दिवस अवकाश होता, तरी कामाचें महत्त्व लक्षांत आणून नारदानें मनूची गांठ पडावी, म्हणून मागणी केली; आणि त्याप्रमाणें दर्शन होतांच नारदानें सृष्टींतील अव्यवस्थेची समग्र हकीकत मनूपाशीं निवेदन केली.

नारद म्हणालाः—"हे मनो, काय सांगावें! आपण एवढ्या कष्टानें ही सृष्टि निर्माण केली, परंतु ती कांहीं चालत नाहीं, हें आपल्यांला कळविण्याला मला अतिशय खेद वाटत आहे. आपण एवढी सृष्टि निर्माण करून ती अगदीं फुकट गेल्यासारखी वाटत आहे. बाकीची जड आणि अर्ध-जड सृष्टि सुरळीत चालली आहे. परंतु मनुष्यप्राणी मात्र हातावर हात आणि पायावर पाय ठेवून स्वस्थ बसून राहिले आहेत. सूर्य-चंद्र फिरत आहेत आणि रात्र व दिवस निर्माण करीत आहेत. निरनिराळे ऋतु एकामागून एक येत आहेत. पाण्याची वाफ, वाफेचे मेघ, मेघांचा पाऊस, आणि पावसाच्या पाण्याची फिरून वाफ, हेंही रहाटगाडगें सुयंत्रित चाललें आहे. सारांश, सर्व कांहीं ठीक आहे, परंतु मनुष्यप्राणी मात्र आपल्या संसाराच्या घाण्याच्याभोंवतीं डोळे झांकून फिरत राहण्याला अद्यापि सुरुवात करीत नाहींं! आपल्या सृष्टीचें सौंदर्य आणि मनुष्याचें उदासीनत्व हीं पाहून मला मोठें आश्चर्य वाटतें. झाडावर फुलें फुललेलीं किती सुंदर दिसत आहेत! त्यांचा वास वाऱ्यानें यदृच्छेनें लोकांच्या नाकांत आणून कोंबला तर कोंबला, पण हे म्हणून कांहीं झाडाचें फूल तोडून त्याचा वास घेतील, तर शपथ! झाडांचीं फळें पिकून झाडांवर नासून चाललीं आहेत, पण त्या कृतघ्न लोकांपैकीं एकजणही वखवखून जाऊन तीं तोडून आणून आपल्यापाशीं त्यांचा संग्रह करून ठेवीत नाहीं! कापसाच्या तंतूंपासून कोणी वस्त्रें तयार करीत नाहींत! रेशमी किड्यांच्या अंगांत रेशमाचे आणि बकऱ्यांच्या अंगां-

बाहेर लोंकरीचे अनंत धागे आपण निर्माण करून ठेविले आहेत; पण त्यांच्याकडे कोणी ढुंकून सुद्धां पहात नाहींत! बकरीं आणि मेंढरें यांना तर आपल्या अंगावरील लोंकरीचीं ओझीं असह्य होऊं लागलीं आहेत! आणि "आमच्या अंगांवरील कातडीं सोलून घेणारा आणि लोकर कातरून नेणारा तो दयाळू मनुष्यप्राणी अजून उत्पन्न झाला नाहीं काय हो?" असें 'बें बें' करीत तीं ज्याला त्याला उत्सुकतेनें विचारीत आहेत! जमिनी-च्या अंगांत वाटेल तें धान्य पिकवून देण्याची शक्ति आपण ठेविली आहे; परंतु नांगर करतो कोण, बैल जुंपतो कोण, आणि शेत उखणून त्यांत धान्य पेरतो कोण! हा एवढा खटाटोप विनाकारण करून आम्हांला करावयाचें आहे काय, असें जे ते म्हणत आहेत. जमिनीच्या पोटांतील सोनें, चांदी आणि हिरे 'आम्हांला या अंधारकोठडींमधून वर काढून सूर्यप्रकाशामध्यें कोणी तरी आणा हो!' असा टाहो फोडीत आहेत! परंतु खाणींचीं कंत्राटें घेण्याची कल्पना अद्यापि एकाच्याही डोक्यामध्यें प्रकाशत नाहीं! "अहो! आहांला हाताबोटांवर नाचविणाऱ्या आणि आपण स्वतः आम्हांला डोकीवर घेऊन नाचणाऱ्या त्या स्त्रिया आणि ते श्रीमंत लोक अद्यापि पृथ्वीच्या पाठीवर कोणी जन्मास आलेच नाहींत काय? कोणी असतील, तर आम्ही या शिंपल्यांच्या गर्भवासांमध्यें सांपडलेलीं मोत्यें तुमची वाट पहात आहों, म्हणून त्यांना कोणी तरी सांगा हो!" असें समुद्राच्या तळचीं मोत्यें ओरडत आहेत! हे मनो, अशा प्रकारच्या पृथ्वीच्या पाठीवर मोठा हाहाकार चालला आहे. कोणी कोणावर प्रेम करीत नाहींत, आणि कोणी कोणाचा द्वेष करीत नाहींत. अजून कोणाच्यामध्यें असाधारण स्नेह-भाव उत्पन्न होत नाहीं, आणि कोणा दोन लोकांच्यामध्यें कोठें वैरभाव उत्पन्न झाल्याचींही चिन्हें दृग्गोचर होत नाहींत. कोणाला कशाची आवड नाहीं. कोणाला कोणाचा क्रोध येत नाहीं. अमुक एक वस्तु आपणाजवळ असावी, असा कोणाला लोभ उत्पन्न होत नाहीं. मत्सर, हेवा, द्वेष यांचा कोठें गंधही नाहीं. अजून कोणी एक सुद्धां लबाडी करीत नाहीं, किंवा खोटें बोलत नाहीं. मदोन्मत्तपणानें झिंगलेला अजून एकही कोणी दृष्टीस पडत नाहीं. आणि स्त्रिया आपण इतक्या सुंदर आणि सुकुमार निर्माण केलेल्या असूनही त्यांचें कोणी फुकटचें चुंबन सुद्धां घेत नाहीं; मग त्यांच्या-

साठीं कलह आणि रणें माजण्याची गोष्ट तर लांबच राहिली! अशा प्रकारची अत्यंत खेदजनक स्थिति हल्लीं जगाची झाली आहे!"

ही नारदानें सांगितलेली हकीकत ऐकून मनूला मोठा विस्मय वाटला व असें कसें व्हावें, हें त्याला कांहीं समजेना. मनु नारदाला म्हणाले:—"नारदा, तूं म्हणतोस असें हें कां बरें होत आहे! मागील कल्पामध्यें याच सामग्रीनें, याच जगामध्यें, काय काय चमत्कार घडलेले होते! आणि त्यांच्याच बीजांचे गुणधर्म आतांच कसे अगदीं इतके बदलले! पूर्वीं भुकेच्या कहरामुळें आयांनीं मुलांचीं मांसें खाल्लेलीं आहेत! आणि आतां झाडांवर पिकलेलीं फळें देखील नासून चाललीं आहेत, म्हणून म्हणतोस! पूर्वीं संपत्तीच्या आणि राज्योपभोगाच्या लोभासाठीं आयांनीं आपल्या मुलांना आणि भावांनीं आपल्या भावांना वनवासाला पाठविलेलें आहे! आणि आतांचे लोक सोन्याला पिवळी माती म्हणतात, म्हणून म्हणतोस! स्त्रियांच्यासाठीं सुंदोपसुंदपणा युगानुयुगें चालत आलेला असून आतां त्या स्त्रियांच्यासाठीं कोणीही भांडत नाहींत, म्हणून म्हणतोस! आणि पूर्वीं जेथें एकही शुक्राचार्य उत्पन्न होण्याची मारामार पडत असे, तेथें आतां प्रत्येकजण घरदार, सुखसंपत्ति, कुटुंबसंसार, इत्यादिकांचा तिरस्कार करीत आहे, म्हणून म्हणतोस! नारदा, असा सृष्टीचा विपर्यास कां होत आहे, हें तुझ्याप्रमाणेंच माझ्याही कांहीं लक्षांत येत नाहीं. तेव्हां आपण ही स्थिति ब्रह्मदेवाला सांगून याचें कारण भगवान् महाविष्णूलाच विचारूं चला."

असें म्हणून ते ब्रह्मदेवाकडे गेले. आणि ब्रह्मदेव त्यांना घेऊन विष्णूकडे गेले. विष्णूनें त्यांना बियांच्या पुड्यांच्या यादी फिरून तपासण्याला सांगितलें. त्याप्रमाणें मनु आणि नारद यांनीं सर्व बियांच्या यादी फिरून फिरून तपासून पाहिल्या. परंतु चूक कोणालाही सांपडेना. तेव्हां मग अखेरीस भगवान् विष्णूंनीं अंतर्दृष्टीनें पाहिलें, तो मायेच्या बियांची एक लहानशी पुडी पेरावयाची राहिलेली त्यांच्या योगदृष्टीला गोचर झाली! ही गोष्ट ब्रह्मदेव, मनु व नारद यांना कळली, तेव्हां एकदम त्यांच्या डोक्यांत उजेड पडला, आणि जग असें उलटें कां चाललें आहे, याची बरोबर कल्पना त्यांच्या मनामध्यें आली. पुढें मग आतां या चुकीची दुरुस्ती कशी

करावयाची, याच्याबद्दल त्या सर्वांच्यामध्यें वाटाघाट होऊन भगवान् विष्णूच्या सल्ल्याप्रमाणें एक विहीर तयार करण्यांत आली, आणि त्या विहिरीच्या पाण्यांत तें मायेच्या पुडींतील बीं कालविण्यांत आलें. या विहिरीला 'मायेची विहीर' अथवा 'अज्ञानवापी' असें नांव ठेवण्यांत आलें. व माणसांना रात्रींची झोंप लागली असतां या अज्ञानवापींतील मूर्खपणाच्या पाण्याचे एक एक, दोन दोन थेंब सर्वांच्या अंगावर शिंपडावे, असें ठरलें. व त्याप्रमाणें लगेच अंमलबजावणीही झाली.

या मूर्खपणाच्या विहिरींतील पाणी जगांतील लोकांच्या अपेक्षेच्या मानानें थोडें पडेल, व सगळ्याना त्याचा मुबलक पुरवठा करतां येणार नाहीं, अशी सदर वेळच्या वाटाघाटीमध्यें एक शंका निघाल्यावरून भगवान् विष्णूंनीं या वापीला असा वर दिला कीं, हिच्यांतील पाणी कधींही आटणार नाहीं, तर उलट जसजसा हिच्यांतील पाण्याचा खप वाढत जाईल, तसतसें हिचें पाणी अधिक अधिकच वाढत जाईल! या वरामुळें या वापीला तेव्हांपासून 'अक्षय्य अज्ञानवापी' असेंही नामाभिधान प्राप्त झालें. परंतु जरी या मूर्खपणाच्या विहिरीचें पाणी विपुल करण्यांत आलें, तरी तें दारूप्रमाणें फार अपायकारक असल्याकारणानें लोकांना देतांना तें अगदीं बेताबातानेंच दिलें पाहिजे, ज्यांची खुषी असेल त्यांनाच फक्त दिलें पाहिजे, ज्यांना द्यावयाचें त्यांचें नांवगांव टिपून घेतलें पाहिजे, व ते त्याचा उपयोग कोणत्या कामाकडे करणार आहेत, याचीही नोंद ठेविलेली असली पाहिजे, अशा शर्ती घालण्यांत आल्या. परंतु एवढ्यानेंही योग्य प्रतिबंध होणार नाहीं, हें लक्षांत आणून सदर मूर्खपणाच्या पाण्यावर एक प्रकारचा करही बसविण्याचें ठरलें. हा कर पैशाच्या रूपानें द्यावा, अशी पहिली एक सूचना होती; परंतु तसें केल्यास श्रीमंत लोक आपल्याजवळचा सर्व पैसा खर्च करून मूर्खपणाचें सगळें पाणी आपणच विकत घेतील; तेव्हां असें करणें बरोबर नाहीं, असें वाटून अखेरीस त्या करामध्यें खरोखरीचा प्रतिबंधकपणा आणण्याकरितां नुकसान, दुर्लौकिक, व्याधिग्रस्तता, विनाश, यमयातना, इत्यादि सहन करण्याच्या स्वरूपाचा कर जो कोणी देण्याला तयार होईल, त्यालाच या मूर्खपणाच्या विहिरींतील पाणी द्यावें, असें ठरविण्यांत आलें!

अशे निर्बंध घालून वर सांगितल्याप्रमाणें हें मूर्खपणाचें पाणी लोकांना एक एक, दोन दोन थेंब या प्रमाणानें देण्याला प्रथमतः सुरुवात झाल्याबरोबर एखाद्या यक्षिणीची कांडी फिरावी, त्याप्रमाणें जगाच्या राहटीमध्यें हळूहळू फरक दिसूं लागला. विरक्ति आणि उदासीनता हे धर्म संध्याकाळच्या संधिप्रकाशाप्रमाणें हळूहळू क्षीण होऊं लागले. 'हें करून मला काय करावयाचें आहे ?' आणि 'तें करून मला काय करावयाचें आहे ?' ही बुद्धि जाऊन कितीही क्षुल्लक गोष्ट असली, तरी ती करणें माझें कर्तव्यकर्म आहे, अशी भावना मनामध्यें उठूं लागली. अहंभाव आणि अहंमान्यता यांचें फूल पूर्वी जें अगदीं कोमेजून गेलेलें होतें, तें मूर्खपणाच्या पाण्याच्या या एक दोन शितोड्यांनीं टवटवीत दिसूं लागलें. हें माझें, तें माझें, हें मला पाहिजे, तें मला पाहिजे, ह्याची मला आणखी दहा वर्षांनीं गरज लागेल, आणि त्याची माझ्या मुलाच्या मुलाला आवश्यकता उत्पन्न होणार नाहीं कशावरून, अशा प्रकारची मायिकपणाची–मूर्खपणाची–ममत्वबुद्धि दूरवर फैलावूं लागली. जेथें कशाचीही गरज भासत नव्हती, तेथें यःकश्चित अत्यंत क्षुद्र वस्तूंचीही अतिशय उपयुक्तता भासमान होऊं लागली. त्यामुळें त्या त्या वस्तु कशा संपादन कराव्या आणि कशा रक्षण कराव्या, याच्याबद्दलचीं अनेक निरुपयोगी महत्त्वयुक्त शास्त्रें अस्तित्वांत येऊं लागलीं. कष्टाला किंमत चढली, आणि त्यांचीही हौस वाटूं लागली. ज्यांचें जें स्वकष्टार्जित असेल, तें त्यांच्यापाशीं रहावें, ही गोष्ट सप्रमाण सिद्ध करून देण्याकरितांही धर्मशास्त्रें उत्पन्न झालीं; आणि त्यांना हरताळ लावून दुसऱ्याचा मलिदा तिसऱ्याला मिळावा, अशा सद्धेतूनें लुच्चे, भामटे, चोर, अशा धर्मशास्त्र्यांनीं यांच्या उलट, पण धर्मशास्त्रेंच अस्तित्वांत आणिलीं. त्यामुळें क्रोध, कलह, मत्सर, मोह इत्यादिकांना विपुल अवसर मिळूं लागला. अशा अनेक बाजूंनीं हें संसारचक्र आतां खास फिरत राहणार, हें पूर्वीसारखें बंद राहण्याची इतःपर भीति दिसत नाहीं, अशाबद्दलचीं स्पष्ट चिन्हें दिसूं लागल्यानंतर सृष्टीच्या आद्योत्पादक देवता निश्चित होऊन व या रहाटगाडग्यावर नजर ठेवण्याचें काम यमादिक खालच्या देवतांना सांगून नंतर स्वस्वस्थानाप्रत गमन करत्या झाल्या.

पुढें हळूहळू या जगाचा रंग बदलूं लागला. शेतीभाती सुरू झाली.

व्यापारधंदा वाढला. मोठमोठ्या इमारती आणि मोठमोठीं शहरें उभारलीं गेलीं. लबाडींचे व्यापार आणि सचोटीच्या लबाड्या यांना सुरुवात झाली. राजे आणि रंक, अमीर आणि फकीर, उच्च आणि नीच, इत्यादि अनेक निरनिराळया प्रकारचे भेदभाव उत्पन्न झाले. व दारिद्य, दुःखें, व्यसनें, मारामाऱ्या, चोऱ्या, दरोडे, खून, रक्तपात, लढाया, इत्यादिकांची जगामध्यें गर्दी माजून जगांतील हें संसारचक्र हल्लींच्या काम करीत असलेल्या एखाद्या गिरणींतील 'फ्लाय व्हील'प्रमाणें पूर्ण वेगानें फिरत असल्याचें दिसून येऊं लागलें !

इतके सगळे प्रभाव ज्याच्या योगानें घडून येऊं लागले, त्या मूर्ख-पणाच्या पाण्याची अशा रीतीनें लोकांना एकदां मद्याप्रमाणें चटक लागल्या-नंतर त्या 'अक्षय्य अज्ञानवापी'वर पाणी नेणाऱ्या लोकांचा मारा अधिक-अधिकच वाढूं लागला. जगाच्या लांबलांबच्या कोनाकोपऱ्यांतून, किंवा गुहागुंफांतून जे कोणी लोक पडलेले होते, त्या बिचाऱ्यांच्या वांटणीला पहिले देवतांनीं शिंपडलेले शिंतोडेही आले नाहींत. परंतु बाकी ज्यांच्या ज्यांच्या अंगावर हे शिंतोडे पडले, त्यांना त्यांना हें पवित्र पाणी आपल्याला जास्त मिळावें, अशी आकांक्षा उत्पन्न झाली, व त्यांनीं प्रयत्न करून या मूर्खपणाच्या पाण्याच्या विहिरीचा सुगावा काढला, आणि तेथून त्यांनीं पाणी नेण्याचा सपाटा सुरू केला. ज्यांना जितकी मूर्खपणाच्या पाण्याची गरज आणि तहान होती, तितक्या मानानें लहान-मोठीं भांडीं घेऊन ते त्या 'अक्षय्य अज्ञानवापी'मधून पाणी भरून घेऊन जाऊं लागले. सामान्य सामान्य दर्जाच्या प्रापंचिक लोकांपैकीं कोणी पंचपात्रीभर, कोणी गडूभर, कोणी तपेलीभर, कोणी तांब्याभर, आणि फार झालें तर कोणी कळशी-भर, द्रवीभूत मूर्खपणा नेऊं लागले. ह्याच्याबद्दल कोणाला फारसें आश्चर्य वाटलें नाहीं. परंतु श्रीमंत लोक, लबाड लोक, बलाढ्य लोक, डाकेखोर लोक, वगैरे लोकांकडून रहाट, पोहरे, पंप, मोटा इत्यादिकांचा उपयोग करण्यांत येऊन हें मूर्खपणाचें पाणी नेण्याकरितां मोठमोठे हंडे येऊं लागले. आणि ते माणसांच्या डोक्यांवरून जाईनासे झाले, तेव्हां त्यांनीं गाड्यांतून पाणी चालविलें ! आणि कोणी तर बैलांवर पखाली घालून पाणी वाहण्याचा सपाटा चालविला ! इतकें मूर्खपणाचें पाणी त्यांना कशाला लागतें,

असें सामान्य लोकांना मोठ्या माणसांच्या अव्यक्त कृतींची व्यक्त कल्पना नसल्यामुळें वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि याविषयीं कोणाला विशेष जिज्ञासा असेल, तर ती तृप्त होण्यासारखी नाहीं, असें नाहीं. कोणी, कोणच्या कामाकरितां, किती मूर्खपणाचें पाणी नेलें आहे, याबद्दलची तपशीलवार नोंद त्या 'अक्षय्य अज्ञानवापी'वरील रजिस्टर बुकामध्यें नमूद करून ठेवलेली आहे. ती उघडपणें प्रसिद्ध करण्याची परवानगी नसल्यामुळें येथें जरी त्याबद्दल सविस्तर माहिती देतां येत नाहीं, तरी तेथें गेल्यास सदर बुकामध्यें सर्व बड्या लोकांच्या मूर्खपणाच्या कृत्यांची तपशीलवार माहिती कोणालाही वाचावयाला मिळूं शकण्यासारखी आहे. परंतु केवळ आत्महितार्थ लक्षावधि लोकांचें नुकसान आणि नाश करण्याकरितां हंडे, गाड्या आणि पखाली एवढ्यावरही तृप्ति न होतां जेव्हां कित्येकांनीं त्या मूर्खपणाच्या विहिरीला 'फक्त स्वतःकरितां' म्हणून मोठमोठे नळ लाविले, आणि कित्येकांनीं तर त्या विहिरींतून कालवे काढून आपल्या घरीं चालविले, तेव्हां त्या विहिरीला दिलेल्या अक्षय्यपणाच्या वराबद्दल भगवान् विष्णूला पश्चात्ताप झाला ! आणि या एकंदर प्रकाराचा प्रतिकार करण्याकरितां भगवंताच्या आज्ञेवरून पूर्वीं अव्यक्त असलेलीं उपनिषदें लोकांना व्यक्तपणें दिसूं लागलीं. पण तेवढ्यानेंही या मायेच्या मृगजळाला आळा बसेना. म्हणून उत्तरमीमांसा आणि लौकिक वेदांतशास्त्रें खटपट करूं लागलीं. त्याच्यापासून दुसरा कांहीं नाहीं, पण निदान एवढा तरी फायदा झाला कीं, हे सर्व खेळ मायेचे आणि अज्ञानाचे आहेत, हें आबालवृद्धांना जाहीर झालें! या मायेच्या मोहजाळांतून जरी सर्वांना सहजगत्या सुटतां येत नाहीं, तरी सर्वांना एवढें मात्र खास वाटतें कीं, या मायेच्या उत्पत्तीच्या आधींची जी स्थिति होती, तीच कायम असती, तर या तापत्रयापेक्षां तें फार चांगलें झालें असतें ! हा एवढा सगळा खटाटोप पाहिजे होता कशाला ? आणि तो कराच म्हणून आग्रह केला होता कोणी ? अद्वैतसिद्धांताप्रमाणें जर शिव आणि जीव हे पहिले एकच होते, तर त्यांना निरनिराळे करून हा सृष्टीचा खटाटोप केला कशाला ? अशा प्रकारच्या शंका प्रत्येकाचे मनाला टोंचीत आहेत. श्रीभगवद्भक्त नामदेव यांचेंही पुढें

दिलेल्या त्यांच्या एका अभंगामध्यें देवापाशीं हेंच विचारणें आहे. नामदेव विचारतात :--

निर्गुण निराकार होतें शून्यपणें । आम्हांसि असणें तेचि ठायां ॥
आपुली करणी तुम्ही न विचारोनी । दुसरीया म्हणीं बोल ठेवां ॥
सुखें एकरूप होतों तुझे पोटीं । कासया हे सृष्टि वाढविली ॥
विकाराचें मूळ दिधलें हें शरीर । तेणें कष्टी थोर झालों आम्ही ॥
पापपुण्य दोन्ही लाविलीं सांगातें । म्हणवोनी सुखातें अंतरलों ॥
यमलोकीं वास रौरवयातना । तेणें नारायणा धाक थोर ॥
खातों जेवितों तें न लागेच अंगीं । झालों तों उद्वेगी रात्रंदिवस ॥
ऐसे देह आम्हां कासया दिधले । काय मागितले आम्हीं तुम्हां ॥
सृष्टीपूर्वी पाप नव्हतें तें गा हरी । कासया श्रीहरी कष्टी केलें ॥
वेदशास्त्रभय आम्हांसि लाविलें । तें तुम्हीं टाकिलें एकीकडे ॥
वेदशास्त्रवचन चुकल्या अवचिता । गोसावी जी होतां दंडावया ॥
मागां चुकलेती तें ठेवा एकीकडे । आतां तरी पुढें सांभाळावें ॥
एकरूप तुम्ही होतेती निर्गुणीं । तेथें आमचें कोणी बोलों आलें ॥
निर्गुण सांडुनि तुम्हीं व्हावें जी सगुण । ऐसें तुम्हां कोणें बोलाविलें ॥
आपुलीये इच्छे ब्रह्मांडें रचिलीं । काय सांगितलीं जी आम्ही तुम्हां ॥

ह्याच शंका प्रत्येकाला येतात. पण त्यांचें समाधान मात्र फारच थोड्यांना प्राप्त होत असेल. तें समाधान ज्यांना कळलें, ते या मायेंतून उत्तीर्ण झाले! अशी भाग्याची स्थिति प्राप्त होण्याला एक भगवंताची कृपाच मुख्य कारण आहे! त्या भगवत्कृपेचा ज्ञानार्क सर्वांच्या अंतःकरणामध्यें उदय पावून तो त्यांना या मायातिमिरांतून मुक्त करो, आणि सर्वांना आत्यंतिक सौख्य देवो, हीच भगवच्चरणीं सर्वांची प्रार्थना आहे.

---

# विष्णुसहस्रनाम

विष्णुसहस्रनाम हें आपल्यामध्यें सुप्रसिद्ध आहे. याचे पाठ आपल्यामध्यें नित्य चोहोंकडे चाललेले असतात. या सहस्रनामाचा रोजचा पाठ झाल्याशिवाय अन्नग्रहण करावयाचें नाहीं, असाही आपल्यामध्यें किती तरी लोकांचा नियम असतो. ही सहस्रनामावळी प्रचलित झाल्यापासून हिचे किती वेळां पाठ झाले असतील, याचें गणित करणें शक्य नाहीं; आणि याच्यापुढें हीं सहस्रनामें किती वेळां म्हटलीं जातील, याच्याबद्दलही नुसती कल्पना करणें सुद्धां कल्पनाशक्तीच्या बाहेरचें आहे. भगवान् व्यासांच्या वाणींतील ओजस्वितेचा झरा जोंपर्यंत कायम राहील, आणि आपणा आर्य लोकांच्या अंतःकरणांतील आर्यतत्त्वाचें तेज जोंपर्यंत कायम राहील, तोंपर्यंत भगवंताची ही सहस्रनामावळी आपल्या लोकांच्या पठनपरिपाठातून कधींही नष्ट होणार नाहीं, अशी प्रत्येक आर्य मनुष्याला खात्री आहे.

हें बहुतेकांना माहीतच असेल कीं, हें विष्णुसहस्रनामाचें प्रकरण मूळ महाभारतामध्यें पठित झालेलें आहे. श्रीमन्महाभारताच्या अनुशासनपर्वांतील एकशेंएकुणपन्नासाव्या अध्यायामध्यें हें प्रख्यात स्तोत्र आलेलें आहे. या अध्यायामध्यें कांहीं विशेष प्रसंगानें हें स्तोत्र पठन केलें गेलें आहे, असें नाहीं. महाभारतांतील शांतिपर्व आणि अनुशासनपर्व या दोन पर्वांतील भीष्मयुधिष्ठिरसंवादामध्यें युधिष्ठिरानें कोणत्याही विषयाबद्दल प्रश्न विचारावा आणि भीष्मानें त्याबद्दल समग्र आणि सविस्तर माहिती सांगावी, हा जो त्या पर्वांतील प्रचलित क्रम आहे, त्याच क्रमाच्या अनुरोधानें एकशेंएकुणपन्नासाव्या अध्यायामध्यें—

> किमेकं दैवतं लोके किं वाऽप्येकं परायणम्।
> स्तुवन्तः कं कमर्चन्तः प्राप्नुयुर्मानवाः शुभम्॥

को धर्मः सर्वधर्माणां भवतः परमो मतः।
किं जपन्मुच्यते जन्तुर्जन्मसंसारबन्धनात्॥

असा प्रश्न युधिष्ठिरानें विचारला. आणि त्या प्रश्नाला उत्तर देतांना भीष्मानें

जगत्प्रभुं देवदेवमनन्तं पुरुषोत्तमम्।
स्तुवन्नामसहस्रेण पुरुषः सततोत्थितः॥

असा उपक्रम करून पुढें हें विष्णुसहस्रनामस्तोत्र एकंदर एकशेंसात श्लोकांमध्यें सांगितलें आहे.

हीं विष्णूचीं एक हजार नांवें जीं या अध्यायामध्यें दिलेलीं आहेत तीं मूळ कोठून व कसकशीं उत्पन्न होत आलीं, यासंबंधींचा इतिहास जाणण्याची आकांक्षा कोणाच्याही मनामध्यें उत्पन्न होणें अगदीं स्वाभाविक आहे. या आकांक्षेचें पहिलें सामान्य आणि स्थूल मानाचें समाधान म्हटलें, तर तें असें आहे कीं, हीं सगळीं नांवें परमेश्वराच्या सृष्टींतील आहेत, आणि तीं मनुष्याच्या मनामध्यें प्रादुर्भूत होऊन त्याच्या वाणींतून तीं प्रकट झालेलीं आहेत. हें सामान्य तत्त्व जरी मुख्यत्वेंकरून खरें आहे, तरी या सामान्य तत्त्वाचा विशेष विस्तार आणि विशेष विवरण झाल्यावांचून जिज्ञासु मनाची विचिकित्सा तृप्त होणें शक्य नाहीं. यासाठीं आपण तिकडे वळूं.

हें विष्णुसहस्रनामाचें स्तोत्र ज्या महाभारतामध्यें हल्लीं ग्रथित केलें गेलेलें आहे, त्या महाभारताच्या पूर्वकालीं झालेले असे किती तरी धार्मिक ग्रंथ आपल्या आर्य लोकांच्या वाङ्मयामध्यें प्रसिद्ध आहेत. वेद, ब्राह्मण, उपनिषदें, इत्यादि ग्रंथ हे या वर्गामध्यें मोडतात. या ग्रंथांतून ज्या कांहीं एका प्रकारच्या कल्पना परिपक्वतेला पावत होत्या, त्या या विष्णुसहस्रनामासारख्या स्तोत्रामध्यें संकलित करण्यांत आलेल्या आहेत. वेदादिकांसारख्या सुपीक क्षेत्रांतून जें धान्य पिकत होतें, त्याचीं हीं कोठारें बनविलेलीं आहेत. आणि श्रुत्यादिकांच्या समुद्रामध्यें जीं नानाविध उत्कृष्ट रत्नें तयार होत होतीं, तीं या रत्नभांडारगृहामध्यें सांठवून ठेवण्यांत आलेलीं आहेत. देवतांना नमस्कार करणें आणि त्यांची स्तुति करणें ही मानवी

मनाची पहिली नैसर्गिक भावना होय. कोणत्याही प्रकारची अद्भुत, अगम्य आणि अवर्णनीय, अशी दैवी शक्ति आपल्यापुढें प्रादुर्भूत झाली असतां विस्मयातिशयानें चकित होऊन गेलेलें मन आपल्या स्वाभाविक उमाळ्यानें परमेश्वराचें नमन आणि स्तवन याच्याशिवाय दुसरें काय करूं शकणार आहे ! अशा मानसिक अवस्थेमध्येंच वंदनाची आणि प्रणतीची पहिली कल्पना मनामध्यें उद्भवते, व हीच कल्पना वेदाच्या अनेक सूक्तांमधून आणि ऋचांमधून आविर्भूत झालेली दृग्गोचर होते. पुष्कळ ऋचांमधून निरनिराळ्या प्रकारच्या देवतांना नमस्कार केलेले आढळून येतात. व हीच प्रवृत्ति ब्राह्मण, आरण्यकें आणि उपनिषदें, यांमधूनही परंपरेनें चालू राहिलेली आहे. या सगळ्या पूर्व ग्रंथांतून जीं प्रणामपर वचनें आलेलीं आहेत, त्यांचींच बिंबें आणि प्रतिबिंबें पुढील नामावळयांच्या या गहन जलाशयांमधून पडलेलीं आहेत. विष्णुसहस्रनामाला ज्या 'विश्वं विष्णुर्वषट्कारो' या श्लोकापासून सुरुवात झाली आहे, त्याच्याच आधींचा भारतांतील श्लोक येणेंप्रमाणें आहे.

> यानि नामानि गौणानि विख्यातानि महात्मनः ।
> ऋषिभिः परिगीतानि तानि वक्ष्यामि भूतये ॥

या श्लोकांतील 'ऋषिभिः परिगीतानि' या पदांवर शंकराचार्यांनीं जें भाष्य लिहिलें आहे, तें येणेंप्रमाणें आहेः—'ऋषिभिः मन्त्रैः तद्दर्शिभिश्च परिगीतानि परितः समन्ततः परमेश्वराख्यानेषु तत्र तत्र गीतानि.'

महाभारतामध्यें विष्णुसहस्रनामाप्रमाणें शिवसहस्रनामही आलेलें आहे. त्या शिवसहस्रनामाच्याही सुरवातीच्या पूर्वी अनुशासनपर्वातील सतराव्या अध्यायाच्या सुरुवातीलाच पुढील श्लोक आढळतात.

> ब्रह्मप्रोक्तैर्वेदवेदांगसंभवैः ।
> सर्वलोकेषु विख्यातं स्तुत्यं स्तोष्यामि नामभिः ।
> ऋषिणा तंडिना भक्त्या कृतैर्वेदकृतात्मना ॥

या श्लोकांतील अर्थ स्पष्ट आहे. आणि शिवाय नीलकंठानें आपल्या

टीकेमध्यें 'कृतैः' याचा अर्थ 'वेदात् पृथक् कृतैः' असा जो दिलेला आहे, त्यावरून तर या श्लोकांतील तात्पर्यार्थ जास्तच स्पष्ट होत आहे. सारांश, या सहस्रनामांतून हीं जीं अनेक नांवें एकत्र केलेलीं असतात, तीं मंत्रद्रष्ट्या ऋषींनीं परमेश्वराच्या आख्यानांच्या प्रसंगानें निरनिराळया ठिकाणच्या मंत्रांतून परिगीत केलेलीं असतात, आणि तीं वेद, वेदांगें वगैरे पूर्वीच्या ऋषिप्रणीत ग्रंथांमधील असून त्या वेदादिक ग्रंथांमधून तीं पृथक् करून उद्-धृत केलेलीं असतात, हें उघड आहे. रुद्राध्यायामध्यें शंकराच्या निरनिराळया स्वरूपांचीं आणि संबंधांचीं नांवें घेऊन नमस्कार समर्पण केल्याचें उदाहरण तर सर्वविश्रुतच आहे. गणपतिअथर्वशीर्षाचीही गोष्ट तशीच आहे. आणिं विष्णुसहस्रनामांतील विष्णूच्या नांवांचाही प्रकार तसाच आहे, ही गोष्ट तर शंकराचार्यांनीं आपल्या भाष्यामध्यें ठिकठिकाणीं अवतरणें देऊन स्पष्टपणें सिद्ध करून ठेविली आहे. विश्व, वषट्कार, भूतात्मा, पूतात्मा, इत्यादि अनेक शब्दांवरील आचार्यांचें भाष्य पाहिलें असतां ही गोष्ट उघड होते. ऋक्संहिता, तैत्तिरीय संहिता, तैत्तिरीय ब्राह्मण, ऐतरेय, कौषीतकी, तैत्तिरीय आरण्यक, बृहदारण्यक, तैत्तिरीय उपनिषद, कठ, केन, मुंडक, प्रश्न, छांदोग्य, श्वेताश्वतर, ईशावास्य; इत्यादि अनेक श्रुतिभागांतून समर्थनपर अवतरणें देऊन या नामावळींपैकीं पुष्कळ नांवें पूर्वीच्या या वेदग्रंथांतून आलेलीं आहेत, असें आचार्यांनीं दाखवून दिलें आहे. अशा शब्दांची एकंदर संख्या अदमासें दीडशेंपर्यंत आहे. शिवाय, रामायण, स्मृतिग्रंथ, भगवद्गीता, विष्णुपुराण, हरिवंश इत्यादिकांमधून उद्धृत केलेलीं नांवेंही पुष्कळ आहेत.

सारांश, एखाद्या अरण्यामध्यें सुंदर आणि सुवासिक फुलें ज्याप्रमाणें चोहोंकडे विखुरलेलीं असावीं, आणि तीं कोणी तरी एखाद्या रसिक आणि मार्मिक अशा मालाकारानें एकत्र गोळा करून त्यांचा हार गुंफावा, त्याप्रमाणें ऋग्वेदापासून तों थेट स्मृतिग्रंथांपर्यंतच्या विस्तीर्ण वाङ्मयामध्यें पसरलेलीं भगवंताचीं नांवें एकत्र करून त्यांचें हें विष्णुसहस्रनाम नामक स्तोत्र भगवान् व्यासांनीं निर्माण केलें आहे. 'विव्यास वेदान् यस्मात् स तस्माद् व्यास इति स्मृतः' इत्यादिवचनांवरून व्यासानें वेदांची व्यवस्थित रचना केली, ही गोष्ट तर सुप्रसिद्धच आहे; परंतु व्यासानें फक्त मोठमोठ्या

वेदग्रंथांनाच व्यवस्थित स्वरूप दिलें, असें नसून भगवंताच्या अनेक नांवांना एकत्र करून त्यांना व्यवस्थित स्वरूप देण्याच्या कामाकडेही व्यासानें लक्ष पोंचविलें असलें पाहिजे, हें या विष्णुसहस्रनामाच्या रचनेवरून स्पष्ट होतें. हेंच व्यासाचें व्यासत्व होय.

महाभारतांत अनुशासनपर्वांत ज्याप्रमाणें विष्णुसहस्रनाम आलेलें आहे, त्याचप्रमाणें शिवसहस्रनामही आलेलें आहे, या गोष्टीचा उल्लेख वर करण्यांत आलेलाच आहे. हल्लीं महाभारत ज्या स्वरूपामध्यें आहे, त्याच स्वरूपामध्यें तें मूळ रचलें गेलें असेल, असें कोणी मानीत नाहीं. पाठीमागून वैशंपायन व सौति यांनीं नवीन नवीन भाग त्यांत जोडले असावेत, अशी कित्येकांची कल्पना आहे. त्याप्रमाणें प्रस्तुत दोन्ही सहस्रनामांचे विषय हे मूळचे असोत किंवा मागाहून जोडलेले असोत, परंतु हे जेव्हां महाभारतामध्यें अंतर्निविष्ट झाले, तेव्हां शिव आणि विष्णु या दोन देवता प्राधान्येंकरून प्रमुख मानल्या जात असाव्या, असें दिसतें. आणि म्हणून त्यांचीं सहस्रनामें महाभारतामध्यें समाविष्ट करण्यात आलेलीं आहेत. आतां महाभारतांतील या दोन्ही सहस्रनामांची तुलना करून पाहिली असतां शिव आणि विष्णु या दोन देवतांमध्यें उपासकांच्या उपासनेच्या दृष्टीनें जरी कांहीं भेद असला, तरी अद्वैततत्त्वाच्या दृष्टीनें या दोन्हीही देवता वस्तुतः एकरूपच आहेत, असें प्रतिपादन करण्याकडेच त्या वेळचा विशेष कल आणि कटाक्ष असल्याचें दिसून येतें. विष्णुसहस्रनामामध्यें शर्व, शिव, स्थानु, शंभु, रुद्र, हे शिव या अर्थीं रूढ आणि प्रसिद्ध असलेले शब्द विष्णुवाचक म्हणून आलेले आहेत, व विष्णु या अर्थीं रूढ आणि प्रसिद्ध असलेले असे कित्येक शब्द शिवसहस्रनामामध्यें अंतर्भूत झालेले आहेत. अशा प्रकारच्या ह्या शब्दविनिमयांवरून या दोन्हीही देवतांचें एकत्व आणि अभिन्नत्व स्पष्टपणें प्रस्थापित होत आहे. या दोन देवता भिन्न दिसत असल्या, तरी परमार्थतः त्या ब्रह्मस्वरूपाच्या दृष्टीनें एकच आहेत, ही गोष्ट आणखीही एका दृष्टीनें व्यक्त होत आहे. या दोन्ही सहस्रनामांमध्यें सुमारें शंभराच्यावर असे शब्द सांपडतात कीं, जे एकच शब्द असून दोन्हीही सहस्रनामांमध्यें शिव आणि विष्णु या दोन्हीही देवतांना समानत्वानें आणि साधारणत्वानें लावण्यांत आलेले आहेत !

हीं जीं दोन मुख्य सहस्रनामें वर सांगण्यांत आलीं आहेत, तेवढींच फक्त सहस्रनामें आपल्या प्राचीन वाङ्मयामध्यें आहेत असें नाहीं. मनुष्याचा स्वभाव बनवितांनाच परमेश्वरानें तो अनुकरणप्रिय बनविलेला आहे. एक चांगली गोष्ट पाहिली, म्हणजे तशी दुसरी आपण करावी, अशी इच्छा साहजिकपणेंच मनुष्याच्या मनामध्यें उत्पन्न होते. ही मानवी महत्त्वाकांक्षा फार चांगली होय, व हिच्या योगानेंच जगांतील चांगल्या गोष्टींमध्यें किती तरी नविन चांगल्या गोष्टींची भर पडलेली आहे. एक भगवद्गीता चांगली झाल्याबरोबर तिचें उदाहरण पाहून संसारबद्ध जीवांच्या बोधाकरितां आणि बंधविमोचनाकरितां किती तरी दुसऱ्या गीता अवतीर्ण झाल्या ! आणि तशीच गोष्ट या सहस्रनामांचीही झालेली आहे. देवीसहस्रनाम, सूर्यसहस्रनाम, गणपतिसहस्रनाम, दत्तात्रेयसहस्रनाम, अशीं दुसरींही कित्येक सहस्रनामें अस्तित्वांत आलेलीं आहेत. परंतु हीं जरी इतकीं निरनिराळीं सहस्रनामें असलीं, तरी त्या सर्वांमध्यें अद्वैताचें जें एक मुख्य तत्त्व तें कायम आहे. आणि त्यामुळेंच या सगळ्या निरनिराळ्या सहस्रनामांतूनही जीं तींच तींच नांवें येतात, त्यांची उपपत्ति लागते. इतर सहस्रनामांमधून जे पुल्लिंगी विशेषणात्मक शब्द आहेत, त्यांनाच स्त्रीलिंगी रूप देऊन तींच बहुतेक विशेषणें देवीसहस्रनामामध्यें उपयोगांत आणण्यांत आलेलीं आहेत. गणपतिसहस्रनामामध्यें ग् हें पहिलें व्यंजन प्रत्येक नांवाच्या आरंभीं साधण्याचा विशेष प्रयत्न केलेला आहे. बाकी सर्व गोष्टी इतर सहस्रनामांप्रमाणेंच आहेत.

या सहस्रनामांतील नांवांच्या संख्येबद्दलही थोडासा उल्लेख करणें जरूर आहे. सहस्रनाम म्हटलें, म्हणजे त्यामध्यें एक हजारच नांवें असावयाचीं, हें उघड आहे. वस्तुतः परमेश्वराच्या विभूति अनंत असल्यामुळें त्या विभूतींची दर्शक अशीं जीं नांवें तींही अनंतच असणार. तीं संख्येनें परिमित कशीं होणार ? परंतु परमेश्वराची शक्ति जरी अनंत असली, तरी मनुष्याच्या आकलनशक्तीला मर्यादा आहे. त्या मर्यादेमध्यें परमेश्वराचे जेवढे गुण येऊं शकतील, तेवढ्या गुणांचें मनुष्य वर्णन करूं शकेल. त्याच्यापेक्षां तो बिचारा जास्त काय करूं शकणार आहे ? तरी पण तो जितकी शिकस्त करतां येईल, तितकी करण्याचा प्रयत्न करतो. या प्रयत्नाचा कांहीं इतिहास महाभारतामध्यें येणेंप्रमाणें आढळतो.

दश नामसहस्राणि देवेष्वाह पितामहः ।
शर्वस्य शास्त्रेषु तथा दशनामशतानि च ॥
श्रुणु नाम्नां चयं कृष्ण यदुक्तं पद्मयोनिना ।
दशनामसहास्राणि यान्याह प्रपितामहः ॥

अनुशासन अ. १६।१७.

या श्लोकावरून दहा हजार नांवांचेही संग्रह पूर्वी कदाचित् असावेत, असें दिसते. परंतु हल्लीं तरी निदान ती संख्या दसपटीनें कमी होऊन एक हजारावर आलेली आहे. फक्त शिवसहस्रनामांतील नांवांची संख्या 'अष्टोत्तरसहस्रं तु नाम्नां शर्वस्य मे श्रुणु' या चरणांत सांगितल्याप्रमाणें एक हजार आठ आहे. पण बाकीच्या सहस्रनामांतील संख्या बरोबर एक हजारच आहे.

एक हजाराहून अधिक संख्येबद्दल येथपर्यंत विचार झाला. परंतु एक हजारापेक्षां सहस्रनामांतील नांवांची संख्या कमी असते कीं काय हा प्रश्न शिल्लक राहतो. आंकड्यांनीं मोजूं गेल्यास ही संख्या हजाराहून कमी नसून बरोबर हजार असते, ही गोष्ट निर्विवाद आहे. परंतु दुसऱ्या एका दृष्टीनें पाहिलें असतां ही संख्या हजाराहून कमी भरल्यासारखी कोणाला कदाचित् वाटण्याचा संभव आहे. कारण, या मालिकेमध्यें कांहीं कांहीं नांवें तींच तींच फिरून फिरून आलेलीं आहेत. विष्णुसहस्रनामासंबंधानें पाहूं जातां तींच तींच नांवें पुनरावृत्त झाल्याचीं उदाहरणें पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

१ अक्षोभ्य, २ अनघ, ३ अनंत, ४ अनल, ५ अनिरुद्ध, ६ अनिर्देश्यवपु, ७ अनिर्विण्ण, ८ अनिल, ९ अपराजित, १० अमितविक्रम, ११ अमोघ, १२ आदित्य, १३ आदिदेव, १४ ईश्वर, १५ उत्तम, १६ उद्भव, १७ ऋद्ध, १८ कर्ता, १९ कांत, २० कुमुद, २१ कृतज्ञ, २२ कृतागम, २३ कृष्ण, २४ केशव, २५ क्षाम, २६ गहन, २७ गुरु, २८ गोपति, २९ गोप्ता, ३० गोविंद, ३१ चक्री, ३२ चतुरात्मा, ३३ चतुर्व्यूह, ३४ तार, ३५ दक्ष, ३६ दुर्धर, ३७ द्युतिधर, ३८ धर्म, ३९ नियम, ४० निवृत्तात्मा, ४१ पुण्य, ४२ पुरुष, ४३ पुष्कराक्ष, ४४ प्रजागर, ४५ प्रजापति, ४६ प्रणव, ४७ प्रभु, ४८ प्रमाण, ४९ भानु, ५० भीम, ५१ महाकर्मा, ५२ महाभोग, ५३ महीधर, ५४ मार्ग,

५५ यज्ञ, ५६ वसुमना, ५७ वायुवाहन, ५८ विक्रमी, ५९ विधाता, ६० विभु, ६१ विश्वयोनि, ६२ शिव, ६३ शुचि, ६४ शुभांग, ६५ शौरि, ६६ श्रीनिवास, ६७ श्रेष्ठ, ६८ संवत्सर, ६९ सतां गतिः, ७० सर्वज्ञ, ७१ सहिष्णु, ७२ सिंह, ७३ सिद्ध, ७४ सुखद, ७५ संपूर्ण, ७६ सुव्रत, ७७ स्थविष्ठ, ७८ हिरण्यगर्भ, ७९ हुतभुक्, हीं ७९ नांवें दोनदां आलेलीं आहेत.

१ अच्युत, २ अज, ३ ज्योतिः, ४ पद्मनाभ, ५ प्राण, ६ भोक्ता, ७ माधव, ८ वसु, ९ वासुदेव, १० विष्णु, ११ वीर, १२ वीरहा, १३ सत्य, १४ स्थाणु, हीं १४ नांवें तीन वेळां आलेलीं आहेत.

आणि १ अव्यय, २ प्राणद, ३ श्रीमान्, हीं तीन नांवें चार वेळां आलेली आहेत.

म्हणजे एकंदरीमध्यें हीं ९६ नावें दोनदां, तीनदां किंवा चारदां पुनरुच्चरित झाल्यामुळें यांनीं एकंदर नवीन ११६ नांवाची जागा अडवून टाकिली आहे. म्हणजे पर्यायानें एक हजाराच्या संख्येमध्यें ११६ नांवें कमी भरतात, असेंच म्हणणें प्राप्त होतें.

हें गणित आंकडेशास्त्राच्या दृष्टीनें कदाचित् खरें भासेल, परंतु अर्थ करण्याच्या शास्त्राच्या दृष्टीनें हें गणित बरोबर नाहीं. सर्व भारतावर टीका करणाऱ्या नीलकंठानें शिवसहस्रनामावर टीका केली आहे. परंतु विष्णुसहस्रनामावर आचार्यांची एक टीका असल्यामुळें नीलकंठानें फिरून त्यावर दुसरी टीका लिहिली नाहीं. तरी पण या दोन्हीही टीकाकारांनीं या पुनरुच्चारणाच्या प्रश्नाचा विचार एकाच रीतीनें केला आहे. शब्द जरी पुनरुक्त झालेले असल्यासारखे दिसले, तरी त्यांचे अर्थ भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांची पुनरुक्ति दोषाला पात्र होत नाहीं, असें त्यांनीं ठरविलें आहे. व यासंबंधानें नीलकंठानें मीमांसेचा जो न्याय येथें लागू केला आहे, तोही फार समर्पक आणि सयुक्तिक आहे.

तींच तींच नांवें फिरून फिरून आलीं, तरी त्यांचे अर्थ भिन्न करून दाखवितां येण्याजोगे असल्यामुळें त्या वीप्सेला कांहीं हरकत नाहीं, हें कायदेशीर समर्थन वर दिलेलेंच आहे. परंतु याच्यापेक्षा जास्त सहृदयतेचें समाधान सांगतां येण्यासारखें नाहीं, असें नाहीं. संस्कृत भाषा फार लवचिक

आहे, आणि संस्कृतांतील धातूंना अनेक अर्थ असतात; त्यामुळें वाटेल तो शब्द वाटेल तसा वांकविण्याला संस्कृत टीकाकारांना मुळींच अडचण पडत नाहीं. तरी पण योगबलानें रूढीच्या विरुद्ध जाण्याला मन फारसें तयार केव्हांच नसतें; व तशा अर्थाच्या ओढाताणीच्या प्रसंगामध्यें मनाला कांहीं फारशी प्रसन्नताही वाटत नाहीं. त्यामुळें या प्रश्नाला दुसरी कांहीं बाजू असेल, तर ती आपण पाहूं.

तींच तींच नांवें फिरून फिरून कां उच्चारलीं जावीं, हा प्रश्न आहे. पण हा प्रश्नही संकुचित आहे. खरा प्रश्न म्हटला, तर एकाच वस्तूकरितां हजार नांवें तरी कशाकरितां उच्चारलीं जावीं? ज्या वेळीं मनाच्या विहिरीमध्यें रसाच्या नावानें खडखडाट असतो, त्या वेळीं असले प्रश्न मनांत उद्भवतात, व त्या कोरड्या ठणठणीत मनाला ते संयुक्तिकही भासतात. परंतु जें मन रसाच्या उमाळ्यानें ओथंबून गेलेलें असतें, त्या मनाला असले प्रश्न विचारण्याला आणि त्यांचीं उत्तरें देण्याला अवकाश तरी कोठें असतो? एकाच व्यक्तीला हांक मारावयाला किंवा नमस्कार करावयाला एक नांव पुरें आहे, ही गोष्ट सामान्य लोकांच्या सामान्य व्यवहाराला बरोबर आहे. परंतु जेथें उन्मनी अवस्था उत्पन्न होते, तेथें एक, दोन, तीन, कीं शंभर कीं हजार, हा हिशोब कोण ठेवणार! अनेक दिवसांच्या शुभसंस्कारांनीं मनाचें मालिन्य निर्मूल होतें, वासना गलित होतात, भगवंताच्या चरणारविंदाचें आणि मुखारविंदाचे ध्यान स्थिरता पावूं लागतें, भगवंताची कृपा होऊं लागते, भगवंताची प्रत्यक्ष मूर्ति अंतःकरणामध्यें प्रकट होऊं लागते, त्याच्या त्या ओजाच्या तेजाची नीलवर्णमिश्रित सुंदर द्युति आपल्या डोळयांच्या पुढें आणि पाठीमागें, आंत आणि बाहेर, ह्या बाजूला आणि त्या बाजूला, वर आणि खालीं, जिकडे पहावें तिकडे, व्यापलेली दिसूं लागते, तनु रोमांचित होते, कंठ सद्गदित होतो, नेत्र अश्रुपूर्ण होतात, मन वेडावून जातें, आणि या दृश्य जगाचा मात्र आधार सुटतो; परंतु त्या अदृश्य परमात्म्याचा पूर्ण हस्तावलंब हस्तगत होत नाहीं, अशा प्रकारची जेव्हां अवस्था होते, जेव्हां भक्तिरसानें अंतर्बाह्य एकाकार वृत्ति बनून जाते, तर्काच्या पायावर उभी राहणारी बुद्धि लंगडी पडून या अल्प शरिरामध्यें कोंडलेलें मन प्रेमातिरेकानें सर्व त्रैलोक्यामध्यें हर्षनिर्भर होऊन नाचूं लागतें, आणि हे अदृष्टपूर्व, अश्रुतपूर्व, अज्ञातपूर्व अस

अंगावर शहारे आणणारे अद्भुत चमत्कार परिदृश्यमान करविणारा तो ब्रह्मांडाचा मायावी गारोडी आहे तरी कोण आणि तो असतो तरी कोठें, अशा जिज्ञासेनें मन जेव्हां त्याच्याविषयीं विचार करूं लागतें, डोळे जेव्हां त्याला शोधूं लागतात, आणि 'हे देवा! हे प्रभो! हे भगवंता! हे नारायणा!' अशा अनेक परींनीं आपली गोंधळून गेलेली वाणी जेव्हां त्या सच्चिदानंदाला कारुण्यानें हांका मारूं लागते, जेव्हां मनांत कोंडलेलें आश्चर्य वसंतऋतूंतील तरु-पल्लवांप्रमाणें अंकुरित होऊन मुखावाटे बाहेर पडूं लागतें, आणि जेव्हां सात्त्विक प्रेमरसाचा ओघ गंगानदीच्या सहस्रमुखांप्रमाणें वाणीच्या सहस्रावधि वाटांनीं अप्रतिबद्धपणानें आणि सर्व मर्यादांचें उल्लंघन करून सैरावैरा वाहूं लागतो, त्या वेळीं देवाला आपण किती नांवांनीं हांका मारीत आहों, एकाच देवाला हांका मारण्याला इतकीं नांवें कशाला पाहिजेत, किंवा एकदां ज्या नांवानें हांक मारलीं तेंच नांव फिरून एखादे वेळीं चुकून येत आहे कीं काय; असल्या क्षुद्र आणि क्षुल्लक प्रश्नांकडे लक्ष देण्याला कोणतें मन जाग्यावर असतें! येऊन जाऊन मनुष्याला दिलेलें मन काय तें फक्त एक! तें बिचारें एकटें मन एकाच वेळीं किती ठिकाणीं पाहील! तें शुद्ध सात्त्विक झालेलें बिचारें साळेभोळें मन परमेश्वरानें आपल्या अचाट सामर्थ्याच्या चौकी-पहाऱ्यामध्यें बंदिवान करून टाकिलें असतां त्याच्या गैरहजेरीमध्यें पाठीमागें त्याच कारणांनीं गोंधळून गेलेल्या वाणीनें काय काय चुका केल्या आहेत, एकाच देवाला हांका मारण्याकरितां त्या भ्रमिष्ट वाणीनें आपले किती शब्द विनाकारण फुकट दवडिले आहेत, आणि तेच तेच शब्द फिरून फिरून उच्चारून आपल्या जवळच्या शब्दकोशाच्या व्यापकतेचा कोतेपणा तिनें किती उघडकीस आणला आहे, हें त्या बिचाऱ्या मनाला काय माहीत! देवाच्या बंदीवासांतून सुटून तें मन जेव्हां या ऐहिक व्यवहारामध्यें खालीं उतरतें, तेव्हां त्याला मग हे दोष दिसूं लागतात! परंतु भक्तीच्या आणि प्रेमाच्या वातावरणामध्यें एकाग्रतेच्या विमानामध्यें बसून तें मन नभोमंडळांतील दिव्य तेजांचा अनुभव घेत असतांना त्याला गणितशास्त्राचा पूर्ण विसर पडतो! गाईचा वत्स आपल्या जननीच्या स्तनांतील अमृतरसाचें पान करीत असतां, मी पावशेर दूध प्यालों, किंवा अच्छेर प्यालों, किंवा दोन शेर प्यालों, हें एखाद्या गोरसविक्रय करणाऱ्या गवळ्याप्रमाणें तो कधीं तरी मापानें मोजूं

शकत असेल काय! मुखकमलांतील लालारसाबरोबरच अंतःकरणांतील प्रेमरस सांडत सांडत आपल्या आईपाठीमागून जमिनीवरून रांगत जाणारें गोजिरवाणें अर्भक आपल्या आईला 'आई! आई! आई!' अशा प्रेमळ हांका किती मारतें, याची मोजदाद कोण करूं शकणार! अमर्याद आकाशाशीं, अप्रमेय तेजाशीं आणि असंख्य भगवद्गुणांशीं संमिश्र आणि समरस झालेलें मन मर्यादा, प्रमाण आणि संख्या, यांची काय पर्वा करणार! कवीचें मन आपलें काव्य बनवितांना अशा प्रकारच्या उच्च वातावरणामध्यें नेहमीं गुंग झालेलें असतें. परंतु त्या दिव्य स्थितीचा परिचय शुष्क, नीरस, कोरडया, व्यावहारिक, प्रापंचिक अशा अवस्थेमध्यें बसून टीका करणाऱ्या टीकाकाराला क्वचितच असतो. त्याच्या अंगावर एकही रोमांच उठलेला नसतो, त्याचें अंतःकरण किंवा त्याचा कंठ सद्गदित झालेला नसतो, त्याच्या डोळ्यांमध्यें एकही अश्रु उद्भवलेला नसतो, किंवा त्या सात्त्विक विकारांच्या अष्टभावांपैकीं एकाही भावाचा उद्गम त्याच्या ठिकाणीं झालेला नसतो. असल्या कोरडया अवस्थेकरितां मीमांसाशास्त्र, व्याकरणशास्त्र, गणितशास्त्र इत्यादि शास्त्रें केलेलीं आहेत. आणि त्या स्थितींतच त्यांना अवसर आणि अवकाश मिळतो!

अपरिमेयत्व आणि परिमितत्व यांच्यामध्यें संबंध नाहीं, हें खरें आहे; पण एका दृष्टीनें तो संबंध थोडासा आहे, हेंही कांहीं खोटें नाहीं. ज्या अपरिमेय आणि अनिर्वचनीय अवस्थेचा उल्लेख उपरिनिर्दिष्ट भागांत करण्यांत आलेला आहे, ती अवस्था किती प्रमाणामध्यें वाढत आहे व किती वेळ टिकत आहे, ह्याचा कांहीं तरी अजमास कळण्याकरितां संख्या मध्यें येते. आणि अशाच रीतीनें देवाचीं नामें प्रेमभरानें उच्चारितांना एक, दोन, तीन, सात, आठ, अकरा, एकवीस, चौवीस, शंभर, एकशेंआठ, एक हजार, एक हजार आठ, वगैरे संख्या प्राप्त होतात. जप, दक्षिणा, प्रदाक्षिणा, ब्राह्मणसंतर्पण, इत्यादि अनेक धार्मिक आणि पारमार्थिक कार्यामध्यें या संख्यांचें अवलंबन केलें जातें. या अविज्ञेय रीतीनें आणि अविज्ञात कारणानें, परंतु ठराविक टप्प्याटप्प्यांनीं, वाढत जाणाऱ्या संख्येच्या आंकडयांचा सृष्टिरचनेंतील नियमांशीं कांहीं तरी गूढ संबंध असावा, अशी कित्येकांची एक कल्पना आहे. पायथॅगोरास म्हणून जो एक प्रसिद्ध

ग्रीक तत्त्ववेत्ता होता, त्यानें या संख्यांच्या संबंधांवरच आपलें तत्त्वज्ञान रचिलें होतें, व आपल्यांतील तर बरेच धार्मिक आणि लौकिक व्यवहार कांहीं कांहीं ठराविक संख्यांच्या मर्यादांनीं मर्यादित करण्यांत आलेले आहेत. त्यांपैकीं विष्णूच्या नांवांची संख्या प्रस्तुत प्रकरणामध्यें सहस्र या संख्येनें मर्यादित केलेली आहे. विष्णु, शिव, देवी, सूर्य, गणपति किंवा इतर देवता, ह्या परब्रह्मस्वरूप आणि विश्वस्वरूप होत, ही दृढ भावना मनामध्यें उत्पन्न झाल्यानंतर जें जें कांहीं या विश्वामध्यें असेल, त्याचें त्याचें नांव हें परमेश्वराचेंच नांव होय, हें उघड आहे. आणि म्हणूनच परमेश्वराचीं नांवें हीं अनंत, अमर्याद आणि अवर्णनीय आहेत, असें मानण्यांत येतें. परंतु मनुष्याला तीं यथाशक्ति वर्णन करतां यावीं, म्हणून अनंतत्वाच्या ठिकाणीं सांतत्व कल्पून परमेश्वराच्या अमर्याद विभूति प्रस्तुतसारख्या सहस्रनामाच्या प्रसंगामध्यें सहस्रसंख्येनें मर्यादित केलेल्या आहेत.

परमेश्वराच्या अनंत गुणांच्या मानानें त्याचीं सहस्र नांवें हींही अगदीं अल्प आहेत हें जरी खरें आहे, तरी सामान्य बुद्धीच्या मनुष्याच्या दृष्टीनें हीं हजार नांवें देखील कशीं एकत्र संकलित केलीं असतील, याच्या-बद्दल आश्चर्य आणि जिज्ञासा उत्पन्न होणें अगदीं स्वाभाविक आहे. त्याकरितां या बाजूनें आपण थोडासा विचार करून पाहूं. ह्या प्रश्नाचें कुलूप उघडणारी गुरुकिल्ली विष्णुसहस्रनामाचे भावी निर्माते भगवान् व्यास यांनीं अनुशासन-पर्वाच्या पूर्वीं भीष्मपर्वांतर्गत भगवद्गीतेमध्यें आधींच दाखवून ठेविली आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं.

हंत ते कथयिष्यामि दिव्या ह्यात्मविभूतयः ।
प्राधान्यतः कुरुश्रेष्ठ नास्त्यंतो विस्तरस्य मे ॥

ह्या श्लोकामध्यें ज्या तत्त्वाच्या साहाय्यानें वाटतील तितकीं नांवें निर्माण करतां येतील, तें जें विभूतियोगाचें तत्त्व व्यासांनीं भगवंताच्या तोंडून वदविलें आहे, त्या विभूतियोगाच्या योगानें विष्णुसहस्रनामांतील पुष्कळशीं नांवें सुचलेलीं स्पष्टपणें दिसतात. भगवद्गीतेंतील विभूतियोगाच्या दहाव्या अध्यायांतील एकोणिसाव्या श्लोकापासून बेचाळिसाव्या श्लोकापर्यंतचे बहुतेक

श्लोक, त्याचप्रमाणें सातव्या अध्यायांतीलही कांहीं श्लोक, हे गर्भावस्थेंतील किंवा बीजरूपांतील लहानसें विष्णुसहस्रनामच होय, असें म्हणण्यास हरकत नाहीं. या विभूतियोगाच्या तत्त्वाचें मूळ बीज कोणी आपल्या हृदय-भूमिकेमध्यें आरोपित केलें तर असल्या सहस्रनामांचे विस्तृत वटवृक्ष कोण-त्याही पवित्र कवीला निर्माण करण्याला अवघड जाणार नाहीं. आणि या विष्णुसहस्रनामांतील पुष्कळ नांवांची उपपत्ति लावतांना शंकराचार्योंनींही या विभूतियोगाचाच आश्रय करून अर्थ लाविले आहेत. आदित्यनामामहं विष्णुः (२१), वेदानां सामवेदोऽस्मि (२२), वसूनां पावकश्चास्मि (२३), सिद्धानां कपिलो मुनिः (२६), पवनः पवतामस्मि (३१), इत्यादि भगवद्गीतेच्या दहाव्या अध्यायांतील प्रतीकांवरून ही गोष्ट स्पष्ट होण्यासारखी आहे. सर्व विश्व हें परमेश्वराचें स्वरूप होय, असें जें एक आपल्यामध्यें प्रसिद्ध तत्त्व आहे, आणि त्यालाच इंग्रजीमध्यें Pantheism असें म्हणतात, त्याच्या अनुरोधानें हीं वर दिलेलीं आणि त्याच्याचसारखीं दुसरीं नांवें भगवंताच्या ठिकाणीं उपपन्न होतात. आदित्य, भानु, बृहद्भानु, सहस्रांशु, ज्योतिरादित्य, ज्योतिर्गणेश्वर, अर्क, सप्तवाहन, रवि, सूर्य, सविता, हीं (१) सूर्याचीं नांवें; वन्हि, अनल, सप्तजिह्व, सप्तैधस्, हुतभुक्, हीं (२) अग्नीचीं नांवें; वरुण, अपांनिधि, अंभोनिधि, पर्जन्य, हीं (३) जलसंबंधवाचक नांवें; समीरण, अनिल, पवन, वायु, हीं (४) वायुदेवते-चीं नांवें; हीं सगळीं Pantheism च्या तत्त्वाच्या अनुरोधानें विष्णूच्या ठिकाणीं संभवतात. आणि मूळ श्रुतिभागामध्येंही तीं याच तत्त्वाच्या अनुरोधानें आलेलीं आहेत, हें उघड आहे.

यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें प्रत्येक कोटींतील जें जें उत्कृष्ट असतें, तें तें परमेश्वराचेंच रूप होय, या न्यायानें हंस, सुपर्ण, भुज-गोत्तम, सिंह, शरभ, महोरग, न्यग्रोध, उदुंबर, अश्वत्थ, इत्यादि नांवें विष्णुवाचक झालेलीं आहेत.

या विश्वस्वरूपाच्या तत्त्वानें जशीं हीं कांहीं नांवें विष्णुला लागू झालीं आहेत, त्याचप्रमाणें विरोधाच्या तत्त्वानेंही या विष्णुसहस्रनामांतील कांहीं नांवें उत्पन्न केलेलीं आहेत. जो भगवान् विश्वरूपत्वानें सर्व कांहीं

आहे, त्याच्या ठिकाणीं कांहीं कांहीं बाबतींमध्यें अन्योन्यविरोध संभवणेंही मुळींच कठिण नाहीं. 'सदेव सोम्य इदमग्र आसीत्, असदेवेदमग्र आसीत्' ( छां. ), 'अन्यत्र धर्मादन्यत्राधर्मादन्यत्रास्मात् कृताकृतात्' ( कठ. ), 'नद्यः समुद्राश्च स एव सर्वं यदस्ति यन्नास्ति च विप्रवर्य' ( विष्णुपुराण ), इत्यादि ठिकाणीं हें जें अन्योन्यविरोधाचें तत्त्व परमात्म्याच्यासंबंधानें प्रतिपादिलें गेलें आहे त्या तत्त्वानुसार पुढें दिलेल्या विरोधाच्या जोडया विगलितद्वंद्वभाव न होतांही भगवत्संसर्गानें विष्णुपदाप्रत जाऊन पोंहोचलेल्या आहेतः—निमिषोऽनिमिषः; कामहा कामकृत्; क्रोधहा क्रोधकृत्; सदसत्; क्षरमक्षरम्; भगवान् भगहा; अनिवर्ती निवृत्तात्मा; दर्पहा दर्पदः; अदृशो व्यक्तरूपः; वामनः प्रांशुः; अमूर्तिमान् अनेकमूर्तिः; एको नैकः; अचलः चलः; भयकृत् भयनाशनः; अणुर्बृहत्; कृशः स्थूलः; गुणभृत् निर्गुणः; शब्दातिगः शब्दसहः; यज्ञकृत् यज्ञांतकृत्.

या विश्वस्वरूपाच्या आणि विरोधाच्या तत्त्वाशिवाय दुसऱ्याही कित्येक उपायांचा अवलंब या हजार नांवांची रचना करण्यामध्यें करण्यांत आलेला आहे. अनुप्रासाच्या तत्त्वावरही यांतील बरींच नांवें एकत्र करण्यांत आलेलीं आहेत हें त्या दृष्टीनें विष्णुसहस्रनाम म्हणतांना कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे. 'विश्वं विष्णुर्वषट्कारो भूतभव्यभवत्प्रभुः । भूतकृद्भूतभृद्भावो भूतात्मा भूतभावनः ॥' या पहिल्याच श्लोकामध्यें किती तरी सुंदर अनुप्रास भरलेले आहेत !

याशिवाय कित्येक सामासिक विशेषणांमध्यें, तद्धितांमध्यें, वगैरे तींच तींच पूर्वपदें ठेवूनही भगवान् व्यासांनीं विष्णूकरितां पुष्कळ नवीन नांवें आणि विष्णूच्या भक्तांकरितां पुष्कळ नवीन कौतुकें निर्माण करून ठेविलीं आहेत. त्यांचीं कांहीं उदाहरणें पुढें दिलीं आहेत.

अनंतः—अनंतजित्, अनंतरूप, अनंतश्री, अनंतात्मा.

अमृतः—अमृतप, अमृतवपुः, अमृतांशूद्भव, अमृताश.

कामः—कामकृत्, कामदेव, कामपाल, कामप्रद, कामहा, कामी.

चतुरः—चतुरस्र, चतुरात्मा, चतुर्गति, चतुर्दंष्ट्र, चतुर्बाहु, चतुर्भाव, चतुर्भुज, चतुर्मूर्ति, चतुर्वेदवित्, चतुर्व्यूह.

त्रिः—त्रिककुब्धाम, त्रिदशाध्यक्ष, त्रिपद, त्रिलोकधृक्, त्रिलोकात्मा, त्रिलोकेश, त्रिविक्रम, त्रिसामा.

दुस्ः—दुरतिक्रम, दुराधर्ष, दुरावास, दुर्ग, दुर्गम, दुर्जय, दुर्धर, दुर्मर्षण, दुर्लभ, दुष्कृतिहा, दुःस्वप्ननाशन.

धर्मः—धर्मकृत्, धर्मगुप्, धर्मयूप, धर्मविदुत्तम, धर्माध्यक्ष, धर्मी.

नैकः—नैककर्मकृत्, नैकज, नैकमाय, नैकरूप, नैकशृंग, नैकात्मा.

पद्मः—पद्मगर्भ, पद्मनाभ, पद्मनिभेक्षण, पद्मी.

पर आणि परमः—परमस्पष्ट, परमात्मा, परमेश्वर, परमेष्ठी, परर्धि, परायण.

ब्रह्मः—ब्रह्मकृत्, ब्रह्मज्ञ, ब्रह्मण्य, ब्रह्मवित्, ब्रह्मविवर्धन, ब्रह्मी, ब्राह्मण, ब्राह्मणप्रियं.

भूतः—भूतकृत्, भूतभव्यभवत्प्रद, भूतभव्यभवन्नाथ, भूतभावन, भूतभृत्, भूतमहेश्वर, भूतात्मा, भूतादि, भूतावास.

महत्ः—महानिधि, महाबल, महाबुद्धि, महाधन, महाभूत, महाभोग, महामख, महामना, महामाय, महामूर्ति, महायज्वा, महार्ह, महावराह, महावीर्य, महाशक्ति, महाशन, महाशृंग, महास्वन, महाहवि, महाह्रद, महेज्य, महेंद्र, महेश्वास, महोत्साह, महोदधिशय, महोरग.

यज्ञः—यज्ञकृत्, यज्ञगुह्य, यज्ञपति, यज्ञभुक्, यज्ञभृत्, यज्ञवाहन, यज्ञसाधन, यज्ञांग, यज्ञांतकृत्, यज्ञी.

लोकः—लोकत्रयाश्रय, लोकनाथ, लोकबंधु, लोकसारंग, लोकस्वामी लोकाधिष्ठान, लोकाध्यक्ष.

विश्वः—विश्वकर्मा, विश्वदक्षिण, विश्वधृक्, विश्वबाहु, विश्वभुक्, विश्व, विश्वमूर्ति, विश्वयोनि, विश्वरेता, विश्वात्मा.

वृषः—वृषकर्मा, वृषपर्वा, वृषप्रिय, वृषभाक्ष, वृषाकपि, वृषाकृति वृषाही, वृषोदर.

श्रीः—श्रीकर, श्रीगर्भ, श्रीद, श्रीधर, श्रीनिधि, श्रीवास, श्रीनिवास, श्रीपति, श्रीमान्, श्रीमतांवर, श्रीवत्सवक्षा, श्रीविभावन.

सत्ः—सत्कर्ता, सत्कृत, सत्कीर्ति, सतांगति, सत्पथाचार, सत्परायण, सद्गति, सद्भूति.

सत्यः—सत्यधर्मपराक्रम, सत्यधर्मपरायण, सत्यपराक्रम, सत्यमेधाः, सत्यसंध.

सर्वः—सर्वग, सर्वज्ञ, सर्वदृक्, सर्वादि, सर्वसह, सर्वकामद, सर्वतश्चक्षु, सर्वतोमुख, सर्वदर्शन, सर्वदर्शी, सर्वदृग्व्यास, सर्वयोगाविनिःसृत, सर्वप्रहरणायुध, सर्वलक्षणलक्षण्य, सर्ववागीश्वरेश्वर, सर्वविज्जयी, सर्वविद्भानु, सर्वशस्त्रभृतांवर, सर्वेश्वर.

सहस्रः—सहस्रजित्, सहस्रपात्, सहस्रमूर्धा, सहस्राक्ष, सहस्रांशु, सहस्रार्चिः.

यांत व इतरत्र पुष्कळ नांवें एकाच अर्थाचीं आलेलीं आहेत. पण अर्थ एकच असला, तरी शब्द भिन्न आहेत. आणि 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति' या न्यायानें याची उपपत्ति लावतां येण्यासारखी आहे. शिवाय भक्तिरसाच्या उद्रेकामध्यें अर्थपौनुरुक्त्याकडे प्रसंगविशेषीं कमी लक्ष दिलें जातें, असें आपण व्यवहारांतही पुष्कळ ठिकाणीं पाहतों. प्रेमाच्या भरांत आलेली आई आपल्या मुलाला 'बाळा, बाबा, तान्हुल्या, चिमकुल्या,' अशा किती तरी त्याच त्याच अर्थाच्या, परंतु निरनिराळ्या अक्षरांच्या नांवांनीं हांका मारीत असते! तिला काय कोणी अर्थाची पुनरुक्ति केल्याबद्दल दोष देत असतो! भक्तीच्या अतिरेकामध्यें आणि अंतरंगामध्यें सर्व कांहीं क्षम्य आहे! 'मी भक्तीनें हें देवाचें नांव घेत आहें,' अशा भावनेनें मनुष्यानें देवाचें नांव उच्चारिलें असतां तीं नांवें कदाचित् समानार्थक उच्चारिलीं गेलीं, तरीही त्या प्रत्येक नांवाच्या उच्चाराबरोबर एक एक नवीन अपूर्व उत्पन्न होत जाईल, व तितकीं पुण्यें त्याच्या खातेवहीमध्यें त्याच्या नांवावर जमा केलेलीं राहतील, यांत बिलकुल संदेह नाहीं, हा मीमांसाशास्त्राचा अढळ सिद्धांत आहे.

विष्णुसहस्रनामांतील नांवें हीं नुसतीं नांवें तर खरींच; व शुष्क दृष्टीनें आणि शुष्क अंतःकरणानें त्यांच्याकडे पाहिलें, तर एखाद्या कोशांतील शब्दसंग्रहाप्रमाणें हा एक हजार शब्दांचा कोशच आहे, असेंही कोणाला

कदाचित् वाटेल; परंतु वस्तुस्थिति मात्र तशी नसून यामध्यें भगवान् व्यासांनीं एक प्रकारचें विलक्षण चैतन्य आणि विद्युत्सामर्थ्य भरून ठेविलें आहे. त्याच्याजवळ आपण भक्तियुक्त अंतःकरणानें आणि सहृदयतेनें गेलों, तर त्यांतील चैतन्य आपल्या अंगांत शिरतें, त्यांतील विद्युच्छक्ति आपल्या रोमरोमांतून खेळूं लागते, आणि आपलें नाखुष असलेलेंही मस्तक डुलूं लागतें आणि आपलें शुष्क असलेलेही डोळे प्रेमाश्रु गाळूं लागतात!

अशा रीतीनें या सहस्रनामांतील शब्द एकत्र गुंफितांना भगवान् व्यासांनीं एकापेक्षां एक वरचढ आणि एकावर एक कडी करणारे असेही जे कांहीं शब्द कित्येक ठिकाणीं एकापुढें एक मांडिले आहेत, त्यांच्यापासून उत्पन्न होणारी हृदयंगमताही वाखाणण्यासारखी आहे. तशा प्रकारचीं कांहीं उदाहरणें येणेंप्रमाणें आहेतः—

गुरुर्गुरुत्तम; सहस्रजिदनंतजित्; इज्यो महेज्यश्च; सनात्सनातनतमः; योगो योगविदां नेता; भोजनं भोक्ता; अन्नमन्नाद एव च; योगी योगीशः; धाता विधाता धातुरुत्तमः. ही शब्दरचना एखाद्या श्रेणीप्रमाणें पायरी-पायरीनें चढत जात असल्यामुळें समुद्रांतील एकापेक्षां एक उंच उंच लाटांवरून पोहत जाणाऱ्या मनुष्याच्या मनाला जसा आनंद होतो, तसा चढता आनंद भक्तिसागरामध्यें पोहणाऱ्या मनाला होऊन चढत चढत भगवच्चरणारविंदापाशींच आपण चाललों आहों, अशी उदात्त भावना बद्धमूल होत जाते.

अशा अतिशय निपुणतेनें निर्माण केलेल्या या स्तोत्रराजामध्यें भगवंताचे कोणकोणते निरनिराळे गुणधर्म कोणकोणत्या निरनिराळ्या शब्दांनीं कसकसे वर्णिलेले आहेत, याच्याविषयींचें निरीक्षणही बोधप्रद आणि भक्तिप्रद होण्यासारखें असल्यामुळें त्याचाही आपण येथें थोडासा विचार करूं. समुद्राच्या वाळवंटांत सोन्याचे कण चोहोंकडे अस्ताव्यस्त पसरलेले असतात, ते नीट जुळवून एकत्र केले, म्हणजे त्यांचा जसा एखादा सुंदर अलंकार बनतो, त्याप्रमाणेंच या सहस्रनामाच्या विस्तारामध्यें निरनिराळ्या तत्त्वांचे सुवर्णकण जे चोहोंकडे पसरलेले आहेत, त्यांचें एकीकरण आणि वर्गीकरण करून हृदयभूषणभूत असा तत्त्वज्ञानाविषयक काय निष्कर्ष निघूं शकतो, तो

आपण पाहूं. बादरायणाचीं ब्रह्मसूत्रें व्यवस्थित स्वरूपांत आपल्याला दिसतात, परंतु त्या सूत्रांतील मूलभूत तत्त्वें उपनिषदांतून सर्व एके ठिकाणीं क्रमानें आलेलीं नसून तीं चोहोंकडे निरनिराळीं पसरलेलीं आहेत. आणि या सहस्र-नामांतील नांवांचीही कांहीं अंशीं तशीच स्थिति झालेली आहे. म्हणून त्यांचें क्रमपूर्वक वर्गीकरण करणें अवश्य आहे.

प्रकरणविषयीभूत विष्णु ब्रह्मरूपानें स्थित असून वस्तुतः तो कधींही जन्माला येत नाहीं, हें अज, अयोनिज, अनादि, या शब्दांनीं दाखविलें आहे. तो नित्य, स्थिर असतो, हें स्थाणु, स्थविरोध्रुव, शाश्वत, शाश्वतस्थाणु, स्थिर, ध्रुव, स्थावरस्थाणु, शाश्वतस्थिर, इत्यादि शब्दांनीं दाखविलें आहे. आणि त्याला जसा जन्म नाहीं, तसा त्याला नाशही नाहीं, हें जन्यमृत्यु-जरातिग, अव्यय, अक्षर, निधिरव्यय, अच्युत, अमृत, बीजमव्यय, अनंत, इत्यादि शब्दांनीं व्यक्त करण्यांत आलेलें आहे.

हा ब्रह्मस्वरूपी भगवान् विष्णु स्वतः जरी जन्ममरणादिकांपासून अलिप्त आहे, तरी त्याच्यापासूनच या जगाची उत्पत्तिस्थितिलयादिक कार्यें संभवत असतात, हें भूतभव्यभवन्नाथ, भूतभव्यभवत्प्रभु, इत्यादि पदांवरून स्पष्ट होतें. तो या जगाला उत्पन्न करितो म्हणून त्याला संभव, भावन, प्रभव, विश्वयोनि, सर्ग, उद्भव, स्रष्टा, धाता, विधाता, भूतकृत्, धातुरुत्तम, इत्यादि विशेषणें लाविलेलीं आहेत. तसेंच भर्ता, वर्धन, गोप्ता, भोक्ता भूतभृत्, शरीरभृत्, शरीरभूतभृत्, विश्वभुक्, विश्वधृक्, इत्यादि शब्दांवरून तो या जगाचें धारण करितो, हें उघड होतें; व अंतक आदिकरून जे शब्द आहेत, ते विष्णु या जगाचा संहारही करितो, हें दुष्ट जनांच्या दृष्टोत्पत्तीस आणून देतात.

परमेश्वर जरी आज, नित्य, शाश्वत, आणि पुराणही आहे, तरी 'तत् सृष्ट्वा तदेवानुप्राविशत्' या श्रुतीप्रमाणें हें जग निर्माण केल्यानंतर त्यामध्यें त्यानें सर्वत्र प्रवेश केलेला आहे, हें अत्यंत उदात्त तत्त्व स्वयंजात, विष्णु, विश्व, सर्व, सर्वग, या शब्दांनीं प्रतिपादिलें आहे.

या यच्चयावत् विश्वामध्यें विष्णूनें प्रवेश केलेला असल्यामुळें या जगां-तील ज्या निरनिराळया सुप्रसिद्ध देवता त्या विष्णूहून निराळया असणें शक्य नाहीं, हें दाखविण्याकरितांच प्रजापति, पुरंदर, महेंद्र, उपेंद्र, त्वष्टा, भानु,

वायु, वन्हि, वरुण, इत्यादि देवतांचीं नांवें विष्णूला लाविलीं आहेत; परंतु तो भगवान् विष्णु नुसता एतद्देवदेवतास्वरूपीच फक्त आहे, असें नसून, तो सर्व देवदेवतांचा राजा आहे, ही गोष्ट अमरप्रभु, सुरेश, सर्वेश्वर, सुराध्यक्ष, आदिदेव, महादेव, देवेश, देवभृद्गुरु, त्रिदशाध्यक्ष, इत्यादि शब्द आपल्या मनामध्यें ठसवितात.

याच दयाघन भगवान् विष्णूनें आपल्या भक्तजनांच्या परित्राणासाठीं आणि दुष्ट जनांच्या विनाशासाठीं जे निराळे अवतार घेतले आहेत, त्यांचाही उल्लेख महाशृंग ( मत्स्य ), वृषाकपि, कपींद्र, महावराह, नारसिंहवपुः, वामन, त्रिविक्रम, त्रिपद, राम, कृष्ण, इत्यादि शब्दांनीं करण्यांत आलेला आहे. परंतु त्यांतल्या त्यांत भगवान् श्रीकृष्णाचा अवतार हा पूर्णांशानें झालेला अवतार असल्यामुळें माधव, मधुसूदन, गोविंद, वासुदेव, शौरि, दाशार्ह, सात्वतां पति, मुकुंद, यदुश्रेष्ठ, देवकीनंदन, इत्यादि तद्वाचक शब्द यामध्यें साहजिकपणेंच पुष्कळ आलेले आहेत. त्याचा भगवंताच्या ज्या अनेक लीला पुराणांतून वर्णन केलेल्या आहेत, त्यांचें आविष्करण करणारीं वनमाली, सुयामुन, चाणूरांध्रनिषूदन, मधुसूदन, केशिहा, कालनेमिनिहा, इत्यादि नांवें विष्णुसहस्रनामांत अंतर्भूत करण्यांत आलेलीं आहेत.

या मूळच्या अनाद्यनंत आणि रूपरहित परमात्म्यानें या विश्वामध्यें प्रवेश करून देवतास्वरूपानें अवतार घेण्याला सुरुवात केल्यानंतर गुणरहितालाही गुण आणि रूपरहितालाही रूप प्राप्त होणें हें अपरिहार्यच आहे. तेव्हां जो भक्तांच्या भजनासाठीं सगुणरूप झाला, त्या भगवंताचें सुंदर स्वरूप या विष्णुसहस्रनामामध्यें कसें सुंदर रीतीनें वर्णिलें आहे, तें पाहण्याची आणि पिण्याची तृष्णा कोणालाही या संसाराच्या संतापामध्यें लागणें अगदीं साहजिक आहे. म्हणून आपण त्या भगवंताच्या स्वरूपाचें विष्णुसहस्रनामाच्या दृष्टीनें ध्यान करूं. तो भगवान् पुष्कराक्ष, पुंडरीकाक्ष, अरविंदाक्ष, स्वक्ष, शुभेक्षण, पद्मनिभेक्षण, सुलोचन, रविलोचन, सर्वतश्चक्षु, असून सुमुख आहे. तसेंच तो अव्यंग, स्वंग, वरांग, शुभांग आणि हेमांग, आणि सुवर्णवर्ण असून त्याचप्रमाणें नाभिस्थलाच्या दृष्टीनें पद्मनाभ, रत्ननाभ, आणि हिरण्यनाभ असून, तो कुंडली, स्रग्वी, रुचिरांगद, चंदनांगदी, आणि कनकांगदी आहे. आणि अशा त्या भगवंताची प्रभा किती असेल याची

कल्पना येण्याकरितां भ्राजिष्णु, महाद्युति, प्रकाशन, ओजस्तेजोद्युतिधर, प्रकाशात्मा, चंद्रांशु, भास्करद्युति, गभस्तिनेमि, अर्चिष्मान्, इत्यादि अनेक विशेषणें त्याला लाविलीं आहेत.

परंतु तो भगवान् जरी आपल्या भक्तांना असा सुंदर आणि तेजस्वी दिसत असला, तरी दुष्ट जनांना शासन करण्याकरितां त्यानें आपल्या हातांमध्यें जीं निरनिराळीं आयुधें धारण केलीं आहेत, त्याचें वर्णन धन्वी, सुधन्वा, शार्ङ्गधन्वा, रथांगपाणि, चक्री, चक्रगदाधर, खंडपरशु, शंखभृत्, नंदकी, हलायुध, सर्वप्रहरणायुध, या विशेषणांच्या द्वारानें करण्यांत आलेलें आहे.

अशा त्या भगवंतानें जगताच्या व्यवहारासाठीं जो काल निर्माण केला आहे, त्याला अनुलक्षून निमिष, अहः, अहःसंवर्तक, ऋतु, वत्सर, संवत्सर, युगादिकृत्, युगावर्त, इत्यादि नांवेंही भगवंताला देण्यांत आलेलीं आहेत.

या कालाच्या मर्यादेमध्यें राहणाऱ्या मनुष्याच्या व्यवहारला धर्मही आवश्यक असल्यामुळें त्या आद्य, सर्वधर्मप्रवर्तकाला धर्मकृत्, धर्मगुप्, धर्माध्यक्ष, धर्मी, धर्मविदुत्तम, वृष, वृषभ, वृषप्रिय, वृषकर्मा, वृषाकृति, वृषपर्वा, वृकोदर, अशीं नांवें देण्यांत आलेलीं आहेत.

परंतु सगळा धर्म हा वेदाच्या पायावर उभारला गेलेला असल्यामुळें वेद, वेदवित्, वेदांग, श्रुतिसागर, मंत्र, इत्यादि नांवेंही त्या भगवान् विष्णूला प्राप्त झालेलीं आहेत.

वेदांपैकीं चारही वेद भगवंताचें निःश्वसित असल्यामुळें त्याला चतुर्वेदवित् असें जरी म्हटलें आहे, तरी भगवद्गीतेंतील 'वेदानां सामवेदोऽस्मि' या वचनाप्रमाणेंच विष्णुसहस्रनामामध्येंही सामवेदाचें विशेष वर्णन 'त्रिमासा, सामग, साम, सामगायन' इत्यादि शब्दांमध्यें दिसून येतें.

वेदांत यज्ञयागादिकांचाच विशेष प्रपंच मुख्यतः केलेला असल्याकारणानें तद्विषयक असे बरेचसे शब्द विष्णुवाचक होऊन ते या सहस्रनामामध्यें समाविष्ट झालेले आहेत. ते येणेंप्रमाणेंः—यज्ञ, महायज्ञ, ऋतु, महाऋतु, सत्र, हविः महाहविः, यज्वा, महायज्वा, यज्ञी, यज्ञांग यज्ञ-

वाहन, यज्ञभृत्, यज्ञकृत्, यज्ञभुक्, यज्ञपति, यज्ञसाधन, महामख, हविर्हरि, इज्य, महेज्य, भूरिदक्षिण, शिपिविष्ट, इत्यादि.

परंतु नुसत्या यज्ञयागादिकानें जरी चित्तशुद्धि झाली व स्वर्गादिक फलें प्राप्त झालीं, तरी 'क्षीणे पुण्ये मर्त्यलोकं विशंति' या तत्त्वाच्या अनुरोधानें तीं फळें अविनाशी नव्हेत. आणि आपल्याला अविनाशी फळ प्राप्त व्हावें, अशी तर मनुष्याची नैसर्गिक इच्छा. त्या इच्छेच्या परितृप्त्यर्थ अनावृत्तिमार्गाचा उपदेश करण्याकरितां जीं षड्दर्शनें प्रवृत्त झालीं आहेत, त्यांचाही उल्लेख या नामावळीमध्यें करण्यांत आलेला आहे. प्रधानपुरुषेश्वर, कपिल, महर्षिः कपिलाचार्यः, हे तीन शब्द सांख्यशास्त्राला स्पर्श करितात. व यम, नियम, विविक्त, योग, योगी, सदायोगी, योगीश, योगविदां नेता, हीं विष्णूला लाविलेलीं गुणवचनें योगाचें महत्त्व प्रख्यापित आणि प्रस्थापित करतात.

प्रसंगवशात् मध्यंतरीं धनुर्वेद हें धनुर्वेदाचें नांव आलेलें असून व वैद्य, औषध, भिषक्, भेषज, अनामय, इत्यादि कांहीं आयुर्वेदाचेही उल्लेख आलेले असून कः, किं, यत्, तत्, हे व्याकरणांतील शब्दही आलेले आहेत. व चतुर्व्यूह, वासुदेव, अनिरुद्ध, प्रद्युम्न, संकर्षण, हे पारिभाषिक शब्द पांचरात्रमताचें दिग्दर्शन करीत आहेत, हें सांगितल्यावांचूनही तज्ज्ञांच्या लक्षामध्यें आल्यावांचून राहणार नाहीं.

परंतु या कितीही घटपटादिक खटपटी केल्या तरी 'ज्ञानादेव तु कैवल्यं' या सिद्धांतानुसार वेदांतशास्त्रावांचून गत्यंतर नाहीं, हें उघड आहे. म्हणून 'संन्यासकृत्' या पदानें संन्यासाश्रमाचें महत्त्व ध्वनित करून वेदांतशास्त्राचीं आद्यतत्त्वें अप्रमेय, अमेयात्मा, अनिर्देश्यवपुः, असंख्येय, अतींद्रिय, अदृश्य, अनंतात्मा, नैकमाय, महामाय, हिरण्यगर्भ, परमेष्ठी, जीव, प्रणव, ज्ञानगम्य, साक्षी, सत्, इत्यादि शब्दांनीं या विष्णुसहस्रनामामध्यें ग्रथित केलेलीं आहेत.

हीं ब्रह्मात्म्यैक्याचीं तत्त्वें श्रवणमनननिदिध्यासानें मनामध्यें ठसलीं आणि तत्त्वमसीच्या द्वारानें 'अहं ब्रह्मास्मि' या महावाक्याचा प्रकाश अंतर्बाह्य पसरला, म्हणजे तो ज्ञानस्वरूपी भगवान् महाविष्णु प्रत्येक जीवाला

निःसंशयपणें मुक्ति देईल, हा ज्ञानडिंडिम सर्व जगतीतलावर एकसारखा दुमदुमत रहावा, या हेतूनें विष्णुसहस्रनामामध्यें विष्णूचें अपरपर्याय म्हणून जीं महत्त्वाचीं नांवें दिलेलीं आहेत, तीं भवहा, निर्वाण, सतां गतिः, गतिसत्तम, मुक्तानां परमा गतिः, हीं होत.

हें निर्वाणाचें वर्णन सांगितल्यानंतर विष्णुसहस्रनामाची आणखी कांहीं फलश्रुति सांगावयाची राहिली आहे, असें कोणालाही वाटणार नाहीं, हें उघडच आहे !

---

# मेघदूतावरून कालिदासाविषयीं



कालिदासाच्या कालाविषयीं लोकांच्या मनामध्यें अतिशय उत्सुकता आहे व त्यासाठीं अनेक लोक अनेक दिशांनीं प्रयत्न करीत आहेत. या कामीं नवीन स्पष्ट प्रमाणांच्या अभावीं जुन्या गोष्टींवरून नवीन अनुमानें काढणें, हाच एक मार्ग शक्य आहे. व या मार्गानेंच पुष्कळ लोकांची विचारसरणी प्रस्तुतच्या प्रश्नासंबंधानें हल्लीं चालू आहे. कोणी जुन्या राजांच्या वंशावळींवरून कालिदासाचा काळ निश्चित करण्याचा प्रयत्न करीत आहेत, तर कोणी कालिदासाच्या ग्रंथांतील ज्योतिषासंबंधींच्या उल्लेखांवरून काय ठरेल हें पहात आहेत. कोणी भोजराजाच्याबरोबर कालिदासाला पुढें ढकलीत आहेत, तर कोणी हूण लोकांच्याबरोबर त्याला मागें ओढीत आहेत. अशा रीतीनें निरनिराळ्या साधनांवरून निरनिराळे तर्क चालू असतां भूगोलविषयक ज्ञानाच्या दृष्टीनें या विषयासंबंधानें काय अनुमानें निघूं शकतील, याचा आपण येथें थोडासा विचार करूं.

कालिदासाच्या इतर ग्रंथांमधून भूगोलविषयक उल्लेख थोडेबहुत आलेले आहेत. परंतु मेघदूत या काव्यामध्यें जे भूगोलविषयक उल्लेख

आलेले आहेत, त्यांचें महत्त्व विशेष आहे. इतर ठिकाणचे उल्लेख हे तुटक आणि त्या त्या विषयांच्या स्थलापुरतेच आहेत. परंतु मेघदूतामधील स्थल-वर्णनें हीं कांहीं एका विशिष्ट क्रमानें संगतवार अशीं आलेलीं आहेत. त्या-मुळें त्यांचें किती महत्त्व आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. मेघदूतामधील गोष्ट अगदीं साधी आहे. ती अशी कीं, कुबेराच्या शापामुळें अलकेंतील कोणी एक यक्ष एक वर्षभरपर्यंत रामगिरी या नांवाच्या पर्वतावर येऊन राहिलेला आहे; तेथें असतांना आषाढाच्या महिन्यांत अतिशय विरहोत्कंठित होऊन तो एका मेघाला दूत म्हणून आपल्या प्रियपत्नीकडे अलकेला पाठविण्याला प्रवृत्त झाला आहे. एवढीच काय ती या काव्यांतील गोष्ट आहे. या मेघानें अलकेला जातांना कोणत्या वाटेनें जावें हें कालिदासानें आपल्या मेघदूतकाव्याच्या पहिल्या भागामध्यें वर्णिलें आहे. मेघदूतामध्यें जीं पर्वतांचीं नद्यांचीं, शहरांचीं वगैरे नांवें आलेलीं आहेत, त्यांचीं हल्लींचीं नांवें कोण-कोणतीं आहेत, वगैरेसंबंधानें शोधकांनीं जे सिद्धांत ठरविलेले आहेत, त्यांत कदाचित् कांहीं ठिकाणीं दोष असतील; किंवा दोन हजार वर्षांच्या सृष्टींतील घडामोडीनें पर्वत, नद्या आणि शहरें, यांच्या केवळ नांवांतच नव्हे, तर ठिकाणांतही, फरक पडलेला असणें अगदीं शक्य आहे. तरी पण असल्या कांहीं बारीकसारीक फेरफारांकडे दुर्लक्ष केलें असतांही एकंदर स्थूल मानानें पाहतां जो कालिदासानें वर्णिलेला म्हणून मेघाचा मार्ग आहे, त्यावरून सामान्य कल्पना येण्याला अडचण पडणार नाहीं. कालिदासानें वर्णन केलेलीं प्राचीन ठिकाणें आणि त्यांच्यापैकीं कित्येकांचीं अर्वाचीन नांवें मेघदूतांतील श्लोकांच्या क्रमानुरोधानें पुढें दिलीं आहेत.

| | | |
|---|---|---|
| रामगिरी. | ( १ ) | रामगड किंवा कित्येकांच्या मताप्रमाणें रामटेक, मध्यप्रांतांत उत्तरेस. |
| माल. | ( १६ ) | ... ... ... |
| आम्रकूट. | ( १७ ) | अमरकंटक, नर्मदेचें उद्गमस्थान. |
| रेवा. | ( १९ ) | नर्मदा नदी. |
| दशार्ण. | ( २३ ) | हें एका देशाचें नांव असून तो देश पूर्वी हल्लींच्या माळव्यांत असला पाहिजे अशी कल्पना आहे. |

विदिशा. (२४) वर जो दशार्ण नामक देश सांगितला आहे, त्या देशाची विदिशा नगरी ही राजधानी होय. हल्लींचें जें भिलसा या नांवाचें माळव्यामध्यें शहर आहे, तेंच पूर्वीचें विदिशा नगर होय असें मानण्यांत येतें.

वेत्रवती. (२४) ही नदी हल्लीं बेटवा या नांवानें प्रसिद्ध आहे. ही नदी माळव्यामध्येंच असून विदिशा नगरी हिच्या कांठीं असावी.

नीचैर्गिरि. (२५) हा नीचैः नांवाचा पर्वत विदिशा नगरी आणि वेत्रवती नदी यांच्याजवळच कोठें तरी असला पाहिजे. याच्यापुढें २६ व्या श्लोकांत १ वननदी म्हणून उल्लेख आहे, तें कदाचित् सामान्यनामही असेल. आणि तें विशेषनाम असल्यास हल्लींची बेस ही ती नदी असावी असें कोणी मानतात.

उज्जयिनी. (२७) उज्जनी. हिलाच विशाला (३०) असेंही दुसरें नांव आहे.

निर्विंध्या. (२८)
सिंधु. (२९) } या दोन्ही नद्या विदिशा आणि उज्जयिनी यांच्या दरम्यान असाव्या. हल्लीं पार्वती नदी आणि कालीसिंधु नदी अशा या ठिकाणीं ज्या दोन नद्या आहेत, त्याच ह्या असाव्यात, असा तर्क आहे.

अवंति. (३०) 'प्राप्यावन्तीन्' ह्या ठिकाणीं 'अवन्तीन्' असें अनेकवचनान्त पद असल्यावरून, अवन्ति हें येथें त्या देशाचें वाचक असें नाम आहे, हें उघड होत आहे. अवन्ति हें शहराचेंही नांव आहे. परंतु येथें तें जनपदवाचक आहे; व त्या जनपदामधील उज्जयिनी हें मुख्य शहर होय.

सिप्रा. (३१) हें एका नदीचें नांव असून हिच्याच कांठीं उज्जयिनी किंवा अवन्ति हें शहर आहे.

गंधवती. (३५)
गंभीरा. (४२) } या दोन लहान लहान नद्या सिप्रेच्या जवळच कोठें तरी असल्या पाहिजेत.

| | | |
|---|---|---|
| देवगिरी. | (४४) | देवगड या नांवाचा माळव्यामध्यें हल्लीं एक डोंगर आहे, तोच हा असावा. हा चंबळ नदीच्या जवळ आहे. |
| चर्मण्वती. | (४७) | ही नदी माळव्यामध्यें चंबळ या नांवानें हल्लीं प्रसिद्ध आहे. |
| दशपुर. | (४९) | माळव्यांतील हल्लींचें मंदोसर हेंच दशपूर असावें, असें मानण्यांत येतें. |
| ब्रह्मावर्त. | (५०) | हल्लींचें जें ब्रह्मावर्त या नांवाचें शहर गंगेच्या कांठीं कानपूरजवळ आहे, तें हें नव्हे; 'ब्रह्मावर्तं जनपदमयं च्छायया गाहमानः' यांत ब्रह्मावर्ताला जनपद असें स्पष्ट म्हटलें आहे. त्या ब्रह्मावर्त देशाचें वर्णन मनूनें पुढीलप्रमाणें केलें आहे. सरस्वतीदृशद्वत्योर्देवनद्योर्यदन्तरम् । तं देवनिर्मितं देशं ब्रह्मावर्तं प्रचक्षते ॥ याच ब्रह्मावर्त देशामध्यें 'क्षेत्रं क्षत्रपधनपिशुनं कौरवं' या शब्दांनीं वर्णन केलेलें कौरवपांडवांच्या लढाईचें ठिकाण जें कुरुक्षेत्र तें आहे. |
| कनखल. | (५२) | हें कनखल तीर्थ हरिद्वाराजवळ आहे. |
| क्रौंचरंध्र. | (५९) | क्रौंच पर्वत हिमालयामध्यें मानस सरोवराच्या अलीकडे असला पाहिजे. व याच्यामधून आरपार जातां येतां येण्यासारखा नैसर्गिक बोगदा असावा व तेंच हें क्रौंचरंध्र होय. हें रंध्र परशुरामानें आपल्या बाणानें पाडलें, अशी पौराणिक आख्यायिका आहे. याच बोगद्याच्या वाटेनें हंस पक्षी मानससरोवराकडे जात असल्याकारणानें त्याला हंसद्वार असें म्हटलेलें आहे. |
| कैलास. | (६०) | शंकराचें वसतिस्थान प्रसिद्ध कैलास पर्वत. याच्या जवळच कुबेराची अलका नामक नगरी असल्याचें वर्णिलेलें आहे. |

हीं वर दिलेलीं पर्वत, नद्या, शहरें वगैरे ठिकाणें हिंदुस्थानच्या नकाशामध्यें क्रमानें कोठें आणि कसकशीं आहेत, हें आपल्या डोळ्यांपुढें ठेवून आणि त्यावरून दिसणारी स्थिति लक्षांत घेऊन आपण ह्या मेघाच्या मार्गाचा विचार करूं लागलों असतां, आपल्याला सकृद्दर्शनीं काय बरें दिसून येतें? यक्ष आणि मेघ दोघेही रामगिरि पर्वतावर आहेत, आणि तेथून यक्षाच्या मनांतून मेघाला कैलास पर्वतावरील अलकानामक नगरीमध्यें पाठवावयाचें आहे; तर या प्रवासाला सरळ आणि स्वाभाविक मार्ग कोणता? आपण नकाशाकडे पाहिलें, आणि आपण रामगिरि पर्वतावर उभे आहों व तेथून आपणाला आकाशपंथानें कैलास पर्वतावर जावयाचें आहे, अशी कल्पना केली, तर रामगिरि आणि कैलास यांच्यामधील सरळ आणि स्वाभाविक वाट कोणती बरें ठरविण्यांत येईल? ही वाट रामगिरि आणि कैलास यांच्या दरम्यान नकाशावर एक सरळ रेषा मारून जी दाखवितां येईल तीच ठरेल याच्याबद्दल वाद नाहीं. आतां मेघ हा कांहीं माणसासारखा नाहीं. एखादी मोठी नदी वाटेंत लागली आणि तिला पूल नसला, तर उताराची वाट मिळेपर्यंत त्या नदीच्या कांठाकांठानें मनुष्याला वांकडें जावें लागतें, तशी कांहीं मेघाची गोष्ट नाहीं. किंवा वाटेंत एखादा उंच आणि अनुल्लंघ्य पर्वत आडवा आला, तर त्या पर्वताचीं उंच शिखरें तशींच सोडून देऊन त्या पर्वतांत जेथें एखादी खिंड असेल, तेथपर्यंत ह्या पर्वताच्या पायथ्यापायथ्यानें मनुष्याला जसें जाणें भाग पडतें, तशीच कांहीं मेघाची गोष्ट नाहीं. नद्या कितीही खोल असोत किंवा पर्वत कितीही उंच असोत, पक्ष्यांच्या किंवा विमानांच्या मार्गक्रमणाला ज्याप्रमाणें तीं आड येऊं शकत नाहींत, त्याचप्रमाणें मेघाचीही गोष्ट आहे. मेघदूतांतील यक्षाच्या मेघाला रामगिरीवरून निघून तडक आपल्या सरळ आणि स्वाभाविक मार्गानें आकाशांतून कैलास पर्वतावर जाण्याला कांहीं एक अडचण नव्हती, असें असूनही तो तिकडून गेला नाहीं, ही गोष्ट सिद्ध आहे. तर मग तो तिकडून कां गेला नाहीं? सरळ वाट ही वांकड्या वाटेपेक्षां अर्थातच जवळची वाट होय. आणि मेघ आपला निरोप घेऊन आपल्या प्रियेच्या सांत्वनाकरितां जितक्या लवकर जाईल तितका तो यक्षाला पाहिजेच होता. असें असतांनाही तो मेघ जवळच्या आणि लवकरच्या वाटेनें कां गेला नाहीं? त्याला तिकडून कोणी जाऊं दिलें नाहीं? आणि तो ज्या

वाटेनें गेला, ती लांबची आणि वेडीवांकडी वाट त्याला कोणी दाखवून दिली? रामगिरीपासून कैलासापर्यंतची सरळ रेषेची वाट आणि मेघ खरोखर ज्या वेड्यावांकड्या, वळसेखोर, द्राविडी प्राणायामाच्या आणि लांबच्या वाटेनें गेला, ती वाट, या दोन्ही मार्गांची लांबी नकाशांतील मैलांच्या स्केलाच्या मानानें मोजली, तर रामगिरिपासून कैलासापर्यंतची सरळ वाट जर सुमारें ६०० मैल भरली, तर दुसरी वांकडी वाट स्थूलमानानें १२०० मैलांच्यावर भरेल. ही दुपटीच्या फरकाची वाट मेघाला कोणी सांगितली? मेघ हा तर बोलून चालून 'धूमज्योतिःसलिलमरुतां संनिपातः!' त्याला ह्या मैलांच्या अंतराचें गणित काय समजणार? मग हें त्याला कोणी सांगितलें? अर्थात् यक्षानें त्याच्या डोक्यांत ही लांबच्या वळशाच्या वाटेनें जाण्याची कल्पना भरवून दिलेली आहे. 'मार्गं मत्तः शृणु कथयतः' या ठिकाणीं यक्षाचा कबुलीजबाब स्पष्ट आहे. पण हा यक्ष तरी कोण? हाही एक काल्पनिक विरही पुरुषच कीं नव्हे? तर मग याच्या मागें खरा सूत्रचालक कोण आहे? अर्थात् कालिदास! तेव्हां आतां यावरून हें उघड होत आहे कीं, त्या बिचाऱ्या निर्बुद्ध मेघाला सरळ वाट सोडून माळव्यांतील दऱ्यांखोऱ्यांतून आणि नदीनाल्यांतून अडखळत आणि ठेंचाळत ज्यानें वळसे घालावयाला लाविले, तो बिचारा यक्ष नसून हें सगळें कारस्थान कालिदासाचेंच असलें पाहिजे. धूर्त लोक जड कोटींतील लोकांना कसे गोत्यांत आणतात आणि कसे खड्डयांत पाडतात, याचें कालिदासाच्या तावडींत सांपडलेला मेघ हें एक चागलेंच उदाहरण आहे! पण आतां कालिदास तरी असें कां करीत आहे? त्याला काय जवळचा रस्ता आणि लांबचा रस्ता ह्यांच्यामधील अंतर समजत नव्हतें? येथें कोणी कालिदासाच्या बाजूनें असें म्हणेल कीं, मेघाच्या प्रयाणाला अनुकूल (त्वत्प्रयाणानुरूपं) असा मार्ग कालिदासाच्या मनांतून मेघाला सांगावयाचा होता; कारण, वाटेनें मेघ दमला तर त्याला बसावयाला जागा पाहिजे; आणि वाटेनें त्याला तहान लागली, तर पाणी पिण्याकरितां वाटेंत त्याला नद्या मिळाल्या पाहिजेत; म्हणून 'खिन्नः खिन्नः शिखरिषु पदं न्यस्य गन्तासि यत्र। क्षीणः क्षीणः परिलघु पयः स्रोतसां चोपभुज्य' अशा प्रकारचा हा रस्ता मुद्दाम कालिदासानें मेघाला दाखवून दिला असला पाहिजे. परंतु या म्हणण्यावर प्रत्युत्तर असें आहे कीं, कालिदासाचा एवढाच हेतु होता, तर तो या सरळ

वाटेनेंही सफळ होत नव्हता कीं काय ? या सरळ वाटेवरही पर्वत आणि नद्या कोणी नव्हत्याच कीं काय ? किंवा तिकडे विदिशा, उज्जयिनी वगैरे जशीं मोठीं शहरें होतीं, तशीं इकडेही कोणी शहरें नव्हतींच कीं काय ? बारीकसारीक पर्वत आणि नद्या ह्या तर चोहोंकडे आहेतच. परंतु गंगा-यमुनेसारख्या नद्या आणि प्रयागकाशीसारखीं शहरें या सरळ वाटेच्या आस-पास थोडीं थोडकीं आहेत असें नाहीं. असें असून मग कालिदासानें ही सरळ वाट सोडून मुद्दाम वांकड्या वाटेचें अवलंबन कां केलें ?

संस्कृतांतील अलंकारशास्त्रामध्यें शब्दाच्या अर्थाचे मुख्यार्थ, लक्ष्यार्थ आणि व्यंग्यार्थ असे तीन सूक्ष्म भेद कल्पिलेले आहेत, हें सर्व तज्ज्ञ लोकांना माहीतच आहे; व या तीन जातीच्या अर्थाच्या स्पष्टीकरणासाठीं 'गंगायां घोषः' हें ठराविक उदाहरण नेहमीं देण्यांत येत असतें. 'गंगायां घोषः' याचा अक्षरशः मुख्य वाच्य अर्थ 'गंगेच्या पाण्यामध्यें एक गवळयाचा वाडा आहे' असा होतो. पण पाण्याच्या प्रवाहांत वाडा टिकूं शकणार नसल्यामुळें हा पहिला मुख्यार्थ बाधित होतो. आणि दुसरा त्याच्यापुढील लक्ष्यार्थ असा सूचित होतो कीं, 'गंगायां' म्हणजे 'अगदीं गंगेच्या पाण्यां-तच असा अर्थ घ्यावयाचा नसून 'गंगेच्या तीरावर एक गवळ्याचा वाडा आहे,' असा अर्थ बोलणाराच्या मनांतून अभिप्रेत आहे. परंतु मन फिरून अशी शंका काढतें कीं, 'गंगायां घोषः' हें वाक्य बोलणारानें 'गंगेच्या तीरावर एक वाडा आहे' असें म्हणण्याच्याऐवजीं 'गंगेमध्यें एक वाडा आहे' असें वांकडें कां म्हटलें ? असें मुद्दाम जर तो वांकडें बोलत आहे, तर त्यांत त्याचा कांहीं तरी हेतु असला पाहिजे. तो हेतु कोणता ? ही शंका बरोबर आहे. आणि या शंकेच्या समाधानासाठीं अलंकारशास्त्रवेत्ते येथें तिसरा जो व्यंग्यार्थ तो आणीत असतात, ते असें म्हणतात कीं, प्रत्यक्ष गंगे-च्या पाण्यामध्यें तो गवळयाचा वाडा असतांना त्याच्या ठिकाणीं जितकें शैत्य आणि पावनत्व उत्पन्न झालें असतें, तितकें या गंगेच्या तीरावर असणाऱ्या गवळवाड्यामध्यें शैत्य आणि पावनत्व आहे, असें दाखविण्याचा बोल-णाराचा हेतु आहे, आणि तो व्यक्त करण्यासाठीं बोलणारानें सरळ मार्ग सोडून ही वांकडी वाक्यरचना मुद्दाम केली आहे.

हा केवळ एक दृष्टांत आहे. पण यांत जशी स्थिति आहे, तशीच

स्थिति कालिदासाची ह्या ठिकाणीं झालेली आहे. कालिदासानें येथें सरळ वाट सोडली आहे आणि वांकडी वाट धरलेली आहे. नकाशाकडे पाहिलें, तर ही सरळ वाट आणि वांकडी वाट मिळून जवळ जवळ एक मोठा थोरला त्रिकोण होत असलेला दिसेल. सरळ वाट ही या त्रिकोणाची एक बाजू असून वांकड्या वाटेनें या त्रिकोणाच्या बाकी राहिलेल्या दोन बाजू बनविल्या आहेत. या त्रिकोणाच्या कल्पनेवरून सरळ वाटेपेक्षां कालिदासाची वांकडी वाट ही किती वांकडी वळश्याची आणि लांबीची आहे, याची कल्पना चांगली लक्ष्यामध्यें येते. उत्तरेकडे ज्याला जावयाचें आहे त्याला ही वाट वांकडी होत चालली आहे, याबद्दलचें भान कालिदासही अगदीं विसरला होता, असें नाहीं. आपल्याला जावयाचें आहे कोठें आणि आपण चाललों आहों कोणीकडे, याच्याबद्दल मध्येंच स्मरण होऊन कालिदासानें एके ठिकाणीं, 'वक्रः पन्था यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां' असें म्हटलें आहे. मग असें असून कालिदासानें ही वांकडी वाट कां पत्करली ? यांत त्याचा काय हेतु असावा ? असें होण्याचें कारण काय असावें ? यांत कांहीं व्यंग असावें काय ?

ह्या प्रश्नाचें असें उत्तर दिसतें कीं, कांहीं तरी कारणामुळें ही विदिशेच्या बाजूची वाट कालिदासाच्या विशेष परिचयाची आणि प्रेमाची असली पाहिजे. आपल्या मेघाला उत्तरेकडे जावयाचें आहे ही जाणीव कालिदासाच्या मनामध्यें जागृत असतांनाही 'परि परिचिता त्या त्या वस्तू न राहविती धिरा' या उत्तररामचरितांतील रामाच्या वचनाप्रमाणें कालिदासाचा त्या त्या चिरपरिचित स्थळांविषयींचा ओढा मेघाला उत्तर दिशेच्या ऐवजीं पश्चिम दिशेकडेच– विदिशा नगरीकडे आणि वेत्रवती नदीकडेच– ओढून नेत आहे ! 'सद्यः सीरोत्कषणसुरभिक्षेत्रमारुह्य मालं किंचित् पश्चाद् व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण' या ठिकाणीं 'थोडासा पश्चिमेकडे चल, मग फिरून उत्तरेकडे जाशील,' असें कालिदास पूर्वमेघाच्या सोळाव्या श्लोकांत यक्षाच्या तोंडून मेघाला म्हणतो; आणि नंतर आम्रकूट म्हणजे अमरकंटकपर्वत, रेवा म्हणजे नर्मदा नदी, विदिशा नगरी, वेत्रवती नदी, इत्यादि ठिकाणांची एकामागून एक रांग सुरू होते. इतका या विदिशा नगरीच्या प्रदेशाकडे कालिदासाचा ओढा कां ? तूं आपली उत्तरे-

कडची वाट जराशी सोडून दे आणि पश्चिमेच्या दिशेला चल, असें कालिदासानें मेघाला कां म्हणावें ?

शिवाय, येथें दुसरी एक गोष्ट लक्ष्यांत घेण्यासारखी आहे. पूर्वमेघाच्या २४ व्या श्लोकामध्यें विदिशेचें वर्णन आहे. आणि तेथपासून ४२ व्या श्लोकापर्यंत जीं वर्णनें आहेत, त्यांतील अवंति नगरी आणि सिप्रा नदी यांच्याशिवाय बाकीच्या ज्या स्थळांचे उल्लेख या मध्यंतरींच्या १८ श्लोकांमध्यें आलेले आहेत, तीं स्थळें कोणतीं आणि कोणत्या दर्जाचीं आहेत ? हीं स्थळें एकंदर सहा असून त्यांपैकीं नीचैर्गिरि हा एक डोंगर आहे, आणि वननदी, निर्विंध्या, सिंधु, गंधवती आणि गंभीरा या पांच नद्या आहेत. यांपैकीं नीचैर्गिरि हा एक आपल्या नांवाप्रमाणें लहानसा व ठेंगणासा डोंगर असावा आणि या पांच नद्या तर बोलून चालून अप्रसिद्धच आहेत. त्यांतील कांहीं हल्लींच्या नकाशांतून आणि जुन्या वर्णनांतून क्वचित् सांपडतात आणि कांहीं कालिदासानें वार्णिल्या आहेत म्हणून त्या उज्जनीच्या आणि विदिशेच्या आसपास कोठें तरी असल्या पाहिजेत, असें मानावें लागतें. मेघदूतामध्यें कांहीं क्षेपक श्लोक म्हणून मानण्यांत आलेले आहेत. ते कालिदासाचे असोत अगर दुसऱ्या कोणाचे असोत; परंतु त्यांपैकीं एका श्लोकाचे पहिले दोन चरण येणेंप्रमाणें आहेतः—'इत्याख्याते सुरपतिसखः शैलकुल्यापुरीषु स्थित्वा स्थित्वा धनपतिपुरीं वासरैः कैश्चिदाप' यांत 'कुल्या' हा शब्द जो कोणी घातला आहे, तो मोठा विलक्षणपणें सत्यवाचक शब्द तेथें पडला आहे ! 'कुल्याल्पा कृत्रिमा सरित्' असा अमर आहे, व 'कृत्रिमा अल्पा च क्षेत्रसेकार्था कुल्या' अशी त्याच्यावर टीका आहे. 'कुल्याम्भोभिः पवनचपलैः शाखिनो धौतमूलाः' असा कालिदासाचाही प्रयोग आहे. म्हणजे फुलझाडांना आणि शेतांना पाणी लावण्याचे जे कालवे त्यांना 'कुल्या' हा शब्द लावितात. असल्या कुल्यापदाला पात्र असलेल्या बारीकसारीक नद्यांचें कालिदास ह्या ठिकाणीं मेघाला उत्तरेकडे पाठविण्याचें थांबवून वर्णन करीत बसला आहे, याचा अर्थ काय ? या प्रश्नाचें एकच समाधान आहे. आणि तें उत्तररामचरितांत म्हटल्याप्रमाणें 'तत् तस्य किमपि द्रव्यं यो हि यस्य प्रियो जनः' हेंच होय. निर्विंध्या आणि सिंधु, गंधवती आणि गंभीरा, ह्या नद्या निर्मनोविकार बुद्धीच्या तुम्हां आम्हां लोकांना

कितीही बारीकसारीक असोत; परंतु कालिदासाला त्या फार महत्त्वाच्या वाटत असल्या पाहिजेत, असें दिसतें. एरवीं त्यांचें तो वर्णन करीत बसला नसता. " उत्पतोदङ्मुखः खं " असें १४ व्या श्लोकामध्यें म्हणून झालें नाहीं, तोंच लगेच " किंचित्पश्चाद् ( पश्चिमभागेन ) व्रज लघुगतिर्भूय एवोत्तरेण " या १६ व्या श्लोकामध्यें उत्तरदिशा सोडून मेघाला कालिदास पश्चिमेकडे नेत आहे, आणि " वक्रः पंथा यदपि भवतः प्रस्थितस्योत्तराशां " या २७ व्या श्लोकांत उत्तरेकडे जाणाऱ्या मेघाची ही जरी वांकडी वाट होत आहे, तरी-ही उज्जयिनी नगरीकडे जाण्याचा कालिदास मेघाला आग्रह करीतच आहे, यांत कालिदासाचें ह्या प्रदेशावरील प्रेम स्पष्टपणें व्यक्त होत आहे. या दशार्ण आणि अवंति या जनपदांवर, विदिशा आणि उज्जयिनी या नगरां-वर, व त्यांच्या आसमंतात् भागांतील सिंधु आणि सिप्रा, गंधवती आणि गंभीरा, इत्यादि नद्यांवर कालिदासाचें अत्यंत प्रेम असलें पाहिजे, असें दिसतें. हें प्रेम जन्मभूमीच्या वात्सल्यामुळें असो, किंवा चिरसहवासाच्या बंधनानें असो, परंतु मुद्दाम वांकडी वाट काढून त्या वाटेंतील बारीकसारीक नद्या वगैरेचें वर्णन करीत बसणाऱ्या कालिदासाचें त्या प्रांतावर प्रेम होतें, असें अनुमान काढण्याला येथें निर्विवाद जागा आहे. उज्जयिनीच्या पुढें चर्मण्वतीचें उल्लंघन करून ब्रह्मावर्त प्रदेशांतील कुरुक्षेत्रावरून कनखल तीर्थाकडे जाणारा मेघ हा उत्तरदिशेकडेच वळल्यामुळें वाटेच्या त्या भागासंबंधानें पुढें आक्षेप घेण्यासारखें कांहीं उरलेलें नाहीं. परंतु " उत्पश्यामि द्रुतमपि सखे मत्प्रियार्थं यियासोः कालक्षेपं ककुभसुरभौ पर्वते ते " यांत म्हटल्याप्रमाणें लौकर जाण्याच्या आवश्यकतेच्या प्रसंगीं उशीर लागत असतानांही वांकडी वाट पत्करून 'लहान लहान ओढ्यांचीं आणि नद्यांचीं वर्णनें कालिदास करीत बसतो, यावरून तो त्याच्या परिचयाचा आणि प्रेमाचा प्रदेश असला पाहिजे, असें उघड दिसतें. कालिदासानें जी सरळ वाट त्या मुख्यार्थाचा बाध करून ही जी वांकड्या वाटेची लक्षणा केली आहे, तिच्यांतून जर कांहीं व्यंग्यार्थ निघत असेल, तर तो हाच होय कीं, हा प्रांत ही कालिदासाची चिरपरिचयाची भूमि असावी.

भूगोलविषयक दृष्टीनें हें जें अनुमान निघत आहे, तें कालिदासाचा ऐतिहासिक दृष्ट्या कालनिर्णय करते वेळीं लक्षांत ठेवणें अत्यंत आवश्यक

आहे. चुकलेल्या इतिहास दृष्टया कालिदास भलत्याच एखाद्या शतकांत जाऊं लागला, आणि त्या कालच्या ऐतिहासिक दृष्टीनें त्याचा जर ह्या स्थलांशीं संबंध येऊं शकला नाहीं, तर तो कालिदासाचा कालनिर्णय यथोचित होणार नाहीं, हें वरील प्रमाणांवरून अगदीं उघड होत आहे. कालिदासाला ऐतिहासिक दृष्टया अशाच काळामध्यें ठेवणें भाग आहे कीं, ज्या काळाचा भूगोलविषयक दृष्टीनें या उपरिनिर्दिष्ट विदिशा-उज्जयिनीच्या स्थळांशीं संबंध येऊं शकेल. असा संबंध कोठें येतो, याच्याबद्दल आतां यापुढें आपण थोडासा विचार करूं.

ज्या विदिशेचें वर्णन कालिदासानें मेघदूतामध्यें केलेलें आहे, त्याच विदिशेचा उल्लेख कालिदासाच्या मालविकाग्निमित्रनामक नाटकामध्यें आलेला आहे. मालविकाग्निमित्रामध्यें विदिशा ही नदी आणि नगरी म्हणून दोन्ही रीतीने वर्णिलेली आहे. मेघदूतामध्यें विदिशा ही नगरी वेत्रवती नदीच्या कांठीं असल्याचें वर्णिलें आहे. बहुतकरून वेत्रवती आणि विदिशा हीं एकाच नदीचीं दोन निरनिराळीं नांवें असलीं पाहिजेत. परंतु तें कांहीं असलें, तरी मेघदूतांतील आणि मालविकाग्निमित्रांतील विदिशा नगरी ही एकच होय, हें निर्विवाद आहे. त्या विदिशेचा राजा अग्निमित्र हा ऐतिहासिक राजा आहे. पुराणांतील वंशावळींतून त्याचें नांव सांपडतें, व ख्रिस्ती शकाच्या पूर्वीच्या दुसऱ्या शतकामध्यें शुंगवंशांत पुष्पमित्र, अग्निमित्र, वसुमित्र, इत्यादि राजे होऊन गेल्याचें ऐतिहासिक पुराव्यावरून सिद्ध होत आहे. ह्यांपैकीं अग्निमित्राला नायक कल्पून कालिदासानें मालविकाग्निमित्र हें नाटक लिहिलें आहे. या नाटकांत अग्निमित्राच्या वेळेच्या कित्येक ऐतिहासिक ठळक गोष्टी वर्णिलेल्या आहेत. असलीं ठळक ठळक गोष्टींचीं वर्णनें अग्निमित्राच्या पाठीमागून कितीही शतकांनीं कालिदास जन्मास आला असला, तरी त्याला करणें इतिहासप्रसिद्धीवरून शक्य आहे. परंतु मालविकाग्निमित्र नाटकामध्यें कित्येक अशा कांहीं बारीकसारीक गोष्टी वर्णिलेल्या आहेत कीं, त्या काल्पनिक म्हणतां येत नाहींत किंवा इतिहासप्रसिद्ध मानणेंही शक्य नाहीं. मोठ्या गोष्टी असतील, तर त्या इतिहासांत पुष्कळ दिवस टिकतील. परंतु बारीकसारीक गोष्टी इतिहासांत कोण लिहितो ? आणि त्या इतिहसांत लिहिल्या गेलेल्या नसल्या, तर अग्निमित्राच्या पाठीमागून कैक

शतकांनीं जन्मास येणाऱ्या कालिदासाला त्या कशा माहीत व्हाव्या? परंतु त्या तर कालिदासाला माहीत आहेत. तेव्हां त्यावरून असें अनुमान निघतें कीं, अग्निमित्राच्या कारकीर्दीतील बारीकसारीक गोष्टी लोकांच्या लक्षांत होत्या. अशा वेळीं—म्हणजे अग्निमित्राच्या समानकाळींच किंवा त्याच्या पाठीमागून लौकरच, खिस्ती शकाच्या पूर्वीच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकांत—कालिदास झाला असला पाहिजे. अग्निमित्राच्या राज्यांतील ह्या बारीकसारीक गोष्टींसंबंधींच्या मालविकाग्निमित्र नाटकांतील उल्लेखाबद्दल प्रो. विल्सन यांनीं असें म्हटलें आहे कीं, "The events of his reign, which are familiarly alluded to, were not of a character to have survived any very protracted interval in popular recollection." मेघदूतांतील बारीकसारीक स्थळांच्या वर्णनांवरून कालिदास हा त्या प्रांतांतील जन्मभूमींतील रहिवासी असावा, हें अनुमान काढण्याला जशी जागा मिळते, त्याचप्रमाणें अग्निमित्राच्या कारकीर्दीतील बारीकसारीक गोष्टींचा उल्लेख मालविकाग्निमित्र नाटकांत आलेला असल्यावरून कालिदास हा अग्निमित्राच्या किंवा त्याच्या जवळच्या काळांतील रहिवासी असावा, असें अनुमान काढण्याला जागा मिळते.

मालविकाग्निमित्रामध्यें मालविका ही मुख्य नायिका असून धारिणी आणि इरावती अशा दोन उपनायिका आहेत. नायिकेच्या पात्राला उठाव मिळण्याकरितां नाटकात उपनायिका कदाचित् येवो, पण अशा प्रकारची एक उपनायिका पुरेशी असतांना तेथें दोन उपनायिका कशाला? काल्पनिक उपनायिकांची कल्पना योजावयाची झाल्यास एकीनें काम भागत असतां आणखी दुसरीची योजना करून कोणीही चांगला कवि हा कल्पनागौरवाचा दोष आपल्या पदरीं बांधून घेणार नाहीं. यावरून इरावती ही अग्निमित्र राजाची दुसरी एक राणी खरोखरच असली पाहिजे, असें दिसतें.

तसेंच धारिणी राणीचा भाऊ वीरसेन हा जातीनें कमी दर्जाचा होता, ही गोष्टही बारीकसारीक गोष्टींपैकींच असून आणि नाटकाच्या कथानकाला आवश्यक नसूनही कालिदासानें ती नाटकांत नमूद केली आहे.

त्याचप्रमाणें पहिल्या अंकामध्यें अग्निमित्रानें विदर्भ देशच्या राजाला लिहिलेल्या पत्रांतील एक अवतरण आलेलें आहे. तें असें कीं, 'स

(माधवसेनः) त्वया मदपेक्षया सकलत्रसोदर्यो मोक्तव्यः' यांतील माधव-सेनाची सोदर्या म्हणजे बहीण जी मालविका ती नाटकाला उपयोगी असल्यामुळें तिचा उल्लेख उचित आहे. परंतु माधवसेनाच्या कलत्राचा म्हणजे बायकोचा जो उल्लेख वरील वाक्यांत आलेला आहे, तो नाटकांत प्रकृता-नुपयोगी असल्यामुळें वास्तविक अनावश्यक आहे. असें असूनही तो उल्लेख तेथें करण्यांत आलेला आहे. ही माधवसेनाची बायको सुद्धां इतरांच्या बरोबर पकडली गेली असल्याची गोष्ट अगदीं बारीकसारीक गोष्टींपैकींच एक आहे. आणि शिवाय ती इतकी बारीकसारीक आहे कीं, कालिदास जर अग्नि-मित्राच्या किंवा त्याच्या जवळपासच्या काळामध्यें जन्मलेला नसेल, आणि जर तो पांचव्या शतकांतील गुप्त राजांच्या कारकीर्दींत अगर त्याच्याही पाठीमागूनच्या एखाद्या शतकामध्यें जन्मलेला असेल, तर वैदर्भाच्या अंत-पालानें केलेल्या हल्ल्यामध्यें अग्निमित्र राजाच्या बायकोच्या भावाचें कलत्र सांपडलेलें होतें, ही गोष्ट सहा-सातशें किंवा त्याहूनही अधिक वर्षांनंतर कोणाच्याही लक्षांत राहण्याइतकी महत्त्वाची खात्रीनें नाहीं, हें स्पष्ट आहे.

वर उल्लेखिलेल्या वाक्याच्या नंतरच्याच एका भाषणांत 'तद् यात-व्यपक्षे स्थितस्य पूर्वसंकल्पित (किंवा—संकल्पितं) समुन्मूलनाय वीरसेन-प्रमुखं दंडचक्रमाज्ञापय' असें एक वाक्य आलें आहे. यांतील 'पूर्वसंकल्पित' याचा तात्पर्यार्थ काय? पूर्वसंकल्पित म्हणजे केव्हां संकल्पित? हें वाक्य येण्याच्या पूर्वीं खुद्द मालविकाग्निमित्र नाटकामध्यें तर या संकल्पितत्वा-बद्दलचा कोठेंही उल्लेख नाहीं. मग कालिदास येथें 'पूर्वसंकल्पित' असें कसें म्हणतो? कोठें तरी 'पूर्वसंकल्पित' असल्यावांचून कोणी असा निर्देश करणार नाहीं. तेव्हां खुद्द नाटकांत असा पूर्वींचा उल्लेख कोठें नसेल, तर अर्थात् तो नाटकाच्या बाहेरचा कोठला तरी असला पाहिजे. आणि तो जर कालिदासाला माहीत असेल, तर ह्याही एका बारीकसारीक गोष्टीच्या ज्ञाना-वरून कालिदास हा अग्निमित्राच्या अगदीं जवळच्या काळांतील रहिवासी असावा, हें अनुमान अपरिहार्य होतें.

त्याचप्रमाणें याच मालविकाग्निमित्र नाटकामध्यें पांचव्या अंकांत आणखी एक पुष्पमित्राकडून अग्निमित्राला आलेलं पत्र दिलेलें आहे. या नाटकांत अशीं पत्रें दाखल केलेलीं आहेत, ही एक विशेष गोष्ट आहे. परंतु त्याच्याहून विशेष

गोष्ट म्हटली म्हणजे या पांचव्या अंकांतील पत्रांतील 'विगतरोषचेतसा' हें पद होय. हें पद या ठिकाणीं कां घालण्यांत आलेलें आहे, हें एक मोठें कोडें आहे. टीकाकारांनीं कांहीं तरी काल्पनिक समाधानें सांगितलीं आहेत. परंतु तीं अगदींच असमाधानकारक आहेत. आणि तसलीं समाधानें म्हणजे किती झालें तरी त्या कल्पनाच! तेव्हां त्यांच्याकडे दुर्लक्ष करणें प्राप्त आहे. पण मग अशी शंका येते कीं, तर मग 'विगतरोषचेतसा' हे शब्द ह्या पत्रांत आले कसे? साऱ्या नाटकांत पुष्पमित्र आणि अग्निमित्र यांच्या दरम्यान रोष उत्पन्न झाल्याचें कोठेंही सांगितलेलें नाहीं; आणि मग हा एकदम रागाचा उल्लेख मध्येंच कसा येतो? यावरून असें दिसतें कीं, हें पत्र कदाचित् खरें असेल. निदान आपल्याला अज्ञात अशा कांहीं कारणांनीं बाप आणि मुलगा यांच्यामध्यें रोष उत्पन्न झालेला असेल. परंतु त्याचा नाटकांत कांहीं उपयोग नसल्यामुळें त्या कथाभागाचा उल्लेख नाटकांत आणलेला नाहीं. परंतु ती हकीकत कालिदासाला माहीत असल्यामुळें 'विगतरोषचेतसा' हे शब्द कालिदासाच्या हातून सहजगत्या लिहिले गेले असावेत. त्या रोषाच्या कारणाचें कालिदासाला कांहीं गूढ वाटलें नाहीं, याचें कारण हें उघड आहे कीं, तें त्याला माहीत होतें. आणि त्या कारणासारखी क्षुल्लक गोष्टही त्याला माहीत होती, यावरून तो अग्निमित्राच्या किंवा त्याच्या जवळच्या काळांतील रहिवासी असावा, हेंच अनुमान जास्त दृढ होतें.

अशा आणखीही कित्येक बारीकसारीक गोष्टी दाखवितां येण्यासारख्या आहेत. परंतु त्या सगळ्यांवरून जें अनुमान काढावयाचें, तें एकच आहे. आणि तें अनुमान हें कीं, ह्या इतक्या बारीकसारीक गोष्टी असून सुद्धां त्या ज्या अर्थी कालिदासाला माहीत होत्या, त्या अर्थी त्या गोष्टी ज्या काळीं घडल्या त्या अग्निमित्राच्या कारकीर्दीच्या जवळपासच्या काळामध्येंच कालिदास हा जन्माला आलेला असला पाहिजे. म्हणजे कालिदास हा ख्रिस्तीशकाच्या पूर्वीच्या पहिल्या किंवा दुसऱ्या शतकामध्यें होऊन गेलेला असला पाहिजे. आणि दुसऱ्या शतकामध्यें अग्निमित्र हा राजा विदिशा येथें राज्य करीत होता, हें पूर्वीं सांगितलेलेंच आहे. व हा विदिशेचा प्रदेश जन्मभूमीच्या किंवा परिचयाच्यासंबंधानें कालिदासाला प्रिय होता, हेंही वर दाखविलेलेंच आहे. यावरून साधारणपणें असा निष्कर्ष निघतो कीं,

मालविकाग्निमित्र नाटकावरून ख्रिस्ती शकापूर्वीचें पहिलें किंवा दुसरें शतक हा जो कालिदासाचा समय म्हणून प्राप्त होतो, तो मेघदूतांतील भूगोल-विषयक स्थलांच्या अनुमानाशीं विरोधी नाहीं. मेघदूतामधून सूचित होणारें कालिदासाचें स्थळ आणि मालविकाग्निमित्रावरून दिसून येणारी कालि-दासाची वेळ हीं एकमेकांशीं विसंगत नसून तीं एकमेकांना अनुकूल आहेत, त्यांची एकमेकांशीं एकवाक्यता आहे, आणि तीं एकमेकांना पुष्टि देणारीं आहेत, एवढी गोष्ट मेघदूताच्या भूगोलविषयक आणि मालविकाग्निमित्राच्या इतिहासविषयक परीक्षणापासून निष्पन्न होते, यांत संशय नाहीं.

---

# चारुदत्त आणि मृच्छकटिक

भास कवीचीं नाटकें अलीकडे उपलब्ध झाल्यापासून संस्कृत वाङ्मयाच्या वाचकांना आपल्या वाडवडिलांनीं पुरून ठेवलेला निधि अकस्मात् सांपडून जसा आनंद व्हावा त्या प्रकारचा आनंद होत आहे. संस्कृत वाङ्मय हें अतिशय श्रीमंत वाङ्मयांपैकीं एक वाङ्मय आहे, हें खरें आहे. तरी पण असा कोण श्रीमंत आहे कीं, आणखी एखादा नवीन रत्नसंचय उपलब्ध झाला असतां तो त्याला नको आहे ! आणि वाङ्मयाच्या वाचकांची गोष्ट तर अशी आहे कीं, पहिलें उपलब्ध वाङ्मय कितीही विपुल असलें, तरी नवीन उपलभ्य-मान वाङ्मयाकरितां ते सदोदित बुभुक्षितच झालेले असतात. अशा दृष्टीनें पाहिलें असतां भास कवीच्या नवीन उपलब्ध झालेल्या नाटकांची किंमत फार मोठी आहे. या कवीचीं सुमारें बारा-तेरा नाटकें आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलीं आहेत. त्यांपैकीं चारुदत्त हें (प्रसिद्धीच्या क्रमांतील) शेवटचें नाटक आहे. हें नाटक कोणीही वाचक वाचूं लागला असतां मृच्छकटिक नाटक आणि हें नाटक यांच्या

तुलनेची कल्पना मनामध्यें प्रादुर्भूत न होणें अगदीं अपरिहार्य आहे, इतकें या दोन नाटकांमध्यें ऐक्य आहे. चारुदत्त नाटकाचे फक्त चारच अंक आहेत. आणि मृच्छकटिक नाटकांतील पहिले चार अंक आणि हे चार अंक बहुतेक सर्व अगदीं एकसारखेच आहेत, असें सामान्यतः म्हटलें, तरी कांहीं हरकत नाहीं. तरी पण त्यांच्यामध्यें कांहीं फरकही आहेत. व ते फरक पाहिले म्हणजे असे फरक कां केलेले असावेत, असा प्रश्न मनामध्यें उत्पन्न झाल्यावांचून रहात नाहीं. या प्रश्नाचें समाधान करून घेण्याच्या मार्गामध्यें मन गुंतलेलें असतांना त्याला पुष्कळ नवीन आणि मनोरंजक गोष्टी दिसून येतात. त्यांपैकीं कांहीं महत्त्वाच्या गोष्टींचें दिग्दर्शन पुढें करण्यांत येत आहे.

## कालविचार

मृच्छकटिक नाटकाच्या आरंभापासून तों अखेरीपर्यंत जी गोष्ट वर्णिलेली आहे, ती घडून येण्याला एकंदर किती दिवसांचा अवधि लागलेला असावा, हा प्रश्न आपण विचाराकरितां घेऊं. तो अवधि चार दिवसांचा असावा, असें वुइल्सन साहेबांनीं आपल्या 'हिंदु थिएटर' या नांवाच्या पुस्तकांतील मृच्छकटिकाच्या प्रास्ताविक टिपणांमध्यें नमूद केलें आहे. आणि मृच्छकटिक नाटकाचे अमेरिकन भाषांतरकार, आर्थर वुइल्यम, यांनीं हा अवधि सहा दिवसांचा असावा, असें सांगितलें आहे. परंतु हीं दोन्हीही मतें बरोबर नाहींत.

## षष्ठी, सप्तमी आणि अष्टमी

भास कवीच्या मूळ चारुदत्त नाटकाच्या अनुरोधानें पाहिलें असतां पहिल्या अंकांतील गोष्ट घडून आली त्या दिवशीची तिथि षष्ठी असावी. कारण, शकार व विट हे पाठीस लागले असतां वसंतसेना चारुदत्ताच्या घरांत शिरून तेथून परत जाते वेळीं तिनें आपल्या अंगावरील दागिने चारुदत्ताच्या घरीं ठेवण्याची इच्छा प्रदर्शित केली, तेव्हां ते दागिने तिच्यापासून घेऊन विदूषकानें रदनिकेपाशीं ठेवावयाला दिले व ते देतांना तो तिला म्हणाला, "रदनिके, हे सुवर्णालंकार तूं घे. षष्ठीच्या आणि सप्तमीच्या दिवशीं हे तुझ्यापाशीं असूं देत. अष्टमीच्या दिवशीं अनध्याय आहे त्या दिवशीं मी संभाळीन." यावरून पहिल्या अंकाच्या दिवशीं षष्ठी होती

हें उघड होतें. तसेंच पहिल्या अंकाच्या प्रारंभींच कुसुमवासित प्रावरण देण्याकरितां विदूषक चारुदत्ताकडे जात असतां, त्याच्याबद्दल तो 'षष्ठी-कृतदेवकार्यस्य चारुदत्तस्य' असें म्हणतो. यावरूनही पहिल्या अंकाचे दिवशीं षष्ठीच होती, हें स्पष्ट होतें.

पुढें तिसऱ्या अंकाच्या दिवशीच्या रात्रीं चारुदत्त आणि विदूषक हे गाणें ऐकून मध्यरात्रीचे सुमारास घरीं परत आल्यानंतर विदूषकाच्या सांगण्याप्रमाणें रदनिका विदूषकाला म्हणते कीं, "हें सुवर्णभांड षष्ठीला आणि सप्तमीला मीं संभाळिलें. आज अष्टमी आहे. तेव्हां आतां तूं हें संभाळ." यावरून तिसऱ्या अंकांतील सज्जलकानें (शर्विलकानें) केलेली चोरी वगैरे गोष्टी अष्टमीच्या दिवशीं रात्रीं झालेल्या असाव्यात, हेंही उघड होतें. तिसऱ्या अंकांतील गोष्ट अष्टमीच्या रात्रींच झालेली असली पाहिजे, याला भास कवीच्या नाटकांत आणखीही दोन प्रत्यंतरें आहेत. त्यांपैकीं पहिलें असें कीं, चारुदत्त आणि विदूषक हे मध्यरात्रीचे सुमारास गाण्याहून परत येत असतांना 'हा अष्टमीचा चंद्र अस्ताला जात आहे' अशा प्रकार-चें वर्णन चारुदत्त "असौ हि दत्वा तिमिरावकाशमस्तं व्रजत्यष्टमपक्षचंद्रः" या श्लोकामध्यें करीत आहे. आणि दुसरें प्रत्यंतर असें कीं, वसंतसेनेनें ठेविलेले दागिने चोरीस गेल्याची बातमी ऐकून चारुदत्ताच्या बायकोला फार वाईट वाटलें, व त्या दागिन्यांची फेड करण्याचें कांहीं तरी साधन आपल्या नवऱ्याच्या हातांत द्यावें अशा हेतूनें विदूषकाला बोलावून आपल्याजवळची रत्नमाला ती त्याला देऊं लागली; तेव्हां ही रत्नमाला आतांच देण्याचें कारण काय, असा प्रश्न मंदबुद्धीच्या विदूषकानें साहजिकपणेंच विचारला. तेव्हां तिनें सांगितलें कीं, "मला षष्ठीचा उपवास आहे; त्यानिमित्त हें रत्नमालेचें स्वस्तिवायन मी ब्राह्मणाला देत आहें." त्यावर विदुषक म्हणतो, "आज तर अष्टमी आहे (अष्टमी खल्वद्य)!" तेव्हां "माझ्या हातून प्रमादामुळें तो दिवस चुकला, म्हणून मी आज ब्राह्मणाची पूजा करीत आहें," असें सांगून आणि विदूषकाची कशी तरी समजूत घालून तिनें ती रत्नमाला विदूषकाजवळ दिली. सारांश, त्या दिवशीं अष्टमी होती, हें खास आहे. आतां पहिल्या अंकांतील गोष्ट षष्ठीला आणि तिसऱ्या अंकांतील गोष्ट अष्टमीला घडली,

तर या दोहोंच्या मधील दुसऱ्या अंकांतील गोष्ट सप्तमीलाच घडली असली पाहिजे, हें अगदीं निर्विवाद आहे. कारण, पहिल्या अंकाच्या दुसऱ्या दिवशीं दुसरा अंक झाला असावा, असें दुसऱ्या अंकांतील भाषणावरून दिसतें. सारांश, पहिला, दुसरा आणि तिसरा, हे अंक भासाच्या रचनेप्रमाणें अनुक्रमें षष्ठी, सप्तमी आणि अष्टमी याच दिवशीं झालेले असले पाहिजेत. कालाचा स्पष्ट निर्देश होण्याकरितां तिथींचा उपयोग करण्याची भासाची पद्धत त्याच्या दुसऱ्या नाटकांतही दिसून येते. प्रतिज्ञायौगंधरायण या नाटकांत अष्टमी, चतुर्दशी या तिथींचे असेच उल्लेख केलेले आहेत.

## महिना

षष्ठी, सप्तमी आणि अष्टमी ह्या तीन तिथि जरी निश्चित झाल्या, तरी ह्या तिथि कोणत्या महिन्यांतील आहेत, हें निश्चित करण्याला भास कवीच्या नाटकांत कांहीं साधन उपलब्ध होत नाहीं. चवथ्या अंकाच्या शेवटीं जेव्हां वसंतसेना चारुदत्ताकडे अभिसारिकेच्या वेषानें जावयाला निघते, तेव्हां तिची चेटी "एतत् पुनरभिसारिकासहायभूतं दुर्दिनमुन्नमितम्" असें म्हणते. शूद्रकानें आपल्या मृच्छकटिकांत या वाक्यांत थोडा बदल केला आहे. त्यांतील वाक्य "उन्नमत्यकालदुर्दिनम्" असें आहे. शूद्रकाच्या म्हणण्याप्रमाणें ते अकालीं उत्पन्न झालेले ढग होते; म्हणजे ते पावसाचे दिवस नसावेत, असें दिसतें. परंतु भासानें 'दुर्दिनाला' 'अकाल' हें विशेषण लाविलेलें नसल्यामुळें त्याच्या कल्पनेप्रमाणें तो महिना पावसाळ्याचा असेल किंवा कदाचित् नसेलही. परंतु भासानें 'दुर्दिनाला' 'अकाल' हें विशेषण जरी प्रत्यक्षपणें लाविलेलें नसलें, तरी त्याच्या नाटकांतही पहिल्याच अंकांत, म्हणजे षष्ठीच्या रात्रीं, निरभ्र चंद्रोदयाचें वर्णन आलेलें असल्यामुळें तो महिना पावसाळ्यांतील असण्यापेक्षां इतर कोणत्या तरी ऋतूंतील असावा, हेंच जास्त संभवनीय दिसतें.

महिना ठरविण्याला आणखी एक साधन आहे. परंतु त्याचाही जसा उपयोग व्हावा तसा होत नाहीं. ज्या षष्ठीचा वर उल्लेख केलेला आहे, ती कोणत्या तरी व्रताची षष्ठी असली पाहिजे, हें उघड आहे. कारण, "मला षष्ठीचा उपवास आहे" असें चारुदत्ताची बायको विदूषकाला सांगत आहे. तसेंच पहिल्या अंकाच्या प्रारंभींच, म्हणजे षष्ठीच्या दिवशीं सकाळींच,

आपल्याला असें आढळून येतें कीं, त्या दिवशीं सूत्रधाराची स्त्री जी नटी तीही "अभिरूपपति" या नांवाच्या व्रतानिमित्त उपवास करीत होती. परंतु एवढ्यावरून ही कोणत्या व्रताची षष्ठी असावी, याचा निर्णय करतां येत नाहीं. मृच्छकटिकामध्यें या षष्ठीला रत्नषष्ठी असें धूतेनें "अहं खलु रत्नषष्ठीमुपोषितासम् । तत्र यथाविभवानुसारेण ब्राह्मणः प्रतिग्राहितव्यः । स च न प्रतिग्राहितः । तत् तस्य कृते प्रतीच्छेमां रत्नमालिकाम् । " या वाक्यांत म्हटलें आहे. परंतु हल्लीं ज्या षष्ठ्या प्रसिद्ध आहेत, त्यांत ही रत्नषष्ठी नाहीं. तसेंच जुन्या आचारग्रंथांतून जीं कांहीं षष्ठीव्रताचीं नांवें दिलेलीं आहे, त्यांतही रत्नषष्ठी हें नांव कोठेंच आढळत नाहीं. अशा रीतीनें हीं वर दिलेलीं दोन प्रमाणें संदिग्ध असल्याकारणानें आणि यांहून अन्य प्रमाणें उपलब्ध होत नसल्याकारणानें त्या वेळीं महिना कोणता होता, हें नक्की ठरवितां येणें शक्य नाहीं.

## पक्ष

असो. याप्रमाणें महिन्यासंबंधानें विचार झाल्यानंतर हा पक्ष तरी कोणता होता, हें ठरवितां येईल किंवा नाहीं याचा आपण विचार करूं. भास कवीच्या पहिल्या अंकांत शकार आणि विट हे वसंतसेनेचा पाठलाग करतात, वसंतसेना पक्षद्वारानें चारुदत्ताच्या घरांत शिरते, विदूषक आणि रदनिका रस्त्यावर बळी ठेवण्याकरिता दिवा घेऊन बाहेर येतात, वगैरे गोष्टी घडत असतांना अवशीस कांहीं वेळपर्यंत काळोखच होता, असें 'लिंपतीव तमोऽगानि वर्षतीवांजनं नभः' एतत्प्रभृति श्लोकादिकांतून वर्णन आहे. आणि पुढें कांहीं वेळानें जेव्हां वसंतसेना आपल्या घरीं परत जाऊं लागली, तेव्हां "उदयति हि शशांकः" इत्यादि चंद्रोदयाचें वर्णन दिलेलें आहे. यावरून ही वद्यपक्षांतील षष्ठी असावी, असें दिसतें. परंतु याच षष्ठीच्या पुढील अष्टमीच्या रात्रीं मध्यरात्रीचे सुमारास गाणें ऐकून जेव्हां चारुदत्त आणि विदूषक परत येतात, तेव्हां "असौ हि दत्वा तिमिरावकाशमस्तं गतो ह्यष्टमपक्षचंद्रः । " असें चंद्रास्ताचें चारुदत्त वर्णन करतो व "सुष्ठु भवान् भणति । अन्तर्धीयमानचन्द्रलब्धावकाशोऽवतरतीव प्रासादादन्धकारः । " अशा शब्दांनीं विदूषकही तोच अर्थ प्रकट करतो. या मध्यरात्रीं होणाऱ्या चंद्रास्तावरून ती अष्टमी शुक्लपक्षांतील असावी,

असें प्राप्त होतें. एवंच शुक्ल आणि कृष्ण असे दोन्हीही पक्ष येथें प्राप्त होऊं लागल्यामुळें कांहींच निर्णय करतां येणें शक्य नाहीं.

Unity of Time

तीन दिवसांच्या अवधींत एकदां वद्यपक्षाचें वर्णन आणि एकदां शुक्लपक्षाचें वर्णन, ही भास कवीची नजरचूक झालेली असावी, असें म्हणण्या-वांचून दुसरें गत्यंतर नाहीं. असल्या बाबतींकडे भास कवीचें दुर्लक्ष झालेलें असल्याची आणखीही कांहीं उदाहरणें देतां येण्यासारखीं आहेत.

## पहिलें उदाहरण

भास कवीच्या याच 'चारुदत्त' नामक चार अंकी नाटकांतील पहिल्या अंकाच्या प्रारंभीं सकाळची वेळ असल्याचा उल्लेख आलेला आहे. सूत्रधार प्रारंभींच म्हणतो कीं, "मला भूक लागली आहे; तेव्हां घरांत सकाळचा खाण्याचा कांहीं पदार्थ (प्रातराश) आहे किंवा नाहीं, हें आपल्या बायकोला हाक मारून विचारूं या." असें म्हणून तो नटीला हाक मारतो; नटीचें आणि त्याचें चूर्णवृद्धानें सांगितलेल्या षष्ठीच्या उपवासव्रतासंबंधानें कांहीं बोलणें होतें; आणि नंतर तो नटीच्या सांगण्याप्रमाणें कोणा तरी ब्राह्मणाला बोलावण्याकरितां निघत असतां विदूषकाची आणि त्याची गांठ पडून तो त्याला जेवावयाला बोलावतो. परंतु मला तुझें आमंत्रण घेण्याला सवड नाहीं, असें सांगून विदूषक चारुदत्ताच्या घरीं येऊन दोघांचें कांहीं बोलणें होतें न होतें तोंच 'लिंपतीव तमोऽगानि' इत्यादि निबिड अंधकार पडल्याचीं वर्णनें सुरू होतात! पण सूत्रधाराची सकाळीं विदूषकाशीं पडलेली गांठ आणि वसंतसेनेचा संध्याकाळचा प्रवेश यांच्यामध्यें खात्रीनें इतकी दहा बारा तासांची वेळ गेलेली नाहीं. ग्रीक नाटकांतून आणि त्यांचें अनुकरण करणाऱ्या इतरही कांहीं पाश्चिमात्य भाषांतील नाटकांमधून Unity of Time and Place चें तत्त्व पाळ-ण्यांत येत असे. व तीच पद्धत आपल्या संस्कृत भाषेंतलि नाटकांच्या अंकामधूनही पाळलेली असल्याचें बहुधा आढळून येतें. त्या नियमाप्रमाणें पाहिलें असतां 'चारुदत्त' नाटकाच्या सबंध पहिल्या अंकाची लागोपाठ एकच वेळ असली पाहिजे. व अशाच अर्थाचे त्या अंकामध्यें उल्लेखही

आहेत. आणि एका प्रवेशाचा सांधा त्याच्या पुढील दुसऱ्या प्रवेशाशीं अशा रीतीनें जोडून दिलेला आहे कीं, ते सगळे प्रवेश लागोपाठच्या एकाच वेळेंत व्हावयाला पाहिजे आहेत. म्हणून सूत्रधाराचा प्रवेश सकाळीं झाला असेल आणि वसंतसेनेचा प्रवेश संध्याकाळीं झाला असेल अशी कल्पना करून वरील विसंगतपणाचें निरसन करणें शक्य नाहीं.

## दुसरें उदाहरण

वेळेसंबंधानें भास कवीचें दुर्लक्ष झालेलें असल्याचें दुसरें उदाहरण त्या कवीच्या 'अभिषेकनाटक' या नांवाच्या नाटकांत दिसून येतें. या नाटकाच्या दुसऱ्या अंकांत सीतेला भेटण्याकरितां मारुति अशोकवनामध्यें गेला असतां त्याच वेळीं रावण सीतेचें मन वळविण्याकरितां तेथें येतो. त्या वेळीं "उदयति गगने विजृंभमाणः कुमुदवनप्रियबांधवः शशांकः" अशा रीतीनें रावण चंद्र उगवल्याचें वर्णन करतो, आणि थोड्याशा वेळेच्या संभाषणामध्यें सीतेनें त्याचा धिक्कार केल्यानंतर त्याला तेथून जाण्याला कांहीं तरी निमित्त पाहिजे म्हणून पडद्यांतून "जयतु महाराजः। दश नाडिकाः पूर्णाः। अतिक्रामति स्नानवेला। इत इतो महाराजः।" असे शब्द उच्चारण्यांत येतात, आणि रावण रंगभूमीवरून नाहींसा होतो. दिवसाप्रमाणें रात्रींही कोणाला स्नान करतां येणार नाहीं, असें नाहीं. परंतु मुख्यार्थाच्या दृष्टीनें, कविप्रसिद्धीच्या दृष्टीनें, लोकव्यवहाराच्या दृष्टीनें आणि नाटकांतील वर्णनांच्या परिपाठाच्या दृष्टीनें पाहिलें असतां स्नानवेला म्हणजे स्वाभाविकपणें दुपारच्याच स्नानाची वेळ होय. अशा विचारसरणीनें पाहिलें असतां रात्रीच्या चंद्रोदयाचें वर्णन आणि त्याच्यानंतरच्या सुमारें पाव घटकेच्या अवकाशानें स्नानाच्या वेळेचें वर्णन, यांच्यामध्यें वेळेची विसदृशता कशी आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल.

## तिसरें उदाहरण

परंतु याच कवीच्या 'अविमारक' नामक नाटकामध्यें रात्रि-स्नानाचाही एक उल्लेख (पान ३२) आलेला असल्याकारणानें वरील उदाहरण बरोबर नाहीं, असें कोणास वाटत असल्यास आणखी उदाहरणें देतां येण्याजोगीं आहेत. 'स्वप्नवासवदत्त' या नाटकाच्या पहिल्या अंकामध्यें कोणी

एक ब्रह्मचारी प्रवेश करतो, तेव्हां 'स्थितो मध्याह्नः' असें त्या वेळीं मध्यान्ह असल्याचें तो दिग्दर्शन करतो, व पुढें लगेच थोडा वेळपर्यंत—फार तर सुमारें पाव घटका—पद्मावती, यौगन्धरायण, वासवदत्ता, कांचुकीय, इत्यादि पात्रांचें लावाणकांतील अग्निदाहासंबंधींचें त्या ब्रह्मचाऱ्याशीं थोडेंसें संभाषण झाल्यानंतर पद्मावतीच्या जाण्याची आणि अंकाच्या समाप्तीचीही वेळ प्राप्त झाल्यामुळें भास कवि कांचुकीयाच्या तोंडामध्यें सूर्यास्ताचा पुढील श्लोक घालतो.

खगा वासोपेताः सलिलमवगाढो मुनिजनः प्रदीप्तोऽग्निर्भाति प्रविचरति धूमो मुनिवनम् । परिभ्रष्टो दूराद् रविरपि च संक्षिप्तकिरणो रथं व्यावृत्यासौ प्रविशति शनैरस्तशिखरम् ॥

## चवथें उदाहरण

'बालचरित' या नाटकामध्येंही भासानें कालासंबंधीं असाच घोटाळा केलेला आहे. 'बालचरिता'मध्यें कृष्णाच्या बालचरित्राची कथा आहे. या नाटकाच्या पहिल्या अंकांत कृष्णाष्टमीच्या मध्यरात्रीं कृष्णजन्म झाल्यानंतर वसुदेव आपल्या पुत्राला घेऊन नंदाकडे देण्याकरितां गोकुळांत येतो. तेव्हां तेथें नंद आणि वसुदेव यांचें जें संभाषण होतें, त्यांत तें संभाषण चाललें असतां 'प्रभाता रजनी' असा उजाडल्याचा उल्लेख दोनदां आलेला आहे. पुढें इतकें उजाडल्यावर दुसऱ्या अंकांत वसुदेव मथुरेमध्यें परत येतो, आपल्या कारागृहामध्यें प्रवेश करतो, व कंस जागृत होऊन त्या सप्तम गर्भाला तो शिलेवर आपटतो, आणि तरी पण या वेळींही मथुरेंत कंसाच्या वाड्यांत अजून रात्रच आहे, व या सगळ्या गोष्टी झाल्यानंतर कंस इकडे तिकडे पहातो, तेव्हां त्याला दुसऱ्या अंकाच्या शेवटीं आढळून येतें कीं, ' अये, प्रभाता रजनी ! ' वसुदेव गोकुळांतून निघाला तेव्हां गोकुळांत जर उजाडलेलें होतें, तर तो मथुरेंत येऊन कंस कात्यायनीदेवीला शिलेवर आपटीपर्यंत मथुरेमध्यें काय उजडावयाचें थांबलें होतें ?

## पांचवें उदाहरण

'अविमारक' नाटकामध्येंही असाच घोटाळा आढळून येतो. त्या नाटकाच्या तिसऱ्या अंकांत नायिकेची विलासिनी या नांवाची एक दासी

'गतप्रायः प्रदोषः । आरूढा ज्योत्स्ना ।' असें एक वाक्य म्हणते. म्हणजे यावरून संध्याकाळीं थोडा वेळ जो प्रदोषकालीन काळोख होता, तो नाहींसा होऊन आतां चंद्राचें चांदणें बरेंच पडलेलें असावें, असा अर्थ निघतो. परंतु त्याच रात्रीं मध्यान्हीचे सुमारास नायक जेव्हां नायिकेच्या राजवाड्याच्या भिंतीवरून चढून आंत जाण्याकरितां येतो, तेव्हा सज्जलकाच्या चोरीच्या वेळेप्रमाणें जिकडे तिकडे 'तिमिरगहनभीमं वर्तते चार्धरात्रम्', 'अंतर्धानमिवोपयाति सकलं प्रछन्नरूपं जगत् ।' 'तिमिरमिव वहंति मार्गनद्यः पुलिननिभाः प्रतिभाति हर्म्यमालाः । तमसि दश दिशो निमग्नरूपाः प्लवतरणीय इवायमन्धकारः ॥' अशी स्थिति यक्षिणीच्या कांडीनें एकदम होऊन जाते! कवि निरंकुश असतात, हें खरें आहे. तेव्हां पहिली कल्पना त्यांनीं वाटेल तशी करावी. पण एकदां ती केल्यावर मग तिच्याविरुद्ध जाण्याला मात्र ते निरंकुश नसतात. परंतु या गोष्टीला जितकें महत्त्व द्यावयाला पाहिजे, तितकें भास कवि देत नसला पाहिजे, असें दिसतें.

## शूद्रकाची सुधारणा

अशा प्रकारची –परंतु याच्याहूनही अधिक स्पष्ट आणि निःसंदेह अशी– विसदृशता 'चारुदत्त' नाटकांतील षष्ठीला चंद्रोदयाचें वर्णन आणि अष्टमीला मध्यरात्रीं चंद्रास्ताचें वर्णन यांमध्यें आहे. येथें या कामीं भास कवीची किती नजरचूक झालेली आहे, हें आपल्या लक्षांत आल्यानंतर आतां आपण तुलनेसाठीं क्षणभर शूद्रकाच्या कृतीकडे वळूं. 'चारुदत्त नाटक' आणि 'मृच्छकटिक नाटक' यांची सूक्ष्म रीतीनें तुलना करून पहात असतां जागोजागीं असें आढळून येतें कीं, भासाच्या मूळच्या रचनेमध्यें शूद्रकानें पुष्कळच चांगल्या चांगल्या सुधारणा केल्या आहेत. जो पहिली रचना करतो, त्याचें काम कठिण असतें, ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. व त्याच्या मागून येणाराचें काम आयत्या पिठावर रेघा ओढणाराप्रमाणें काहींसें सोपें असतें, हेंही खरें आहे. तरी पण शूद्रकानें भासकवीच्या मूळ नाटकांत जे फेरफार केलेले आहेत, ते महत्त्वाचे आणि मार्मिकपणाचे आहेत, हें त्यांच्या तुलनेवरून तेव्हांच लक्षांत येतें. प्रथम वरील वेळेच्या संबंधाचेंच उदाहरण आपण घेऊं. वर जो शुक्ल-कृष्णपक्षासंबंधींचा काल-

विरोध दाखविण्यांत आलेला आहे, त्याच्याबद्दल शूद्रकाच्या मृच्छकटिक नाटकामध्यें काय स्थिति आहे, हें आपण पाहूं. मृच्छकटिकाच्या पहिल्या अंकांत 'उदयति हि शशांकः' हा श्लोक आहे, व तिसऱ्या अंकांत 'असौ हि दत्वा तिमिरावकाशम्' हा श्लोक आहे. तेव्हां भासाप्रमाणें शूद्रकामध्येंही हा विरोध आहेच, असें सकृद्दर्शनीं कोणालाही वाटल्यावांचून राहणार नाहीं. व हा विरोध असल्याचें कित्येक लेखकांनीं नमूदही केलेलें आहे! परंतु अशा वर वर पाहण्यानें या प्रश्नाचें समाधान होण्यासारखें नाहीं. जोंपर्यंत भास कवीचें 'चारुदत्त नाटक' उपलब्ध नव्हतें, तोंपर्यंत हें चंद्रोदयाचें आणि चंद्रास्ताचें वर्णन लागोपाठ देण्यांत शूद्रकाची चूक झालेली आहे, असें म्हणणें एक वेळ शक्य होतें. परंतु आतां तशी स्थिति नाहीं. ह्या वेळेसंबंधाचीं वर दिलेली बहुतेक सर्व भाषणें द्रशूकानें आपल्या नाटकामध्यें बदलून घेतलेलीं आहेत, असें तुळनेवरून आढळून येतें. शूद्रकानें हा फेरबदल कसा केला आहे, हें आपण पाहूं. भास कवीची अशी रचना आहे कीं, षष्ठीच्या दिवशीं वसंतसेनेनें आपले दागिने चारुदत्ताकडे ठेविले व ते षष्ठीसप्तमीच्या दिवशीं रदनिकेनें सांभाळून अष्टमीच्या अनध्यायाच्या दिवशीं विदूषकाच्या हवालीं केले. हे षष्ठी, सप्तमी आणि अष्टमी या तिथींचे उल्लेख जेथ जेथें आलेले होते, तेथून तेथून शूद्रकानें ते अजिबात काढून टाकलेले आहेत, आणि वसंतसेनेचे दागिने वर्धमानक चेटानें दिवसा आणि विदूषकानें रात्रीं संभाळावे, अशी योजना शूद्रकानें तिथींच्याऐवजीं उपयोगांत आणलेली आहे. याचा सविस्तर खुलासा येणेंप्रमाणें:—

(१) विदूषकः—'तत् षष्ठीकृतदेवकार्यस्य तत्रभवतश्चारुदत्तस्य कारणाद् गृहीतः।' इत्यादि भासाच्या वाक्यांतील 'षष्ठीकृतदेवकार्यस्य' या ठिकाणीं 'सिद्धीकृतदेवकार्यस्य' असा शूद्रकानें पाठ घातला आहे. (अंक १)

(२) विदूषकः—'रदनिके गृहाणैतं सुवर्णालंकारं त्वम्। षष्ठ्यां सप्तम्यां च धारय। अहमष्टम्यामनध्याये धारयिष्यामि।' हें जें भासाचें पहिल्या अंकांत वाक्य आहे, तें शूद्रकानें अजिबात काढून टाकलें आहे. व ते दागिने कोणत्या तिथीला कोणी संभाळावयाचे याच्याविषयींचा प्रश्न त्या वेळीं मुळींच उत्थापित न करतां शूद्रकाचा विदूषक आपल्याला इतके

दागिने मिळाल्याबद्दल आनंद मानतो, व ती वसंतसेनेची ठेव आहे असें चारुदत्तानें सांगितल्यावर 'ठेव असेल तर ती, चोर का घेऊन जाईना !' असें केवळ विनोदात्मक आणि सूचनात्मक भाषण मात्र विदूषक करतो.

(३) भासाच्या तिसऱ्या अंकांत 'अस्तं गतो ह्यष्टमपक्षचंद्रः' असें चारुदत्त चंद्रास्ताचें वर्णन करतो. परंतु शूद्रकाचा चारुदत्त त्याच्याऐवजीं अष्टमीचा उल्लेख गाळून 'अस्तं व्रजत्युन्नतकोटिरिंदुः' असें म्हणतो.

(४) भासाच्या तिसऱ्या अंकांत विदूषकाच्या निजावयाच्या वेळीं चेटी त्याच्याजवळ येऊन म्हणते कीं, 'इदं सुवर्णभाण्डं षष्ठयां सप्तम्यां (परिवह्नोमि), अष्टमी खल्वद्य।' परंतु कालासंबंधीं घोटाळा उत्पन्न करणारे आणि या तीन अंकांच्या कालाचा तीन दिवसांमध्यें संकोच करणारे हे तिथींचे उल्लेख शूद्रकाला नकोसे असल्याकारणानें तिसऱ्या अंकांत विदूषकाच्या निजावयाच्या वेळीं शूद्रकाचा वर्धमानक चेट विदूषकाला फक्त एवढेंच म्हणतो कीं, 'आर्य मैत्राया, हें तें सुवर्णभांड, दिवसा मी आणि रात्रीं तूं संभाळावयाचें; तर तूं आतां हें घे. (मम दिवा तव रात्रौ च).'

हीं जीं येथपर्यंत वर चार स्थळें दाखविण्यांत आलीं आहेत, त्या स्थळीं शूद्रकानें फेरफार केलेले आहेत. हे फेरफार उगीच कांहीं तरी केलेले नसून त्यांची सहेतुकता स्पष्ट दिसत आहे. या फेरफारांपासून काय अर्थनिष्पत्ति झाली, याचा आढावा आपण काढूं. षष्ठी, सप्तमी आणि अष्टमी या लागोपाठच्या तीन तिथींची सांखळी जोंपर्यंत भास कवीच्या तीन अंकांना एकत्र जखडून ठेवीत होती, तोंपर्यंत षष्ठीचा चंद्रोदय आणि अष्टमीचा चंद्रास्त हे विरोधात्मक होत होते. परंतु ही तिथींची सांखळी अजिबात तोडून काढून टाकल्यानंतर मग कल्पनेला जास्त मोकळीक सांपडते. दुसरा अंक पहिल्या अंकाच्या दुसऱ्या दिवशींच झालेला असावा, याला कांहीं गमकें आहेत. परंतु तिथींचा संबंध सुटल्यानंतर तिसरा अंक हा तिसऱ्या दिवशीच्याच रात्रीं झाला, असें म्हणण्याला काय नियमन आहे? तसें कांहीं नियमन नसल्यामुळें कदाचित् जास्त दिवसही मध्यंतरीं गेले असतील. कदाचित् एक पंधरवडाही गेला असेल. आणि असें असेल, तर चंद्रोदयाचें वर्णन वद्यपक्षांतील आणि चंद्रास्ताचें वर्णन त्याच्या पुढें येणाऱ्या शुक्लपक्षांतील असें असणेंही शक्य होईल. अशी कल्पनेला

मोकळीक मिळाल्यानें कालविरोध नाहींसा होऊन सर्व गोष्टी सुसंगत जमतात. दरिद्र चारुदत्ताचे घरीं तेलाचा अभाव असल्यामुळें मशाल पेटवितां येत नसल्याकारणानें वसंतसेनेला घरीं जाण्याचे वेळीं मार्ग दाखविण्याकरितां जो उजेड पाहिजे होता, त्याच्यासाठीं 'उदयति हि शशांकः' या गोड श्लोकांतील चंद्र एखाद्या कामुकाप्रमाणें बरोबर अगदीं वेळेवर हजर होतो. आणि 'घनतिमिरनिरुद्धसर्वभावा रजनिरियं जननीव संवृणोति' या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें चारुदत्ताच्या घरांत चोरी करण्याकरितां शिरणाऱ्या चोरावर मातृवात्सल्यानें रजनीला आपल्या काळोखाचें पांघरूण घालतां यावें म्हणून 'असौ हि दत्वा तिमिरावकाशम्' या श्लोकांतील चंद्र शुक्ल-कृष्णपक्षांच्या वगैरे कोणत्याही चुकीला पात्र न होतां अगदीं बरोबर वेळेवर अस्ताला जातो.

येणेंप्रमाणें विरोधपरिहारपूर्वक औचित्यसंपादनासाठीं शूद्रकानें आपल्या मृच्छकटिक नाटकामधून तिथींचे उल्लेख बुद्धिपुरःसर काढून टाकले असले पाहिजेत, हें उघड दिसतें. तरी पण शूद्रकाच्या कृतीमध्यें या तिथींचा एक उल्लेख शिल्लक राहिलेला आहे. मृच्छकटिकाच्या तिसऱ्या अंकांमध्यें चारुदत्ताची बायको धूता आपली रत्नमाला विदूषकाचे हवालीं करते वेळीं त्याचें निमित्त म्हणून असें म्हणते कीं, "मला रत्नषष्ठीचा उपवास होता; त्यासंबंधानें ब्राह्मणाला कांहीं दान द्यावयाचें होतें, तें दिलें नाहीं; म्हणून त्याच्याकरितां ही रत्नमाला मी देत आहें. ती तूं घे." भास कवीच्या तिसऱ्या अंकांत या ठिकाणीं 'ननु षष्ठीमुपवसामि' म्हणजे मला षष्ठीचा उपवास आहे, असा नुसत्या षष्ठीचा उल्लेख केलेला आहे. त्या नुसत्या षष्ठीला रत्नषष्ठी बनवून शूद्रकानें तिला आपल्या कृतीमध्यें कायम ठेविलें आहे. रत्नमाला द्यावयाची असल्याकारणानें साध्या षष्ठीला रत्नषष्ठी बनविण्यामध्यें शूद्रकानें सहज जातां जातां कसा काव्यचमत्कार साधला आहे, हेंही सहृदय वाचकांच्या लक्षांत आल्यावांचून राहणार नाहीं. रत्नमाला देण्याला कांहीं तरी सयुक्तिक निमित्त पाहिजे, तें भासकवीच्या मूळांतून जर आयतेंच मिळत आहे, तर त्याचा फायदा आपण कां घेऊं नये, अशा हिशेबानें शूद्रकानें हा षष्ठीचा उल्लेख कायम ठेविला असावा, हें तर उघडच आहे. परंतु याशिवाय त्यानें असेंही पाहिलें असावें कीं, तिथींचे बाकीच्या सर्व ठिकाणचे उल्लेख काढून टाकले गेल्यानंतर हा जो एक षष्ठीचा

उल्लेख आपण आपल्या प्रयोजनासाठीं शिल्लक ठेवणार आहों, तो उल्लेख इतःपर कांहीं उपद्रव देणारा होणार नाहीं; कां कीं, तिसऱ्या अंकाच्या दिवशीं षष्ठी, सप्तमी किंवा अष्टमी, कोणतीही तीथ असली, तरी पहिल्या किंवा दुसऱ्या अंकाच्या वेळीं अमुकच दिवस होता, असें त्यावरून ठरविण्याला कोणाला कांहीं साधन मिळत नाहीं व त्यामुळें पूर्वींच्याप्रमाणें कांहीं कालविरोधही उत्पन्न होत नाहीं. अशा कारणांमुळें या उपयोगी आणि अनुपद्रवी षष्ठीच्या उल्लेखाला अर्धचंद्र मिळाला नसावा, असें दिसतें.

## चवथ्या अंकाची वेळ

असो. येणेंप्रमाणें शूद्रकानें केलेल्या फेरफारांमुळें पहिल्या तीन अंकांच्या कालगणनेमध्यें कसा फेरफार सुचवितां येणें शक्य झालेलें आहे, हें येथपर्यंत दाखविण्यांत आलें. आतां आपण चवथ्या अंकाच्या वृत्तांताकडे वळूं. भास कवीच्या लिहिण्याप्रमाणें चारुदत्ताच्या घरीं अष्टमीच्या रात्रीं जर चोरी झाली असें धरलें, तर त्याच्या चवथ्या अंकांतील वृत्तांत नवमीच्या दिवशीं घडलेला असला पाहिजे, असें प्राप्त होतें. कारण, चारुदत्ताच्या घरीं चोरी करून बाहेर निघाल्यानंतर उजाडल्याबरोबर सज्जलक ( शर्विलक ) मदनिकेची प्राप्ति करून घेण्यासाठीं ते चोरीचे दागिने घेऊन तसाच वसंतसेनेच्या घरीं आल्याचें वर्णन आहे. आणि शूद्रकाच्या वर्णनाप्रमाणें मृच्छकटिकाचा चवथा अंकही त्याच दिवशीं झालेला असला पाहिजे. कारण, शूद्रकाला या अंकांच्या कालनिदर्शनांत कांहीं फेरफार करण्याचें कारणच नव्हतें, व त्याप्रमाणें त्यानें फेरफार केलाही नाहीं.

येथपर्यंत कथाभागाची मजल पोंचवून भासकवीचें चारुदत्त नामक नाटक येथें अवसित झालें आहे. त्यामुळें याच्यापुढील विवेचनाला अन्योन्य तुलनेचा फायदा मिळणें शक्य नाहीं. तरी पण आपण हा जो कालसंशोधनाचा प्रश्न हातीं घेतला आहे, तो चारुदत्त नाटकाबरोबर येथेंच न संपवितां पुढें एकट्या मृच्छकटिक नाटकाच्याच अनुषंगानें चालवून त्या बाबतींत आपल्याला काय निष्पन्न करून घेतां येतें, हें आपण पाहूं.

## मृच्छकटिकाचा पांचवा अंक

चवथा अंक नवमीच्या दिवशीं झालेला असेल, तर पांचवा अंकही

त्याच नवमीच्या दिवशीं संध्याकाळीं झालेला असला पाहिजे. कारण त्याच दिवशीं प्रदोषसमयीं दुर्दिन उत्पन्न झाले असतां, वसंतसेना अभिसारिकेच्या वेषानें चारुदत्ताकडे जाते व तेथें त्या दोघांचा एकत्र समागम होतो. येणें-प्रमाणें पांचव्या अंकाचा उलगडा होऊन आतां सहाव्या अंकाकडे वळावयाचें. परंतु नवमीच्या– म्हणजे चवथ्या– दिवसाच्या संबंधानें जरी नव्हे, तरी पण इतर कांहीं महत्त्वाच्या बाबतींसंबंधानें या पांचव्या अंकांतील कांहीं वाक्यें विचार करण्यासारखीं असल्याकारणानें त्यांच्या विचाराकडेच आधीं आपण क्षणभर वळूं.

तिसरा अंक जर अष्टमीला झाला, तर पांचवा अंक नवमीच्या दिवशीं संध्या-काळीं झाला असला पाहिजे, हें वर सांगितलेंच आहे. आणि तिसऱ्या अंकांतील अष्टमी ही शुक्लपक्षाचीच अष्टमी असली पाहिजे, असें वर सुचविण्यांत आलें आहे. आणि ती जर शुक्लाष्टमी आहे, तर तिच्या पुढील पांचव्या अंकांतील नवमीचें वर्णन शुक्लपक्षाच्या कल्पनेला विरोध आणणारें असतां कामा नये, हें अगदीं जरूर आहे. आणि या दृष्टीनें पांचव्या अंकाकडे पाहिलें असतां त्यांत शुक्ल नवमीच्या कल्पनेला अनुकूल असे उल्लेख बरेच आलेले आहेत. ते असेः— (१) संन्यासः कुलदूषणैरिव जनैर्मेघैर्वृतश्चंद्रमाः। (२) हरति करसमूहं खे शशांकस्य मेघः। (३) ज्योत्स्ना दुर्बलभर्तृकेव वनिता प्रोत्सार्य मेघै-र्हृता। (४) विदूषकः—अथ किंनिमित्तं पुनरीदृशे प्रणष्टचंद्रालोके दुर्दिनान्धकार आगता भवति। (५) पतति चंद्रव्यसनाद्विमुक्ता दिवोऽ-श्रुधारा इव वारिधाराः। यांत असकृत् आलेल्या चंद्राच्या उल्लेखांवरून ती शुक्ल नवमी मानण्याला पुष्कळ पुष्टि मिळते. ‘निष्पंदीकृतपद्मषंडनयनं नष्टक्षपावासरम्’ यांत ‘वासर’ हा शब्द जरी आलेला असला, तरी ‘त्या वेळीं दिवस होता’ असा अर्थ सुचविण्याला तो शब्द तेथें समर्थ नाहीं. ‘ही रात्र आहे किंवा दिवस आहे, हा भेद कांहींच समजत नाहीं,’ असा केवळ सामान्य अर्थ त्यापासून अभिप्रेत आहे. पण फिरून कोणी म्हणेल कीं, या वासर शब्दाची तुम्ही जी कशी तरी वाट लावतां, तें क्षणभर मान्य केलें, तरी “एतैरार्द्रतमालपत्रमलिनैरापीतसूर्यं नभः” या चरणांतील सूर्य मेघांनीं झांकून टाकल्याच्या वर्णनामुळें तुमची शुक्लपक्षाची कल्पना कशी सिद्ध होणार? असें जो कोणी विचारील, त्याला उलट असें विचारलें

पाहिजे कीं, शुक्लपक्षाची नाहीं, पण 'आपीतसूर्यं नभः' यावरून दुसरी वद्य पक्षाची तरी कल्पना कशी सिद्ध होणार? वस्तुतः पाहिलें असतां हें वर्णन या ठिकाणीं अगदीं अस्थानीं आलेलें आहे, आणि इतर अनेक रात्रिवर्णनाच्या वचनांनीं , नजरचुकीनें केलेल्या सूर्यवर्णनाचें एकटें वचन बाधित झालेलें आहे, असेंच समजलें पाहिजे. किंवा कदाचित् हा पाठच चुकलेला असेल. 'आपीतचंद्रं नभः' असा सहज सुचणारा पाठ असेल, तर सगळाच वाद मिटला!

असो, या नाटकांतील महिना कोणता असावा, याबद्दल पूर्वी थोडीशी चर्चा केलेली वाचकांच्या लक्षांत असेलच. त्या प्रश्नाचा आणखी कांहीं ऊहापोह यां पांचव्या अंकांतील कित्येक वर्णनांच्या अनुरोधानें येथें जास्त केल्यास तो अस्थानीं होणार नाहीं. म्हणून त्या बाबतींत येथें कांहीं अधिक माहिती मिळते कीं काय, हें आपण पाहूं. भासानें आपल्या नाटकाच्या चवथ्या अंकाच्या शेवटीं 'एतत् पुनरभिसारिकासहायभूतं दुर्दिनमुन्नमितम्' या वाक्यांत नुसतेंच दुर्दिन उत्पन्न झाल्याचा उल्लेख केला आहे. परंतु मृच्छकटिकांत सदर ठिकाणीं शूद्रकानें त्या दुर्दिनाला 'अकाल' असें एक जास्त विशेषण लाविलें आहे. तसेंच पांचव्या अंकाच्या प्रारंभींही शूद्रकानें 'उन्नमत्यकालदुर्दिनम्' 'आकालिकं सपदि दुर्दिनमन्तारिक्षम्' इत्यादि ठिकाणीं त्या दिवशींचा पाऊस हा वर्षाऋतूचा क्रमप्राप्त पाऊस नसून मध्येंच अकालीं वादळ होऊन आलेला असल्याचें व्यक्त केलें आहे. त्यामुळें हा पावसाळ्याचा एखादा महिना असेल असें म्हणतां येत नाहीं, हें पूर्वी सांगितलेंच आहे. परंतु या दुर्दिनाला शूद्रकानें जरी 'अकाल दुर्दिन' असें म्हटलें आहे, तरी त्या दुर्दिनाच्या परिणामासंबंधानें पांचव्या अंकामध्यें जीं वर्णनें आलेलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं अशीं आहेत कीं, तीं चार महिन्यांच्या पावसाळ्यालाच लागू पडत असून आदल्या दिवशीं चांदणें पडून त्याच्याच दुसऱ्या दिवशीं पडणाऱ्या एखाद्या वळवाच्या पावसाच्या सरीला योग्य रीतीनें लागू पडण्यासारखीं तीं नाहींत. मोर नाचूं लागले, हंस मानससरोवराकडे जाण्याला निघाले, कोकिला शब्द करीतनाशा झाल्या, आणि बक 'प्रावृट्, प्रावृट्' असें म्हणूं लागले, इत्यादि वर्णनें एक दिवसाच्या आकस्मिक पावसाच्या परिणामाला फारशीं साजण्यासारखीं नाहींत, हें

कोणाही मार्मिक वाचकाच्या लक्षांत येईल. पण भ्रांतिमान् अलंकाराच्या भूमिकेवरून कोणी या वर्णनांकडे पाहूं लागल्यास त्याला कदाचित् हीं वर्णनें क्षम्य वाटतील, असे जरी क्षणभर गृहीत धरलें, तरी 'नीप वृक्ष प्रफुल्लित झाले आणि पृथ्वी नवहरितशष्पांकुरवती झाली', हीं वर्णनें तरी निदान विसंगत अशींच मानलीं पाहिजेत. कारण, आलंकारिक जरी पक्ष्यादिकांच्या ठिकाणीं भ्रांतिमान् अलंकाराचा संभव मानीत असले, तरी वृक्ष, पृथ्वी इत्यादि अचेतन वस्तूंच्या ठिकाणीं भ्रांतिमत्ता कोणाच्याही मतें सर्वथैव अनुपपन्नच आहे. म्हणून हें अकाल दुर्दिन आहे किंवा कालप्राप्त दुर्दिन आहे, याविषयीं दृढ संशय उत्पन्न होतो. परंतु ज्या अर्थी शूद्रकानें मुद्दाम अकाल दुर्दिन असा निर्देश केलेला आहे, त्या अर्थी दुर्दिनाचें अकालिकत्वच त्याला अभिप्रेत असलें पाहिजे, व उपरिनिर्दिष्ट विरोधात्मक वर्णनें हीं केवळ सामान्य पावसाळयाच्या वर्णनसादृश्याच्या अनुषंगानें आलेलीं असलीं पाहिजेत, असें मानणें हेंच जास्त सयुक्तिक होणार आहे. आणि म्हणून तो महिना पावसाळयाचा होता असें ठरविणें शक्य होणार नाहीं.

## अंक ६ ते १०

येणेंप्रमाणें पांचव्या अंकांतील प्रश्नांचा विचार केल्यानंतर आतां आपण सहाव्या अंकापासून तों दहाव्या अंकांतील नाटकसमाप्तीपर्यंतच्या कालासंबंधानें विवेचन करूं. भासाची तिथींची भाषा समजण्याला स्पष्ट आणि सोईची असल्याकारणानें तिचाच आपण पुढेंही तात्पुरता अवलंब करूं. षष्ठीच्या पहिल्या दिवशीं पहिला अंक, सप्तमीच्या दुसऱ्या दिवशीं दुसरा अंक, अष्टमीच्या तिसऱ्या दिवशीं तिसरा अंक, आणि नवमीच्या चवथ्या दिवशीं चवथा आणि पांचवा अंक, याप्रमाणें क्रम चालून दशमीच्या—म्हणजे पांचव्या—दिवशीं आपण सहाव्या अंकाच्या प्रारंभाला येऊन पोंचतों. अमेरिकन लेखक रायडरसाहेब यांनीं सहा ते दहा या अंकांतील वेळ अशी ठरविली आहे कीं, सहा, सात व आठ, या तीन अंकांतील वसंतसेनेच्या वधापर्यंतची गोष्ट ज्या दिवशीं झाली, त्याच्या दुसऱ्या दिवशीं शकारानें न्यायाधिकरणापुढें फिर्याद मांडली व चारुदत्ताची चौकशी झाली; आणि त्या चौकशीनंतरच्या दुसऱ्या दिवशीं चारुदत्ताला वधस्तंभाकडे

नेण्याचीं वगैरे कृत्यें घडून आलीं. सारांश, रायडरसाहेबांच्या म्हणण्या-प्रमाणें सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतच्या गोष्टी घडून येण्याला तीन दिवस लागले असावेत. दुसरे कोणी सहा, सात व आठ या अंकांना एक दिवस आणि नऊ व दहा या अंकांना दुसरा दिवस, असे दोन दिवस देतात. परंतु हीं दोन्ही मतें बरोबर नसून सहा ते दहा या पांचही अंकांची गोष्ट एकाच दिवसांत म्हणजे आपल्या पूर्वींच्या परिभाषेप्रमाणें दशमी-च्या म्हणजे पांचव्या दिवशींच– झालेली असली पाहिजे, असें अंतःपरीक्षे-वरून प्राप्त होतें.

सहाव्या अंकांतील प्रवहणविपर्यय, सातव्या अंकांतील चारुदत्त आणि आर्यक यांची भेट, आणि आठव्या अंकांतील वसंतसेनेचा वध, इतक्या गोष्टी या दशमीच्या– म्हणजे पांचव्या दिवशींच्या– दोन प्रहरपर्यंत झाल्या, याच्याबद्दल सर्वांची एकवाक्यता आहे. म्हणून त्याबद्दल वाटाघाट कर-ण्याचें कांहीं कारण नाहीं. मतभेद काय तो नवव्या आणि दहाव्या अंकां-तील गोष्टी कोणत्या दिवशीं घडल्या, याबद्दल आहे. परंतु सूक्ष्मदृष्ट्या पाहिलें असतां या बाबतींतही मतभेद न होतां एकवाक्यताच होण्यासारखी आहे. शकारानें वसंतसेनेला 'पुष्पकरंडकजीर्णोद्यानामध्यें पांचव्या दिवशीं दुपारच्या सुमारास मारल्यानंतर 'स्नातोऽहं सलिलजलैः' इ. श्लोकामध्यें वर्णन केल्याप्रमाणें घरीं जाऊन स्नान वगैरे आटपून लगेच शकार न्याया-धिशाच्या कचेरीमध्यें आला असला पाहिजे, व त्याच दिवशीं संध्याकाळीं चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेण्यांत आलें असलें पाहिजे. शकार दुसऱ्या दिवशीं सकाळीं आपली फिर्याद दाखल करण्याकरितां न्यायाच्या कचेरी-मध्यें गेला; व त्या दिवशीं अगर त्याच्या दुसऱ्या दिवशीं चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेण्यांत आलें, असें मानिलें असतां इतर पुष्कळ गोष्टी जमेनाशा होऊं लागतात.

( १ ) पांचव्या दिवशीं सकाळीं वसंतसेना उठली म्हणजे तिला आपल्या प्रवहणामधून पुष्पकरंडकजीर्णोद्यानामध्यें घेऊन येण्याविषयीं आपल्या वर्धमानक चेटाला सांगून चारुदत्त विदूषकासह पुढें गेलेला होता. तेथें त्याच्या गाडींतून वसंतसेना न येतां गाडीच्या अदलाबदलीमुळें तुरुंगां-तून पळालेला आर्यक तेथें येतो; व त्याची .आणि चारुदत्ताची तेथें गांठ

पडल्यानंतर चारुदत्त त्याची नीट व्यवस्था लावून उदार मनानें रवानगी करून देतो. परंतु हा सर्व वेळपर्यंत चारुदत्ताचें मन फार चिंताग्रस्त झालेलें असतें. सांगितल्याप्रमाणें वसंतसेना कां आली नाहीं, याबद्दल त्याला फार काळजी वाटूं लागते. त्याचा डावा डोळा स्फुरण पावूं लागतो, व पुढें श्रमणकदर्शनानें दुसराही एक अपशकुन त्याला होतो. त्यामुळें वसंतसेनेची स्थिति काय झाली आहे कोण जाणे, अशा साशंक चित्तवृत्तीनें तो आपल्या घरीं जातो. परंतु तेथें चारुदत्ताच्या घरींही वसंतसेना अर्थातच नव्हती. तेव्हां वसंतसेना कोठें असावी, याच्याबद्दल त्याच्या मनाचा स्वाभाविकपणें काय ग्रह झाला असावा? गाडींत बसून ती येथून गेली एवढी बातमी चारुदत्ताच्या चेटीनें त्याला अर्थात् सांगितलेलीच असली पाहिजे. तेव्हां जर ती गाडींत बसून निघाली, पण पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत आली नाहीं, तर मग ती कोठें गेली असेल, या शंकेच्या उत्तरादाखल 'ती बहुधा आपल्या स्वतःच्या घरींच गेली असावी' असें अनुमान काढून चारुदत्त किंचित् स्थिर झाला असावा. परंतु एवढ्या अनुमानानें चारुदत्ताची शांति कशी होणार? नवव्या अंकांतील चारुदत्ताच्या आणि विदूषकाच्या भाषणावरून असें दिसतें कीं, असल्या संदिग्ध अनुमानावर अवलंबून स्वस्थ न बसतां चारुदत्तानें वसंतसेनेचा शोध करण्याकरितां विदूषकाला तिच्या घरीं पाठविलें. विदूषकाला पाठवून अगदीं थोडा वेळ झाला असेल नसेल, तोंच चारुदत्ताला अधिकरणिकाकडून बोलावणें जातें, आणि तो त्याप्रमाणें न्यायाच्या कचेरींत येतो. वसंतसेनेनें चारुदत्ताचा मुलगा रोहसेन याला सोन्याची गाडी करण्याकरितां आपल्या अंगावरील दागिने काढून दिले होते, तेही वसंतसेनेचे वसंतसेनेला परत नेऊन द्यावे, आणि तिचा शोधही घ्यावा, या दोन कामांसाठीं चारुदत्तानें वसंतसेनेकडे पाठविलेला विदूषक तिच्याकडे जात असतां वाटेंत रेभिलाची आणि त्याची गांठ पडून, आर्य चारुदत्ताला अधिकरणमंडपामधून बोलावणें आल्यावरून तो तिकडे गेला आहे, ही बातमी रेभिलानें विदूषकाला सांगितली. तेव्हां वसंतसेनेकडे न जातां विदूषक तसाच दागिन्यांसह चारुदत्तावर काय प्रसंग आला आहे, हें जाणण्याकरितां अधिकरणमंडपामध्यें आलेला आहे. ही सगळी हकीकत लक्षांत घेतली, म्हणजे कोणाचाही काय ग्रह होईल? दशमीच्या–

म्हणजे पांचव्या-दिवशीं दुपारपर्यंत वसंतसेना पुष्पकरंडकजीर्णोद्यानांत आली नाहीं, तर तिच्या शोधाकरितां चारुदत्त कधीं बरें मनुष्य पाठवील? तावड-तोब त्याच दिवशीं घरीं आल्याबरोबर पाठवील, किंवा घरीं येऊन स्वस्थ एक दिवस झोंप घेऊन दुसऱ्या दिवशीं पाठवील? प्रेमपाशनिबद्ध मनुष्य आपल्या प्रियकरणीच्या कुशल प्रवृत्तीसाठीं किती तरी आतुर झालेला असला पाहिजे! त्यांतून चारुदत्तासारखा मनुष्य वसंतसेनेबद्दल त्याला सातव्या अंकाच्या शेवटीं वर्णिलेलीं अपायसूचक दुश्चिन्हें होत असतांही गांवांतल्या गांवांत तिचा शोध घेतल्यावांचून एक दिवसपर्यंत स्वस्थ बसेल, हें बिलकूल संभवत नाहीं. म्हणून दशमीच्या-म्हणजे पांचव्या-दिवशीं दुपारीं पुष्पकरंडकजीर्णोद्यानांतून घरीं आल्यानंतर त्याच दिवशीं वसंतसेनेच्या शोधाला चारुदत्तानें विदूषकाला तिच्या घराकडे पाठविलें असावें, व त्याच दिवशीं विदूषक तिकडे गेल्या नंतर अधिकरणिकाकडून चारुदत्ताला बोलावणें आलेलें असावें, हें अगदीं उघड आहे. म्हणजे ह्या सर्व गोष्टी वसंतसेनेच्या वधानंतरच्या दुसऱ्या दिवशीं झालेल्या नसून त्या त्याच दिवशीं तिसरे प्रहरच्या सुमारास घडून येत असल्या पाहिजेत, असें प्राप्त होतें.

(२) नवव्या अंकांतील चारुदत्ताच्या चौकशीचें काम दशमीच्या-पांचव्या दिवशींच्या- तिसऱ्या प्रहरीं चाललेलें असावें, इतकेंच नव्हे, तर चौकशीच्या नंतर चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेण्याचें कृत्यही त्याच दिवशीं संध्याकाळीं घडून आलेलें असलें पाहिजे, आणि तें (कित्येकांच्या म्हणण्या-प्रमाणें) आणखी एक दिवस लांबणीवर पडलेलें नसलें पाहिजे, असें मान-ण्याला आणखी एक अंतर्गत प्रमाण पुढें आणतां येण्यासारखें आहे. तें असें:—आठव्या अंकाच्या अखेरीस वसंतसेनेला मारून, शकार निघून गेल्यानंतर बौद्धाभिक्षु झालेला संवाहक तेथें येतो. आणि वाळलेल्या पानांच्या राशीवर आपली छाटी वाळत घालीत असतां त्याला वसंतसेनेचा हात बाहेर आलेला दिसतो. तो वसंतसेनेला ओळखतो. वसंतसेना शुद्धीवर येते. आणि तिला हुशारी वाटल्यानंतर तो तिला तिच्या घराकडे पोंचविण्याकरितां जात असतां वाटेमध्यें लोकांची गर्दी पाहून हें काय आहे, याची चौकशी करीत असतां आर्य चारुदत्त वसंतसेनेच्या वधानिमित्त वधस्तंभाकडे नेला जात आहे, असें त्याला कळतें. या बौद्धभिक्षूच्या हकीकतीच्या क्रमावरूनही

वसंतसेनेचा आठव्या अंकांतील वध आणि चारुदत्ताचें शूलारोपण यांच्यामध्यें एक किंवा दोन दिवसांचा अवधि लोटला असेल, हें शक्य दिसत नाहीं. आठव्या अंकाच्या अखेरीसच–म्हणजे दशमीच्या–म्हणजे पांचव्या दिवशीं-च्या–दुपारींच जी वसंतसेना शुद्धीवर आली, ती तेव्हांपासून ( कित्येकांच्या म्हणण्याप्रमाणें ) एक किंवा दोन दिवसांनीं चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेण्याची वेळ येईपर्यंत मध्यंतरीं होती कोठें, व करीत होती काय ? " ह्या जवळच्या विहारामध्यें माझी एक धर्मभगिनी आहे, त्या ठिकाणीं जाऊन तुझ्या मनाला स्वस्थता वाटली म्हणजे, हे उपासिके वसंतसेने, तुला आपल्या घरीं जातां येईल," असें त्या बौद्धभिक्षूनें आठव्या अंकाच्या शेवटीं वसंतसेनेला म्हटलेलें आहे, हें खरें आहे. परंतु त्यावरून ती एक किंवा दोन दिवस त्या भिक्षूच्या मठामध्येंच राहिली होती, असें कोणाला म्हणतां यावयाचें नाहीं. आणि इतके दिवस तेथें राहण्याचें तिला कारणही नाहीं. मनाला स्वस्थता वाटल्याबरोबर तिला तेथून निघण्याला काय हरकत होती ? आणि जी मूर्च्छेतून उठल्याबरोबर आपल्या पायांवर उभी राहण्याइतकी हुषार झाली, ( कारण, त्या बौद्धभिक्षूनें तिला हस्तावलंब देणें हें त्याच्या संप्रदाया-विरुद्ध होतें; आणि म्हणूनच जवळच्या एका वेलीला धरून उठण्याविषयीं त्यानें तिला सांगितलें आहे; ) ती आपला वाडा उज्जयिनीतल्या उज्जयिनीमध्यें असतां त्या भिक्षूच्या मठामध्यें उगीच एक दोन दिवस बसून काढील, हें संभ-वत नाहीं. बरें, यदाकदाचित् ती एक दोन दिवस त्या मठामध्यें राहिली, अशीही क्षणभर कल्पना केली, तरी अशा अशा कारणामुळें ती अमुक अमुक ठिकाणीं राहिलेली आहे, असा एखादा निरोप ती आपल्या आईला किंवा आपल्या प्रिय चारुदत्ताला इतक्या अवधींत पाठविल्याशिवाय स्वस्थ राहील, हें तरी कधीं संभवतें काय? तेव्हां या सर्व असंभाव्य गोष्टी टाळण्याकरतां त्या भिक्षूच्या मठामध्यें फार वेळ न थांबतां ताबडतोब त्याच दिवशीं संध्याकाळच्या सुमाराला त्या भिक्षूला बरोबर घेऊन वसंतसेना चारुदत्ताच्या घराकडे येण्याकरितां निघालेली असली पाहिजे, अशी कल्पना करण्याशिवाय दुसरें गत्यंतरच नाहीं.

( ३ ) वरील गोष्टीच्या दृढीकरणासाठीं आणखी एक प्रत्यंतर असें आहे कीं, शकाराचा स्थावरक चेट हा आठव्या अंकांतील वसंतसेनेच्या वधाची हकीकत जाणत होता. व तो कदाचित् आपल्या विरुद्ध साक्ष देईल या

भीतीनें शकारानें त्याला आपल्या वाड्याच्या बालाग्रप्रतोलिकेमध्यें कोंडून ठेविलें होतें. पुढें चारुदत्ताला शिक्षा होऊन वधस्तंभाकडे नेत असतां रस्त्यावरील चांडालांनीं पिटलेल्या दवंडीचा गलबला ऐकून निरपराधी चारुदत्ताला सोडविण्याच्या हेतूनें माडीवरून उडी टाकून रस्त्यावर आलेला चेट खरी हकीकत त्या चांडालांना सांगते वेळीं असें म्हणतो कीं:—" अस्तीदानीं मया पापेन प्रवहणपरिवर्तेन पुष्पकरंडकजीर्णोद्यानं वसंतसेना नीता।" इत्यादि या वाक्यांतील " इदानीम् " हा शब्द फार महत्त्वाचा आहे. त्याच्या म्हणण्याचा रोख असा दिसतो कीं, "' आतां इतक्यांत मी वसंतसेनेला गाडीच्या अदलाबदलीमुळें पुष्पकरंडकजीर्णोद्यानांन नेलें." आठव्या अंकांत वसंतसेनेला मारल्यानंतर एक किंवा दोन दिवसांनीं चारुदत्ताला वधस्तंभाकडे नेणाऱ्या चांडालांना हकीकत सांगतांना स्थावरक चेटानें " इदानीम् " (आतां) हा शब्द कधींही वापरला नसता. पण तो ज्या अर्थी " इदानीम् " हा शब्द वापरीत आहे, त्या अर्थी आठवा, नववा, दहावा हे सगळे अंक एकाच दिवशीं घडून येत असले पाहिजेत, याच्याबद्दल बिलकूलच शंका उरत नाहीं.

नववा आणि दहावा अंक यांच्या दरम्यान एक दिवस गेला असल्याची कल्पना रायडरसाहेबांनीं केलेली असल्याचें पूर्वी सांगितलेंच आहे. पण या कल्पनेला बाध आणणारीं अशींही कांहीं प्रमाणें नवव्या आणि दहाव्या अंकांत सांपडतात. तीं अशीं:—नवव्या अंकाच्या शेवटीं चारुदत्ताला वधाची शिक्षा सांगण्यांत आल्यानंतर चारुदत्त विदूषकापाशीं अशी प्रार्थना करतो कीं, माझा मुलगा रोहसेन याला पहाण्याची मला इच्छा झाली आहे, तेव्हां त्याला आणून तूं मला भेटव. असें चारुदत्तानें विदूषकाला सांगितल्यानंतर ते चांडाळ येऊन चारुदत्ताला वधस्तंभाकडे दहाव्या अंकांत नेत आहेत, व ते त्याला रस्त्यांतून नेत असतांना मध्येंच विदूषक रोहसेनाला आणून चारुदत्ताशीं भेटवीत आहे, अशी ही एकंदर गोष्ट आहे. आतां आपल्या पुत्राची आणि आपली एकदां भेट करून देण्याविषयीं चारुदत्तानें ज्या आपल्या प्रिय मित्राला एवढ्या कळकळीनें आणि तांतडीनें सांगितलें, तो विदूषक मध्यंतरीं एक दिवस स्वस्थ बसून मग दुसऱ्या दिवशीं सावकाशपणानें रोहसेनाला घेऊन चारुदत्ताकडे येईल, हें संभवत नाहीं. तो ताबडतोब त्याच वेळीं रोहसेनाला घेऊन परत आला असला पाहिजे, हें

उघड आहे. तसेंच नवव्या अंकाच्या शेवटीं चारुदत्त आपल्या बायकोच्या आणि मुलाच्या संबंधानें विदूषकाजवळ सर्व निरवानिरव करीत आहे. त्यावरून सुद्धां वरील अनुमानालाच बळकटी येते. शिवाय, "विषसलिलतुलाग्निप्रार्थिते मे विचारे क्रकचमिह शरीरे वीक्ष्य दातव्यमद्य" या चारुदत्ताच्या श्लोकांतील 'अद्य' हें पदही तोच अर्थ द्योतित करतें. आणखी असेंही एक पाहिलें पाहिजे कीं, चारुदत्ताला चांडाळांच्या हवालीं करण्याविषयीं जर नवव्या अंकाच्या शेवटीं हुकूम झालेला आहे, तर दुसऱ्या दिवशीं त्याला वधस्तंभाकडे न्यावें अशा प्रकारच्या एखाद्या स्पष्टोच्चारित आज्ञेच्या अभावीं ते त्याला त्याच दिवशीं वधस्थानाकडे नेणार, हेंही अगदीं उघड आहे. त्यांनीं मध्यंतरी एक दिवस थांबावें काय म्हणून?

## आर्यक आणि शर्विलक

या वर दिलेल्या आनुमानिक प्रमाणांवरून सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतची सर्व गोष्ट दशमी म्हणजे पांचवा दिवस या एकाच दिवसांत घडून आलेली असली पाहिजे, असें दिसतें. व ह्या म्हणण्याला दुसऱ्याही कोणत्या गोष्टीचा कालदृष्ट्या विरोध येऊं शकत नाहीं. गोपालपुत्र आर्यक ह्याला पालक राजानें कारागृहांत टाकल्याची बातमी नवमीच्या म्हणजे चवथ्या दिवशीं सकाळीं शर्विलकाला मदनिकेची प्राप्ति झाल्यानंतर लगेच कळते, आणि त्याच वेळीं मदनिकेला रेभिलाच्या घरीं पोंहोचती करण्याची व्यवस्था करून आर्यकाची सुटका करण्याच्या उद्योगाला शर्विलक जातो. पुढें त्याच चवथ्या दिवशीं रात्रीं मेघगर्जना, विजा, पाऊस, अंधकार, यांतून अभिसारिकेच्या वेषानें आलेल्या वसंतसेनेपाशीं एकीकडे चारुदत्ताचे प्रेमविलास चाललेले असतां त्याच वेळीं दुसरीकडे त्याच दुर्दिनाचा फायदा घेऊन बहुतकरून शर्विलक मेघांच्या गर्जनांमध्यें तुरुंगाचे दरवाजे फोडून पावसाच्या निबिड अंधकारांमधून आर्यकाला मुक्त करण्याच्या कामांत गुंतलेला असावा! परंतु आर्यकाला नुसता बंधमुक्त करून शर्विलकाचें काम संपलें नव्हतें. त्याला पालक राजाचा वधही करावयाचा होता. आणि बहुतकरून दशमीच्या पांचव्या दिवशीं सकाळीं पुष्पकरंडक-जीर्णोद्यानांत चारुदत्त आणि आर्यक यांची सातव्या अंकांतील भाषणें

चालली असतां तेव्हांपासून संध्याकाळीं यज्ञवाटस्थानामध्यें पालक राजाचा वध होईपर्यंत शर्विलक याच राज्यक्रांतीच्या उद्योगामध्यें गुंतलेला असला पाहिजे. आणि गोपालदारकाला तुरुंगांतून सोडवून पालक राजाचें असें अपथ्य केल्यानंतर मध्यंतरीं फार दिवस जाऊं न देतां शक्य तितक्या लवकर पालक राजाचा खून करून इष्ट ती राज्यक्रांति घडवून आणणेंच शर्विलकाला अवश्य होतें. आणि या दृष्टीनेंही दशमीच्या, म्हणजे पांचव्या दिवशींच संध्याकाळीं पालकाचा वध झालेला असला पाहिजे, असें दिसतें. सारांश, आर्यक आणि शर्विलक यांच्या या गोष्टींतील कालक्रमही चारुदत्त आणि वसंतसेना यांच्या गोष्टींतील पांचव्या दिवसाच्या कल्पनेला विरोधी नसून उलट अनुकूलच आहे.

## वीरकाची उलट साक्ष

सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतची गोष्ट याप्रमाणें दशमीच्या म्हणजे पांचव्याच दिवशीं घडून आली असली पाहिजे, हें वर दिलेल्या एकंदर प्रमाणांवरून इतक्या निःसंशय रीतीनें सिद्ध होत आहे कीं, प्रत्यक्ष शकार जरी असें म्हणेल कीं, मीं आपली फिर्याद अधिकरणिकाकडे सहाव्या दिवशीं दिली होती, आणि प्रत्यक्ष चारुदत्त जरी असें म्हणेल कीं, मला सहाव्या किंवा सातव्या दिवशींच वधस्तंभाकडे नेत होते, तरी त्यांच्यावर देखील कोणी विश्वास ठेवणार नाहीं. कारण, अंतर्गत पुराव्याविरुद्ध कोणीही कांहीं बोलूं लागला, तरी त्याच्यावर कोण विश्वास ठेवणार? मग एखादा वीरकासारखा तामसी शिपाई पुढें येऊन—

पादप्रहारपरिभवविमाननाबद्धगुरुकवैरस्य ।
अनुशोचत इयं कथमपि रात्रिः प्रभाता मे ॥

या आर्येतल्याप्रमाणें भलतेंच बोलूं लागला, तर त्याच्या असंबद्ध भाषणावर कोणाचीच श्रद्धा बसणार नाहीं, हें तर सुतराम्‌च सिद्ध आहे. सहाव्या अंकांत, म्हणजे दशमीच्या—अगर पांचव्या दिवसाच्या—सकाळीं, ज्या चारुदत्ताच्या गाडींत आर्यक बसून आला होता, ती गाडी चंदनकानें तपासून जाऊं देण्याविषयीं हुकूम केला असतांही फिरून ती गाडी स्वतः तपा-

सण्याविषयीं जेव्हां वीरक आग्रह धरूं लागला, तेव्हां त्याच्याशीं भांडण करून त्याला लाथ मारून चंदनकानें ज्या वीरकाला घालवून लाविलें, तो वीरक नवव्या अंकामध्यें व्यवहारमंडपांत चारुदत्ताची चौकशी चालली असतां तेथें येऊन म्हणतो कीं, "काल चंदनकानें मला लाथ मारली, तो अपमान मला सहन होत नसल्याकारणानें ही गेली रात्र मीं कशी तरी मोठ्या कष्टानें काढली व आतां प्रभात झाल्याबरोबर मी ही आपली फिर्याद मांडण्याकरितां व्यवहारमंडपामध्यें आलों आहें." या वीरकाच्या वाक्यावरून आठवा आणि नववा अंक यांच्या दरम्यान एक रात्र गेली असावी, अशी चुकीची कल्पना करण्याकडे आतांपर्यंतच्या बहुतेक टीकाकारांची प्रवृत्ति झाली आहे; परंतु ही मोठी दुःखाची गोष्ट आहे कीं, हा वीरक स्वतः चुकला आहे, आणि त्यानें आपल्याबरोबर दुसऱ्याही बिचाऱ्यांना चुकविलें आहे! वीरकाचें हें वरील बोलणें अगदींच विसंगत आहे. मृच्छकटिकांतील सर्व पात्रें सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतची सगळी गोष्ट एकाच पांचव्या दिवशीं झाली, असें म्हणत असतां हाच एकटा जर मध्यें एक दिवस जास्त मागूं लागला, तर तो याला कोण देणार? आणि याला मध्यें हा एक दिवस अथवा एक रात्र तरी कशाला पाहिजे होती? "अरे अहं त्वया विश्वस्तो राजाज्ञप्तिं कुर्वन्सहसा केशेषु गृहीत्वा पादेन ताडितः। तच्छृणु रे। अधिकरणमध्ये यदि ते चतुरंगं न कल्पयामि तदा न भवामि वीरकः।" असे गर्वोक्तीचे शब्द सहाव्या अंकांत—म्हणजे पांचव्या दिवशीं सकाळीं बोलून आणि अधिकरणांत फिर्याद करण्याची धमकी देऊन जो वीरक निघाला, तो त्याच दिवशीं आणि त्याच आवेशात अधिकरणिकाकडे दुपारच्या वेळीं कसा गेला नाहीं? आणि जो आपल्या शत्रूवर इतका रागावून गरम झाला होता, तो आपल्या घरीं जाऊन एक रात्रभर थंड होत स्वस्थ कसा बसला? वस्तुतः असें कांहीं नसून तो पांचव्या दिवशीं दुपारींच न्यायमंडपामध्यें गेलेला असला पाहिजे. कारण पांचव्या दिवशीं चारुदत्ताची चौकशी झाली हें जर निर्विवाद आहे, तर हा साक्षीदार सहाव्या दिवशीं म्हणजे एक दिवस पाठीमागून कचेरींत जाऊन उपयोग काय? तेव्हां वीरकाच्या या भाषणामध्यें कांहीं तरी दोष असला पाहिजे, किंवा हल्लीं उपलब्ध असलेला पाठ अशुद्ध असला पाहिजे, किंवा कदाचित् ग्रंथकाराचें या मुद्द्याकडे विशेष

लक्ष पोंचलेलें नसेल. परंतु जेथें अनेक प्रमाणें एका बाजूला असतात आणि एखादेंच प्रमाण त्यांच्या विरुद्ध असतें, तेथें त्यांच्या बलाबलाचा विचार करून जें एकटें प्रमाण असेल तें दूषित झालेलें आहे असें समजावें, असा मीमांसेचा जो सामान्य नियम आहे, त्याला अनुसरूनच या ठिकाणीं ही व्यवस्था लाविली पाहिजे.

## 'पुरा' या शब्दाचा प्रयोग

सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतची सर्व गोष्ट एकाच पांचव्या दिवसामध्यें घडून आलेली असली पाहिजे, या कल्पनेला प्रतिरोध करणारें असें आणखीही एक वचन उपलब्ध होतें. त्याचा आपण थोडा विचार करूं. आर्यकानें पालक राजाचा विध्वंस केल्याची बातमी दहाव्या अंकाच्या शेवटीं शर्विलक येऊन चारुदत्ताला सांगतांना असें म्हणतो कीं:—

त्वद्यानं यः समारुह्य गतस्त्वां शरणं पुरा ।
पशुवद्वितते यज्ञे हतस्तेनाद्य पालकः ॥

या श्लोकांत 'पुरा' हा शब्द फार वाईट पडलेला आहे. कारण हा पांचव्या किंवा सहाव्या कोणत्याच दिवसाच्या कल्पनेला अनुकूल नाहीं. दहावा अंक ( कित्येकांच्या म्हणण्याप्रमाणें ) सहाव्या दिवशीं घडून येत आहे असें जरी क्षणभर मानलें, तरी आदल्याच दिवशीं जो आर्यक चारुदत्ताच्या गाडींत बसून त्याच्याकडे आला, तो 'पुरा' म्हणजे कित्येक पुष्कळ दिवसांपूर्वी केव्हां तरी एकदां त्याच्याकडे आला होता, असें म्हणणें हे अगदींच अयोग्य आहे. परंतु वास्तविक पाहतां चारुदत्त आणि आर्यक यांची भेट आदल्या दिवशींही झालेली नसून त्याच दिवशीं सकाळीं झालेली होती, आणि या दृष्टीनें तर 'पुरा' हा शब्द सुतराम्‌च अयोग्य आहे. तेव्हां येथेंही कांहीं तरी अपपाठ प्रचारांत आलेला असावा. किंवा दुसराही एक मार्ग आहे. क्रियेचें निकटागामित्व दाखविण्याकरितां 'पुरा' या शब्दाचा एक प्रयोग होत असतो. त्यापैकीं आगामित्वाचा अंश सोडून देऊन लक्षणेनें निकटत्व मात्र दाखविण्याकरितां हा 'पुरा' शब्दाचा प्रयोग केलेला आहे असें मानणें शक्य असेल, तर वरील सर्व अडचणी दूर होतात. कारण, मग 'पुरा' म्हणजे नुकताच जो तुझ्या गाडींत बसून तुझ्याकडे

आला होता, त्या आर्यकानें पालकाला मारिलें आहे, असा अर्थ होतो. आणि हा अर्थ सर्वथैव अदोष आणि अनुकूल असाच होतो.

याप्रमाणें या सर्व साधकबाधक प्रमाणांचा विचार करून पाहिलें असतां असेंच निष्पन्न होतें कीं, सहाव्या अंकापासून दहाव्या अंकापर्यंतची गोष्ट एकाच—म्हणजे—पांचव्या दिवसांतच झालेली असली पाहिजे, आणि सगळ्या नाटकांतील गोष्ट चार किंवा सहा दिवसांत झालेली नसून पांच दिवसांतच आटपलेली असली पाहिजे. परंतु पहिल्या आणि तिसऱ्या अंकांतील चंद्रवर्णनाचा विरोध एखाद्या चांगल्या पाठांतरानें दूर झाला नाहीं, किंवा तो कविबहुमानमूलक दृष्टीनें सहृदयतेला तसाच सह्य झाला नाहीं, तर पहिला आणि तिसरा या अंकांच्या दरम्यान एका पंधरवड्याची जास्त अवधि कल्पिली पाहिजे, याचें दिग्दर्शन वर केलेलेंच आहे.

## अवांतर तुलना

भासकवीच्या चारुदत्त नाटकावरून आपलें मृच्छकटिक नाटक बनवितांना शूद्रकानें जे फेरफार केले आहेत, त्यांची मूळ रचनेशीं तुलना करून पहातां त्यापासून काय निष्पन्न होतें, याच्याविषयीं विचार करीत असतां पहिल्या प्रथम तिथींची कल्पना जी ठळक रीतीनें पुढें येते, तिच्यासंबंधानें व तिजवरून सुचलेल्या सबंध मृच्छकटिक नाटकांतील कालावधीसंबंधानें येथपर्यंत विवेचन झालें. आतां दुसऱ्या कांहीं किरकोळ बाबतींमध्यें या दोन कवींची आपण तुलना करून पाहूं.

---

### अंक १

| भास | शूद्रक |
| --- | --- |
| सूत्र०:—किंनामधेय आर्याया उपवासः । | सूत्र०:—किंनामधेयोऽयमुपवासः । |
| नटीः—अभिरूपपतिर्नाम । | नटीः—अभिरूपपतिर्नाम । |
| सूत्र०:—किमन्यजात्याम् । | सूत्र०:—आर्ये ऐहलौकिकोऽथवा पारलौकिकः । |
| नटीः—आम । | नटीः—आर्य पारलौकिकः । |

सूत्र०:—सर्वे तावत् तिष्ठतु । को न्विदानीमार्याया उपवासस्योपदेशिकः ।

नटी:—अनेन वीरवस्यकेन चूर्णगोष्ठेन

सूत्र०:—साधु चूर्णगोष्ठ साधु ।

सूत्र०:—प्रेक्षंतां प्रेक्षंतामार्यमिश्राः । मदीयेन भक्तपरिव्ययेन पारलौकिको भर्तान्विष्यते ।

नटी:—आर्य प्रसीद प्रसीद । त्वमेव मम जन्मांतरेऽपि भर्ता भविष्यसीत्युपोषितास्मि ।

सूत्र०:—अयमुपवासः केनोपदिष्टः ।

नटी:—आर्यस्यैव प्रियवयस्येन चूर्णवृद्धेन ।

सूत्र०:—आः दास्याः पुत्र चूर्णवृद्ध कदा नु खलु त्वां कुपितेन राज्ञा पालकेन नववधूकेशकलापमिव ससुगंधं छेद्यमानं प्रेक्षिष्ये ।

वरील या दोन उताऱ्यांच्या तुलनेवरून असें दिसून येईल कीं, मुळांतील मुग्ध विनोद शूद्रकानें स्पष्ट करून फारच चांगला खुलवून दाखविला आहे. तसेंच असलें व्रत सांगणाऱ्या चूर्णवृद्धावर शूद्रकाचा सूत्रधार जो रागावला आहे, तें रागावणें अगदीं यथायोग्य आहे व त्या रागाच्या आवेशांतच सूत्रधाराच्या तोंडून शूद्रकानें पालक राजाचा वगैरे जो उल्लेख आणिलेला आहे, त्यांतही त्याचें कौशल्य फार चांगलें दिसून येतें.

---

| भास | शूद्रक |
| --- | --- |
| विदू०:—आसमुद्रयानविपन्नविभवस्य बहुलपक्षचंद्रस्य ज्योत्स्नापरिक्षय इव भवत एव रमणीयोऽयं दरिद्रभावः । | विदू०:—प्रणयिजनसंक्रामितविभवस्य सुरजनपीतशेषस्य प्रतिपच्चंद्रस्येव परिक्षयोऽप्यधिकतरं रमणीयः । |

येथें भासाच्या 'आसमुद्रयानविपन्नविभवस्य' या विशेषणाच्या जागीं 'प्रणयिजनसंक्रामितविभवस्य' हें विशेषण घालण्यांत शूद्रकानें जी मार्मिकता दाखविली आहे, तिचें आलंकारिक महत्त्व मार्मिकांच्या लक्षांत आल्यावांचून रहाणार नाहीं.

---

'दारिद्र्यात्पुरुषस्य बांधवजनो वाक्ये न संतिष्ठते' हा एक चांगल्या-पैकीं श्लोक आहे. 'सत्यं न मे विभवनाशकृतास्ति चिंता' या श्लोकाच्या पुढें 'दारिद्र्याद् ह्रियमेति' इत्यादि श्लोक मृच्छकटिकांत जेथें आहे, तेथें भासानें हा चांगला श्लोक उगीच घालून ठेविलेला आहे. परंतु शूद्रकानें त्याला तेथून उचलून दुसरीकडे नेऊन त्याचा जास्त चांगला उपयोग केला आहे. चारुदत्ताचा जप झाल्यानंतर मातृदेवतांचा बलि बाहेर नेऊन ठेवण्या-विषयीं चारुदत्त विदूषकाला सांगत असतां 'मी जाणार नाहीं' असें जेव्हां तो उत्तर देतो, तेव्हा तेथें शूद्रकानें हा श्लोक चारुदत्ताच्या तोंडीं घातला आहे. आणि हें स्थळ त्या श्लोकांतील पहिल्या चरणाला किती तरी अनुरूप आहे !

अशीच गोष्ट दुसऱ्याही एका श्लोकासंबंधानें झालेली आहे. 'विभवा-नुवशा भार्या समदुःखसुखो भवान्। सत्यं च न परिभ्रष्टं यद् दरिद्रेषु दुर्लभम् ॥' हा श्लोक चारुदत्त आणि विदूषक यांचें पहिल्या अंकांतील दारिद्र्याचें जें सामान्य संभाषण चाललें आहे, त्यांत उगीच कोठें तरी एका ठिकाणीं भासानें घालून ठेविला आहे. परंतु आतां शूद्रकाकडे पहा. तिसऱ्या अंकांत चोरी झाल्यानंर जेव्हां धूतेनें आपली रत्नमाला चारुदत्ताला दिली, तेव्हां त्याला असें वाटलें कीं, बायकोचें द्रव्य घेण्यापर्यंत आपली पाळी आली, तेव्हां आतां मात्र मी खरा दरिद्री झालों; पण फिरून दुसऱ्या बाजूनें पाहतां त्याला लगेच असें वाटलें कीं, छेः ! मी दरिद्री नाहीं; जसा प्रसंग येईल तशी वागणारी स्त्री मला मिळाली आहे; तसेंच वसंतसेनेच्या दागिन्यांचा मोबदला या रत्नमालेच्या योगानें आपल्याला परत देतां येण्यासारखा असल्या-कारणानें सत्यापासून भ्रष्ट होण्याचीही आतां भीति उरली नाहीं; व अशी जर स्थिति आहे, तर मग मी खरोखरच दरिद्री नाहीं, असें मानून--

विभवानुगता भार्या सुखदुःखसुहृद्भवान्।
सत्यं च न परिभ्रष्टं यद्दरिद्रेषु दुर्लभम् ॥

असें शूद्रकाचा चारुदत्त मोठ्या अभिमानानें म्हणतो. भार्या विभवानुगत आहे अशी रत्नमालेवरून प्रचीति आल्यावर आणि सत्यपरिभ्रंश होण्याची

भीति राहिली नाहीं अशी खात्री झाल्यावर मग हा श्लोक उपयोगांत आणण्यांत जें स्वारस्य आहे, तें भासाच्या पहिल्या अंकांतील अप्रासंगिक स्थळीं मुळींच नाहीं.

---

चारुदत्त आणि विदूषक यांचें दारिद्र्यासंबंधाचें प्रास्ताविक सामान्य संभाषण झाल्यानंतर शकार, वसंतसेना, वगैरेंचा प्रवेश सुरू होतो, तो सुरू होऊन वसंतसेना चारुदत्ताच्या घरांत शिरेपर्यंत चारुदत्ताला भासानें रंग-भूमीवर उगीच रिकामे बसवून ठेविलें आहे. परंतु शूद्रकानें या ठिकाणीं भासापेक्षां जास्त कुशलता प्रदर्शित केली आहे. शूद्रकाचा चारुदत्त आधीं एकदां विदूषकाला बळी बाहेर नेऊन ठेवण्याविषयीं सांगतो, तेव्हां विदूषक म्हणतो कीं, या संध्याकाळच्या वेळीं रस्त्यांतून गणिका, विट, व चेट, राजवल्लभ, इत्यादि अनेक प्रकारचे लोक हिंडत असतात, तेव्हां मी जाणार नाहीं. या वाक्याच्या द्वारानें शूद्रकानें वसंतसेना, शकार, विट व चेट, यांचा प्रवेश पर्यायानें सूचित केला आहे. भासाच्या कृतींत यांच्याबद्दल अशी पूर्व सूचना मुळींच नाहीं. मृच्छकटिकांतील चारुदत्त 'भवतु तिष्ठ तावदहं समाधिं निर्वर्तयामि ।' असें म्हणून समाधि लावून बसतो, आणि त्याच्या समाधीच्या वेळांत वसंतसेना, शकार, वगैरेंचा प्रवेश होऊन तो प्रवेश संपण्याच्या सुमारास आपली समाधि उतरून बळी बाहेर नेऊन ठेवण्याच्या आपल्या पूर्व संभाषणाला चारुदत्त फिरून सुरुवात करतो. अशा रीतीनें शूद्रकानें या ठिकाणीं दोन गुण साधले आहेत.

---

| भास | शूद्रक |
|---|---|
| गणिकाः– पल्लवक ! पल्लवक ! परभृतिके ! परभृतिके ! मधुकरक ! | वसन्त०ः– पल्लवक ! पल्लवक ! परभृतिके ! परभृतिके ! |

मधुकरक! शारिके! शारिके! हा धिक्! नष्टो मे परिजनः। अत्र स्वयमेवात्मा रक्षितव्यः।

शकारः-(सभयम्) भाव भाव मनुष्या मनुष्याः।

विटः- न भेतव्यं न भेतव्यम्।

वसन्त०:- माधविके माधविके।

विटः-(सहासम्) मूर्ख परिजनोऽन्विष्यते।

शकारः-भाव भाव स्त्रियमन्विच्छति।

विटः- अथ किम्।

शकारः- स्त्रीणां शतं मारयामि। शूरोऽहम्।

वसन्त०:-हा धिक् हा धिक् कथं परिजनोऽपि परिभ्रष्टः। मयात्मा स्वयमेव रक्षितव्यः।

वर दिलेल्या भासाच्या एका वाक्याचे लहान लहान तुकडे पाडून आणि त्यांच्या मधून मधून शकार व विट यांचीं प्रश्नोत्तरें घालून शूद्रकानें येथील हास्यरस किती उत्कृष्ट रीतीनें वाढविला आहे, हें या तुलनेवरून कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे.

---

## भास

शकारः- भाव! नष्टा नष्टा।

विटः-कथं नष्टा। अन्विष्यतामन्विष्यताम्।

शकारः- भाव न दृश्यते।

विटः- हन्त वंचिताः स्मः। वसन्तसेने! उपलब्धेदानीमसि।

## शूद्रक

शकारः- भाव भाव अन्विष्यामि वसन्तसेनिकाम्।

विटः-काणेलीमातः अस्ति किंचिच्चिन्हं यदुपलक्षयासि।

शकारः- भाव भाव किमिव।

विटः- भूषणशब्दं सौरभ्यांनुविद्धं माल्यगंधं वा।

कामं प्रदोषतिमिरेण न दृश्यसे त्वं
सौदामनीव जलदोदरसन्निरुद्धा ।
त्वां सूचयिष्यति हि वायुवशोपनी-
तो गन्धश्च शब्दमुखराणि च
भूषणानि ॥

शकारः– शृणोमि माल्यगन्धम् ।
अन्धकारपूरितया पुनर्नासिकया न
सुव्यक्तं पश्यामि भूषणशब्दम् ।

विटः– (जनान्तिकम्) वसन्तसेने
कामं प्रदोषतिमिरेण न दृश्यसे त्वं
सौदामिनीव जलदोदरसन्धिलीना ।
त्वां सूचयिष्यति तु माल्यसमुद्भ-
वोऽयं गन्धश्च भीरु मुखराणि च
नूपुराणि ॥ श्रुतं वसन्तसेने ।

वसन्त०:–(स्वगतम्) श्रुतं गृहीतं
च । (नाट्येन नूपुराण्युत्सार्य माल्यानि
चापनीय)

येथील 'कामं प्रदोषतिमिरेण' या श्लोकांतील सुंदर कल्पना मूळची भासाची खरी; पण तिचें सौंदर्य शूद्रकानें किती तरी जास्त खुलवून दाखविलें आहे. आणि तसें करतांना शकाराच्या विनोदाला आणखी एक अप्रतिम प्रसंग उत्पन्न करून दिला आहे, तो वेगळाच.

---

वसंतसेना चारुदत्ताच्या घरांत शिरून रदनिका रस्त्यांत आल्यानंतर वसंतसेनेला शोधीत असलेला शकार रदनिकेला धरण्याच्यापूर्वी वसंतसेना म्हणून एकदां विटाला धरतो, एकदां आपल्या चेटाला धरतो, वगैरे जो अत्यंत हास्यरसोत्पादक प्रसंग मृच्छकटिकमध्यें दिसून येतो, तो भासकवीच्या नाटकांत मुळींच नसून ही विनोदाची अवर्णनीय कल्पना शूद्रकानें नवीन उपयोगांत आणली आहे. यावरून शूद्रकाचें कल्पनाचातुर्य आणि विनोद-प्रियत्व फारच चांगलें व्यक्त होतें.

---

## अंक २

दुसऱ्या अंकाच्या प्रारंभीं वसंतसेना आणि तिची चेटी यांचें

संभाषण चाललेलें आहे. त्यांत वसंतसेनेचें कोणावर प्रेम बसलें आहे, हा प्रश्न निघाला असतां पुढीलप्रमाणें प्रश्नोत्तरें होतातः—

**भास**

गणिकाः– किं त्वं कामदेवानुयाने नागतासि ?

चेटीः– नन्वागतास्मि !

गणिकाः–केनोदासीनं मंत्रयसे ?

चेटीः–भणतु भणत्वज्जुका भणतु ।

गणिकाः–हंजे श्रुणु तावत्। अस्ति सार्थवाहपुत्रश्चारुदत्तो नाम ।

**शूद्रक**

वसं०ः– हंजे त्वं मया सह कामदेवायतनोद्यानं गतासीः ।

मद०ः– आर्ये गतास्मि ।

वसं०ः– तथापि मामुदासीनेव पृच्छसि ।

मद०ः–ज्ञातम् । किं स एव येनार्या शरणागताभ्युपपन्ना ।

वसं०ः– किंनामधेयः खलु सः ।

मद०ः– स खलु श्रेष्ठिचत्वरे प्रतिवसति ।

वसं०ः– अयि । नामास्य पृष्टासि ।

मद०ः–स खलु आर्ये सुगृहीतनामधेय आर्यचारुदत्तो नाम ।

भासानें चारुदत्ताचें नांव वसंतसेनेच्या तोंडून एकदम उच्चारविलें असल्यामुळें त्यांत कांहीं रसोत्पत्ति होत नाहीं; परंतु शूद्रकानें तसें केलें नाहीं. शूद्रकाची वसंतसेना चारुदत्ताचें नांव ऐकण्याविषयीं मनांतून उत्सुक आहे—तें नांव ती आपल्या मनामध्यें कदाचित् म्हणतही आहे. परंतु विनयामुळें तें नांव स्वतः मोठ्यानें उच्चारण्याला ती तयार नसून तें मदनिकेनें उच्चारिलेलें आपण ऐकावें अशी ती इच्छा करते. परंतु तिची उत्सुकता जास्त वाढविण्याकरितां मदनिकेला त्याचें नांव विचारलें असतांही तो श्रेष्ठिचत्वरामध्यें राहतो असेंच ती सांगते, आणि असे आढेवेढे घेऊन अखेरीस ती चारुदत्ताचें नांव घेते ! अशा रीतीनें ह्या सगळ्या संवादामध्यें शूद्रकानें फारच मौज केलेली आहे.

वरच्यासारखाच आणखी एक प्रसंग ह्याच दुसऱ्या अंकाच्या शेवटीं आलेला आहे. एका हत्तीच्या तडाक्यांतून एका बौद्ध परिव्राजकाला वसंतसेनेच्या एका चेटानें सोडविल्याबद्दल त्याला चारुदत्तानें आपल्या अंगावरील पहिल्या अंकांतील जातीकुसुमवासित प्रावारक बक्षीस दिला. तो घेऊन आपल्या शौर्याची हकीकत सांगण्याकरितां तो चेट वसंतसेनेकडे आला असतां पुढील संवाद झालेला आहेः—

**भास**

गणिकाः– को नु खल्वार्याचारुदत्तस्य गुणाननुकरोति ?

चेटीः– अज्जुके, ममापि कौतूहलमस्ति । कोऽनु खल्वेषः ।

गणिकाः–केनापि साधुना पुरुषेण भवितव्यम् ।

चेटीः– साधु पृच्छयतां तावत् ।

गणिकाः– हञ्जे ! एकपुरुषपक्षपातिता सर्वगुणान्हन्ति ।

चेटीः–भद्र अस्य नाम त्वं जानासि

चेटः–न खलु जानामि ।

गणिकाः– अतिलघु त्वया कृतम्

**शूद्रक**

वसं०ः– कर्णपूरक जानीहि तावत् किमेष जातीकुसुमवासितः न वेति ।

कर्ण०ः– आर्ये, मदगन्धेन सुष्ठु तं गंधं न जानामि ।

वसं०ः– नामापि तावत् प्रेक्षस्य ।

कर्ण०ः–इदं नाम आर्यैव वाचयतु ।

वसं०ः– आर्यचारुदत्तस्य ( इति वाचयित्वा सस्पृहं गृहीत्वा प्रावृणोति )

भासापेक्षां शूद्रकानें या ठिकाणीं जास्त काय विदग्धता दाखविली आहे, हें कोणाही रसिक वाचकाच्या तेव्हांच लक्षांत येईल.

---

याप्रमाणें चारुदत्त आणि मृच्छकटिक या दोन नाटकांची तुलना करून पहातां त्यांत जें विशेष महत्त्वाचे फरक दिसले, त्यांपैकीं कांहीं वर नमूद केले आहेत. त्यांवरून असें दिसून येतें कीं, भासाच्या कृतीमध्यें शूद्रकानें बऱ्याच चांगल्या नवीन सुधारणा केल्या आहेत. ह्या जशा किरकोळ सुधारणा शूद्रकानें कांहीं कांहीं भाषणांतून केलेल्या आहेत, तशा गोष्टीच्या रचनेमध्येंही त्यानें सुधारणा केल्या आहेत. परंतु चारुदत्त नाटकाचे चारच

अंक उपलब्ध झालेले असल्यामुळें या बाबतीमध्यें जास्त तुलना करून पाहण्याला मिळावी तितकी जागा मिळत नाहीं. म्हणून निरुपायास्तव हा विषय येथेंच थांबविला पाहिजे.

## चारुदत्त नाटकाच्या चार अंकांच्या पुढील अंक अनुपलब्ध अवस्थेंत अस्तित्वांत असतील काय ?

आतां या भासकृत चारुदत्त नाटकासंबंधानें आणखी असाही एक नवीन प्रश्न उत्पन्न होतो कीं, त्याचे हल्लीं जेवढे चार अंक उपलब्ध झालेले आहेत, तेवढ्याच चार अंकांमध्यें हें नाटक समाप्त झालेलें आहे, किंवा मृच्छकटिक नाटकाप्रमाणें असलेले याचे आणखी कांहीं पुढील अंक अनुपलब्ध अवस्थेमध्यें पडलेले असतील ? चारुदत्त नाटकाच्या फक्त दोनच हस्तलिखित प्रति सांपडलेल्या आहेत; आणि त्यांपैकींही फक्त एका प्रतीच्याच शेवटीं " अवसितं चारुदत्तम् " असें लिहिलेलें आहे. भासाचीं हल्लीं जीं नाटकें प्रसिद्ध झालेलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं एक-दोन नाटकांखेरीज बाकी सर्व नाटकांच्या समाप्तीच्या समयीं 'अवसित' हें पद भासानें घातलें आहे. तसेंच चारुदत्त नाटकाच्या चवथ्या अंकाच्या समाप्तीच्या सुमारास चेटीच्या तोंडीं " प्रिये मे अमृतांकनाटकं संवृत्तम् " असें जें वाक्य आहे, तेंही नाटकाच्या समाप्तीचें द्योतक असावें, असें दिसतें. परंतु या दोन गौण गोष्टी वगळून क्षणभर आपण बाजूला ठेविल्या, तर हें चारुदत्त नाटक येथेंच संपलेलें असलें पाहिजे, असें निश्चयात्मक रीतीनें ठरविण्याला त्या नाटकामध्यें अंतर्गत प्रमाण काय बरें आहे ? असें प्रमाण सांपडत नाहीं. इतकेंच नव्हे, तर उलट हें नाटक पुढें चालविण्याचा कवीचा उद्देश असावा, असें सुचविणारीं कित्येक तरी स्थळें या चारुदत्त नाटकांत दृष्टोत्पत्तीस येतात.

( १ ) चवथ्या अंकाच्या शेवटींच गणिका आणि चेटी यांच्या तोंडीं पुढील वाक्यें आहेत.

> गणिका:— एहीममलंकारं गृहीत्वार्यचारुदत्तमभिसरिष्यावः ।
> चेटी:— अज्जुके ! तथा । एतत्पुनरभिसारिकासहायभूतं
> दुर्दिनमुन्नमितम् ।

जर भासाला येथेंच नाटक संपवावयाचें होतें, तर "हे दागिने घेऊन अभिसारिकेच्या वेषानें चारुदत्ताकडे जाऊं या;" आणि "अभिसरणाला अनुकूल असें दुर्दिन उत्पन्न झालें आहे," हीं विधानें कशाला पाहिजे होतीं ?

( २ ) चवथ्या अंकाच्या शेवटीं भरतवाक्य नाहीं तें नाहींच; पण पुढें नाटक चालू असल्याचीं द्योतक अशीं वरच्याप्रमाणें भाषणें त्या अंकाच्या शेवटीं आलेलीं आहेत.

( ३ ) याच संबंधाचें आणखी एक गमक दुसऱ्या अंकांतील संवाहक आणि चवथ्या अंकांतील सज्जलक यांच्या शेवटच्या भाषणामध्यें दृश्यमान होतें. संवाहकाला द्यूतकारांचें कांहीं देणें होतें, तें देऊन वसंतसेनेनें त्याच्यावर उपकार केले, तेव्हां आपणही कांहीं तरी प्रत्युपकार करावा, अशी इच्छा साहजिकपणेंच त्याच्या मनांत उत्पन्न झाली. परंतु वसंतसेनेला ती गोष्ट इष्ट नव्हती. तेव्हां "निपुणं खलु प्रत्याख्यातोऽस्मि । को हि नामात्मना कृतं प्रत्युपकारेण विनाशयति ।" असें म्हणून आपली इच्छा मनांतल्या मनांत दाबून ठेवून तो बिचारा संवाहक प्रव्रजित होण्याकरितां तसाच निघून गेला. मृच्छकटिक नाटकामध्यें पुढें बौद्ध भिक्षु झालेल्या संवाहकाला वसंतसेनेवर प्रत्युपकार करण्याची संधि आठव्या आणि दहाव्या अंकांत देण्यांत आलेली आहे. तसें कांहीं चारुदत्त नाटकाच्या कर्त्याला पुढें करावयाचें नसतें, तर या दुसऱ्या अंकांत या प्रत्युपकाराची गोष्ट काढून ठेवण्यांत तितकें स्वारस्य नसल्यामुळें त्यानें तसें केलें नसतें. यावरून पुढील गोष्ट वाढविण्याचा हेतु या वेळीं कवीच्या मनांत असावा, असें दिसतें.

( ४ ) अशीच गोष्ट सलज्जकाचीही झालेली आहे. चवथ्या अंकांत वसंतसेना मदनिकेला सज्जलकाच्या स्वाधीन करते, त्या वेळीं आपणही याबद्दल वसंतसेनेचें कांहीं तरी कार्य केलें पाहिजे, असें सज्जलकाला वाटतें. परंतु—

नरः प्रत्युपकारार्थी विपत्तौ लभते फलम् ।
द्विषतामेव कालोऽस्तु योऽस्या भवतु तस्य वा ॥

असा पोक्त विचार मनामध्यें आणून वेळ येईल तेव्हां पाहूं असें म्हणून सज्जलकानें ही प्रत्युपकाराची कल्पना आपल्या पोटांत दाबून ठेविली.

भास कवीच्या कृतींतील या प्रसंगावरूनही असें दिसतें कीं, भासाच्या मनांतून या पेरून ठेवलेल्या बीजाला पुढें योग्य काळीं फळ आणून दाखवावयाचें असलें पाहिजे.

( ५ ) चारुदत्त नाटकाच्या पहिल्या अंकांत नायकाच्या तोंडीं पुढीलप्रमाणें एक उत्कृष्ट श्लोक भासानें घातला आहेः—

दारिद्र्यात्पुरुषस्य बांधवजनो वाक्ये न संतिष्ठते
सत्त्वं हास्यमुपैति शीलशशिनः कान्तिः परिम्लायते ।
निर्वैरा विमुखीभवंति सुहृदः स्फीता भवन्त्यापदः
पापं कर्म च यत्परैरपि कृतं तत्तस्य सम्भाव्यते ॥

यांतील शेवटचा चरण इतका सूचक आहे कीं, त्यांतील कटाक्ष अत्यंत अरसिकांच्याही लक्षांत आल्यावांचून रहावयाचा नाहीं. हा चरण ज्यानें पहिल्या अंकांत घातला, त्याच्या डोक्यांत शकाराकडून वसंतसेनेचा वध आणि त्याच्या आरोपाची चारुदत्तावर शाबिदी, या भावी गोष्टींची कल्पना नसावी, असें मानणें फार दुर्घट आहे.

( ६ ) चारुदत्त नाटकाच्या चवथ्या अंकामध्यें वसंतसेना आणि चेटी बोलत बसल्या असतां दुसरी एक चेटी येऊन वसंतसेनेला तिच्या आईचा म्हणून असा एक निरोप सांगते कीं, "बाहेर शकाराची गाडी आली आहे, व त्यानें पुष्कळ सुवर्णालंकारही पाठविले आहेत." हा निरोप ऐकून वसंतसेना फार रागावते, व ज्या वेळीं चारुदत्ताकडे अभिसारिकेच्या वेषानें जावयाचें, त्या वेळीं मी दागिने घालीन, असें म्हणते. यावरून व याच अंकाच्या शेवटच्या अभिसरणाच्या व दुर्दिनाच्या उल्लेखावरून कवीच्या मनामध्यें दुर्दिनाभिसरणाच्या पांचव्या अंकाची बहुतेक तयारी झालेली असली पाहिजे, असें दिसतें; व शकाराच्या गाडीच्या आणि दागिन्यांच्या उल्लेखांवरून हेंही स्पष्ट होतें कीं, शकाराचें वसंतसेनेवरील प्रेम पहिल्या अंकांतील परिभवाबरोबरच समाप्त झालेलें नसून त्याचा दुर्विपाक अद्यापि पुढील अंकांतून कवीच्या मनांतून करावयाचा होता.

## कल्पनासादृश्याचें प्रमाण

अशा प्रकारच्या ह्या अंतर्गत प्रमाणांवरून कदाचित् भास कवीनें लिहिलेले पुढलेही कांहीं अंक अजून उपलभ्यमान व्हावयाच्या स्थितीमध्यें

असतील, असें एकपक्षीं वाटतें. आतां हा तर्क एवढ्या वर दिलेल्या थोड्याशा प्रमाणावरूनच सुप्रतिष्ठित होणें शक्य नाहीं, हें खरें. तरी पण या कल्पनेला पोषक असे दुसरेही कांहीं आधार दाखवितां येण्यासारखे आहेत. जर भासानें पुढले अंक लिहिलेले असतील, तर भासाचे पहिले चार अंक जसे शूद्रकाच्या मृच्छकटिकाच्या चार अंकांमधून हल्लीं दिसत आहेत, त्याप्रमाणें ते भासाचे पुढील अंकही शूद्रकाच्या मृच्छकटिकाच्या पांच ते दहा या अंकांमधून आपल्याला आज पर्यायानें परिदृश्यमान होत असले पाहिजेत, असें मानण्याला कांहीं हरकत नाहीं. पण जर हे मृच्छकटिकाचे पांच ते दहा अंक भासाच्या मूळ कांहीं अंकांवरून रचलेले असले, तर भासाच्या कांहीं तरी विशिष्ट अशा कल्पना मृच्छकटिकाच्या ह्या सहा अंकांमधून कोठें तरी अभिज्ञायमान व्हावयाला पाहिजेत कीं नाहीं? होय; आणि त्याप्रमाणें त्या सूक्ष्म दृष्टीला होतातही ! त्यांपैकीं कांहीं कल्पना पुढें दिल्या आहेत.

( १ ) सहाव्या अंकांमध्यें आर्यक पुढील चरण म्हणतोः—

भीमस्यानुकरिष्यामि बाहुः शस्त्रं भविष्यति ।

ही कल्पना मूळची भासाची आहे. व भासानें आपल्या इतर तीन नाटकांमध्यें या कल्पनेचा उपयोग केलेला आहे.

### ( १ ) मध्यमव्यायोग

घटोत्कचः— गृह्यतामायुधम् ।
भीमसेनः— आयुधमिति । गृहीतमेतत् ।
घटोः०— कथमिव ? ।
भीम०:— कांचनस्तंभसदृशो रिपूणां निग्रहे रतः ।
अयं तु दक्षिणो बाहुरायुधं सदृशं मम ॥

### ( २ ) पंचरात्र, अंक २

भीम०:— सहजौ मे प्रहरणं भुजौ पीनांसकोमलौ ।
तावाश्रित्य प्रयुध्येयं दुर्बलैर्गृह्यते धनुः ॥

### ( ३ ) बालचरित, अंक ३

अरिष्टर्षभः— तेन हि गृह्यतां स्वजातिसदृशं प्रहरणम् ।

दामोदरः— प्रहरणमिति । हं भोः ।

गिरितटकठिनांसावेव बाहू ममैतौ
प्रहरणमपरं तु त्वादृशां दुर्बलानाम् ।

( २ ) मृच्छकटिकामध्यें पालक आणि गोपाल ( आर्यक ) अशीं दोन पात्रें आहेत. आपल्या इतर नाटकांतील कांहीं पात्रांचा निर्देश भासानें याच सारख्या नांवांनीं केलेला आढळून येतोः—

अर्थशास्त्रगुणग्राही ज्येष्ठो गोपालकः सुतः ।
गान्धर्वद्वेषी व्यायामशाली चाप्यनुपालकः।
—प्रतिज्ञायौगंधरायण, अंक २.

( ३ ) मृच्छकटिकांतील नवव्या अंकांतील 'वेदार्थान्प्राकृतस्त्वं वदसि' इत्यादि ( २१ वा ) श्लोक सुमधुरा या वृत्तांत आहे. हें अप्रसिद्ध वृत्त नेहमीं कवि आपल्या काव्यांत उपयोगांत आणीत नाहींत. म्हणून त्यावरून जर हें वृत्त कोठें उपयोगांत आणिलेलें असेल, तर ती त्या कवीची विशिष्ट आवड होय, असें म्हणावें लागतें. ही या वृत्ताबद्दलची भासाची आवड दोन ठिकाणीं दिसून येते. 'पंचरात्र' नामक नाटकाच्या पहिल्या अंकांतील "एषा दीप्तैकरूपा—" हा सहावा श्लोक या सुमधुरा वृत्तांत आहे. व 'दूतवाक्य' या नाटकांतील 'आवासाः पार्थिवानां–' हा पंधरावा श्लोकही याच वृत्तांत आहे.

( ४ ) मृच्छकटिकाच्या नवव्या अंकांत चारुदत्त अधिकरणमंडपाकडे जावयाला निघतो, त्या वेळेला त्याला जे अपशकुन होतात, त्यांचें वर्णन असें आहेः—

रुक्षस्वरं वाशति वायसोऽयम् ।
शुष्कवृक्षस्थितो ध्वांक्ष आदित्याभिमुखस्तथा ॥

आणि पंचरात्र नाटकांत गोग्रहण करण्याकरितां कौरव येत होते, तेव्हां विराटराजाचा वृद्धगोपालक यालाही अगदीं अशाच प्रकारचे अपशकुन झाल्याचें पुढील वाक्यांत तशाच शब्दांनीं सांगितलें आहेः—

वृद्धगोपालकः—किं खल्वेष वायसः शुष्कवृक्षमारुह्य शुष्कशाखानिघट्टिततुण्डमादित्याभिमुखं विस्वरं विलपति ।

याशिवाय "छिद्रेष्वनर्था बहुलीभवन्ति", "योऽहं लतां कुसुमितामपि", "तदनु जयाति भेत्ता षण्मुखः क्रौञ्चशत्रुः", करीकरसमबाहुः"

इत्यादि श्लोकांमधील कल्पनांचें अर्थसादृश्य भासाच्या इतर ग्रंथांतून पुष्कळ ठिकाणीं आढळतें. तसेंच मृच्छकटिकाच्या पांचव्या अंकाच्या समाप्तीची पद्धत भासाच्या 'अविमारक' नाटकाच्या पांचव्या अंकाच्या समाप्तीशीं इतकी जमते कीं, त्यांचें सोदरत्व जवळ जवळ सिद्धच झाल्यासारखें होतें.

( ५ ) तसेंच मृच्छकटिकाच्या भरतवाक्यांत "क्षीरिण्यः सन्तु गावो......श्रीमन्तः पान्तु पृथ्वीं प्रशमितरिपवो धर्मनिष्ठाश्च भूपाः" या ज्या दोन कल्पना आलेल्या आहेत, त्या भास कवीच्या नेहमींच्या भरतवाक्याच्या

भवन्त्वरजसो गावः परचक्रं प्रशाम्यतु ।
इमामपि महीं कृत्स्नां राजसिंहः प्रशास्तु नः ॥

या श्लोकामधीलच आहेत, हें कोणाच्याही लक्ष्यांत येईल.

आतां जो शूद्रक भासाचे सगळे अंकच्या अंक उचलून घेतो, तो भासाच्या या वरील कल्पना घेऊन आपल्या मृच्छकटिक नाटकाच्या पुढील सहा अंकांतून घालूं शकणार नाहीं, असें नाहीं. परंतु एवढ्याच कल्पना मात्र शूद्रकानें भासाच्या इतर नाटकांतून उचलून घेऊन मृच्छकटिकांत घातल्या असतील आणि बाकीचा भाग त्यानें स्वतः लिहिला असेल असें मानावें, तर या कल्पनांत असें काय मोठें अद्वितीयत्व आहे, कीं ज्यांसाठीं त्या कल्पना उचलून घेण्याचा कोणालाही अनिवार मोह उत्पन्न झालाच पाहिजे ? तसें त्यांच्यांत कांहीं विशेष सौंदर्य नाहीं. परंतु एकच कवि असला, म्हणजे तेच तेच कांहीं ठराविक विचार फिरून फिरून त्याच्या निरनिराळ्या लेखांतून स्वाभाविकपणेंच येतात, अशीं मात्र पुष्कळ उदाहरणें आढळतात. म्हणून हीं वर दिलेलीं सर्व प्रमाणें एकत्र केलीं, तर भासाचे पुढील अंक असणें असंभाव्य आहे, असें वाटत नाहीं. तरी याच्या उलट पुढल्या अंकांतील गोष्टीच्या परिपूर्णतेसाठीं रोहसेन, आर्यक, शकाराचा चेट, इत्यादि जीं पात्रें आधींपासून यावयाला पाहिजेत, तीं भासाच्या 'चारुदत्त' नाटकाच्या पहिल्या चार अंकांत उल्लेखित केलीं गेलेलीं नाहींत, अशा कांहीं गोष्टी वरील कल्पनेला विरोध करणाऱ्याही आहेत. त्यामुळें जास्त कांहीं साधनें उपलब्ध होईपर्यंत हा प्रश्न अशाच संशयात्मक स्थितीमध्यें सोडून हा विषय पुरा करणें भाग आहे.

---

*

# प्रियदर्शिका, नागानंद हीं नाटकें कोणाचीं ?



भास कवीचीं नाटकें अलीकडे प्रसिद्ध झाल्यापासून तीं वाचण्याकडे संस्कृत वाचकांचें विशेष लक्ष लागलेलें आहे. आतांपर्यंत भास कवीचीं तेरा नाटकें उपलब्ध व प्रसिद्ध झालेलीं आहेत. परंतु याच्यापेक्षां आणखी पुष्कळ नाटकें भास कवीनें लिहिलेलीं असावींत, असा कित्येकांचा अंदाज आहे. व त्याबद्दल कांहीं प्रमाणेंही पुढें आणण्यांत येत असतात. तीं प्रमाणें यथार्थ आहेत किंवा अयथार्थ आहेत, याचा निर्णय, भास कवीचीं अद्यापपर्यंत अनुपलब्ध असलेलीं नाटकें जेव्हां उपलब्ध होतील, तेव्हां तर सहजगत्याच होणार आहे; तरी पण तोंपर्यंत तीं प्रमाणें यथार्थ परीक्षेमध्यें बरोबर कसोटीला उतरत असलीं, तरी त्यांच्यावर तूर्तातूर्त विश्वास ठेवण्याला कांहीं प्रत्यवाय आहे, असें नाहीं.

भास कवीनें पुष्कळ नाटकें लिहिलेलीं आहेत, असा पुष्कळांचा समज आहे. व त्या नाटकांमध्यें रत्नावलि, प्रियदर्शिका आणि नागानंद, या नाटकांचाही समावेश होतो, असें मानण्यांत येतें. या उपरिनिर्दिष्ट तीन नाटकांचें कर्तृत्व त्या त्या नाटकांतील प्रस्तावनेमधील निर्देशाप्रमाणें श्रीहर्ष-नामक एका राजाकडे जातें. परंतु सुप्रसिद्ध काव्यप्रकाशकार मम्मटभट्ट यानें 'काव्यं यशसेऽर्थकृते' या आपल्या काव्यप्रकाशांतील प्रारंभींच्याच एका कारिकेवर टीका लिहितांना काव्यरचनेपासून अर्थप्राप्ति कशी होते हें दाखविण्याकरितां 'श्रीहर्षादेर्धावकादीनामिव धनम्' असें एक उदाहरण दिलें आहे. या उदाहरणांतील भावार्थ असा आहे कीं: —श्रीहर्ष या नांवाचा पूर्वी कोणी एक राजा होऊन गेला. त्याच्या पदरीं धावक या नांवाचा कोणी एक कवि होता. त्या धावक नांवाच्या कवीनें रत्नावलि, प्रियदर्शिका आणि नागानंद, अशीं नाटकें लिहून तीं त्या राजाच्या नांवानें प्रसिद्ध केलीं आणि त्याबद्दल त्या श्रीहर्ष राजाकडून धावकाला पुष्कळ द्रव्य मिळालें. येणेंप्रमाणें

काव्यप्रकाशामधील वरील वाक्यांचा अर्थ निरनिराळया टीकाकारांनीं दिलेला आहे. 'श्रीहर्षादेर्बाणादीनामिव धनम्' असाही कित्येक टीकाकारांनीं एक पाठभेद स्वीकारलेला आहे, व त्या पाठभेदाप्रमाणें श्रीहर्षादिकांपासून बाणादिक कवींना द्रव्य प्राप्त झालें असाही एक अर्थ निघतो. यापैकीं आधीं धावकासंबंधानें काय निर्णय निष्पन्न होतो, याचा विचार करून नंतर मग जरूर लागलीच तर आपण बाण कवीच्या पाठभेदाकडे वळूं.

या धावकासंबंधानें अशी एक हकीकत अलीकडे कित्येक* टीकाविषयक लेखांतून प्रसिद्ध झाली आहे कीं, भासकवि हाच धावक होय. धावक म्हणजे कपडे धुणारा परीट. भास हा जातीचा परीट होता, म्हणून त्याला धावक असेंही म्हणत असत. या धावकानें, म्हणजे भासानें, पुष्कळ नाटकें लिहिलेलीं असल्याचे उल्लेख पूर्वीच्या संस्कृत वाङ्मयामध्यें आढळतात.

भासनाटकचक्रेऽपि छेकैः क्षिप्ते परीक्षितुम् ।
स्वप्नवासवदत्तस्य दाहकोऽभून्न पावकः ॥

या श्लोकामध्यें भासाच्या अनेक नाटकांचा उल्लेख करण्यांत आलेला आहे. तसेंच बाणभट्टानेंही आपल्या हर्ष-चरितामध्यें—

सूत्रधारकृतारंभैर्नाटकैर्बहुभूमिकैः ।
सपताकैर्यशो लेभे भासो देवकुलैरिव ॥

या श्लोकांत भासाच्या नाटकांचा उल्लेख केलेला आहे. आणि कालिदासाच्या मालविकाग्निमित्राच्या प्रारंभींही भासाचा उल्लेख आहे. भासाचीं प्रत्यक्ष नाटकें जेव्हां उपलब्ध झालेलीं नव्हतीं, तेव्हां या जुन्या व मोघम उल्लेखांमध्यें एक प्रकारचें महत्त्व होतें. परंतु आतां जर भासाचीं तेरा नाटकें आपल्याला प्रत्यक्ष वाचावयाला मिळत आहेत, तर या प्राचीन उल्लेखांमध्यें पूर्वीच्याइतकें महत्त्व उरलेलें नाहीं, हें उघड आहे. आतां महत्त्वाचा प्रश्न भास कवीच्या प्रसिद्ध झालेल्या नाटकांशिवाय आणखी त्या कवीचीं कोणकोणतीं नाटकें असावीं, हा आहे. या प्रश्नाच्या समाधानाच्या उपयोगीं थोड्याबहुत प्रमाणानें पडण्यासारखे पुढील श्लोक आहेत.

---

*श्रीवाणीविलास संस्कृत सीरीजमधील प्रियदर्शिका नाटकाची प्रस्तावना पहा.

कारणं तु कवित्वस्य न संपन्न कुलीनता ।
धावकोऽपि हि यद्भासः कवीनामाग्रिमोऽभवत् ॥
आदौ भासेन रचिता नाटिका प्रियदर्शिका ।
निरीर्ष्यस्य रसज्ञस्य कस्य न प्रियदर्शना ॥
तस्य रत्नावली नूनं रत्नमालेव राजते ।
दशरूपककामिन्या वक्षस्यत्यन्तशोभना ॥
नागानंद समालोक्य यस्य श्रीहर्षविक्रमः ।
अमंदानंदभरितः स्वसभ्यमकरोत्कविम् ॥
उदात्तराघवं नूनमुदात्तरसगुम्भितम् ।
यद्वीक्ष्य भवभूत्याद्याः प्रणिन्युर्नाटकानि वै ॥
शोकपर्यवसानास्य नवांका किरणावली ।
माकंदस्येव कस्यात्र प्रददाति न निर्वृत्तिम् ॥
भासनाटकचक्रेऽपि छेकैः क्षिप्ते परीक्षितुम् ।
स्वप्नवासवदत्तस्य दाहकोऽभून्न पावकः ॥

या श्लोकांतील तात्पर्यार्थ असा आहे कीं, भासकवि हा धावक असूनही तो सर्व कवींमध्यें श्रेष्ठ होता. आणि त्यानें प्रियदर्शिका, रत्नावलि, नागानंद, उदात्तराघव, किरणावलि इत्यादि अनेक नाटकें लिहिलेलीं आहेत. हे श्लोक राजशेखरनामक कवीच्या 'कविविमर्श' या नांवाच्या ग्रंथामधून घेतलेले असल्याचें सांगण्यांत येतें. राजशेखराचा 'कविविमर्श' हा ग्रंथ आहे किंवा नाहीं, आणि त्यामध्यें हे वर दिलेले श्लोक आहेत किंवा नाहींत, याविषयीं वादविवाद करणें हा या प्रस्तुत लेखाचा विषय नाहीं; तर या श्लोकांवरून प्रियदर्शिका व नागानंद या नाटकांचा कर्ता भास हा होता, हीं जी अनेक गोष्टींमध्यें एक गोष्ट पुढें आलेली आहे, तिच्यासंबंधानें निर्णय करण्याचा प्रस्तुत लेखांतील मुख्य उद्देश आहे. प्रियदर्शिका, नागानंद, हीं नाटकें आज पुष्कळ दिवस प्रसिद्ध झालेलीं आहेत, आणि भासाचीं तेरा नाटकें हींही अलीकडे प्रसिद्ध झालेलीं आहेत. म्हणून श्रीहर्षाचीं म्हणून मानलीं जाणारीं प्रियदर्शिका व नागानंद हीं नाटकें आणि भास कवीचीं आतांपर्यंत प्रसिद्ध झालेलीं नाटकें, हीं सर्व ज्या कोणी वाचलीं असतील, त्यांच्या मनांत या उभयकविकर्तृक नाटकांमध्यें काय साम्य किंवा वैषम्य आहे, याच्याबद्दल

कांहीं तुलनात्मक कल्पना स्वतंत्र रीतीनें उत्पन्न होणें मोठेंसें दुर्घट आहे असें नाहीं. तें सांगण्याला 'कविविमर्शा'तील श्लोकांचीच विशेष अपेक्षा आहे, असें नाहीं. एका बाजूला प्रियदर्शिका व नागानंद आणि दुसऱ्या बाजूला भासाचीं प्रसिद्ध नाटकें, यांच्या निसर्गजन्य अन्योन्यतुलनेवरून हीं एकाच बापापासून जन्म पावलेलीं एकमेकांचीं बहीणभावंडें आहेत, किंवा यांचें एकमेकांशीं कांहीं नातें नाहीं, असा कोणाचा कांहीं एखादा ग्रह होणें अशक्य आहे, असें नाहीं. अशा रीतीनें स्वाभाविकपणें उत्पन्न होणाऱ्या कल्पनेला 'कविविमर्शा'तील श्लोकांचा सहजगत्या दुजोरा मिळतो, एवढेंच दाखविण्याकरितां हे श्लोक वर दिलेले आहेत. भासाचीं आणखी नवीन नवीन नाटकें उपलब्ध होण्याचा संभव आहे. त्याप्रमाणें कालक्रमानें कविविमर्शामध्यें दिलेल्या वर्णनाच्या अनुरोधानुरूप तीं नाटकें सांपडलीं, तर 'कविविमर्श' या काव्याचें अस्तित्व आणि सत्यत्व आपोआपच सिद्ध होणार आहे. तोंपर्यंत त्या काव्यांतील वचनांवर भार न टाकतां स्वतंत्र रीतीनें भास कवीशीं प्रियदर्शिकेचें व नागानंदाचें कांहीं नातें लागतें किंवा काय, हा प्रश्न विचाराकरितां घेऊन त्यांपैकीं प्रियदर्शिकेच्या विवेचनाकडे आपण प्रथम वळूं.

## प्रियदर्शिका

प्रत्येक ग्रंथकाराच्या लिहिण्यामध्यें त्याचा म्हणून कांहीं तरी एक विशेष धर्म असतो. तो विशेष धर्म त्या ग्रंथकाराला सोडीत नाहीं, आणि तो ग्रंथकार त्या विशेष धर्माला सोडीत नाहीं, अशी त्या दोघांच्यामधील साहचर्याची एक स्थिति असते. तो ग्रंथकार कांहींही लिहो, त्याच्या लिहिण्यांत त्याचे जे विशेष धर्म असतील, त्यांपैकीं कोठें ना कोठें तरी, कोणते ना कोणते तरी त्याचे ते विशेष धर्म प्रादुर्भूत झाल्यावांचून रहावयाचेच नाहींत, हा नियम वाङ्मयाच्या शास्त्रांत अबाधित आहे. यावरून ग्रंथकार आपलें नांव सांगो अथवा न सांगो, त्याचे लेख सूक्ष्म दृष्टीला बहुधा बिनचुकपणें ओळखितां येतात. अशा दृष्टीनें भास कवीचीं आजपर्यंत प्रसिद्ध झालेलीं तेरा नाटकें काळजीपूर्वक रीतीनें वाचलीं असतां भासाच्या भाषेचीं पावलें ओळखण्याच्या खुणा साधारणपणें कोणकोणत्या आहेत, याबद्दलची कोणालाही कल्पना येणें फारसें कठिण आहे, असें नाहीं.

आतां भासाच्या भाषेच्या व विचाराच्या अशा कांहीं विशेष खुणा आहेत किंवा काय, आणि त्या प्रियदर्शिका या नाटिकेमध्यें आपल्याला आढळतात किंवा काय, याचा आपण विचार करूं. तसेंच प्रियदर्शिकेचें भासकर्तृकत्व सिद्ध होण्याला आणखी कांहीं अवांतर प्रमाणें मिळतात किंवा काय, याबद्दलही आपण विवेचन करूं. कल्पनासादृश्य कोठें आढळतें कीं काय, हें शोधून काढण्याच्या हेतूनें एका बाजूला भासाचीं नाटकें आणि दुसऱ्या बाजूला प्रियदर्शिका नाटिका, हीं ठेवून उभयतांचें सूक्ष्म रीतीनें आणि चिकित्सक बुद्धीनें अध्ययन केलें, तर ठिकठिकाणीं अनेक सादृश्यें उपलब्ध होतात, व त्यांवरून प्रियदर्शिकेच्या भासकर्तृकत्वाची कल्पना मनाच्या गर्भाशयामध्यें प्रथमतः अस्पष्टपणें उत्पन्न होऊन पुढें ती हळूहळू वृद्धिंगत होऊं लागते. सकृद्दर्शनींच भासाच्या इतर नाटकांतील भाषा जशी साधी, सरळ आणि जोरदार आहे, तशीच ती प्रियदर्शिकेमध्येंही असल्याचें दिसून येऊं लागतें. तसेंच नाटकांतील प्रसंगविशेष जुळवून आणण्याची आणि रसपरिपाक उत्पन्न करण्याची भासाची जी एक विशेष तऱ्हा आणि तजवीज त्याच्या इतर नाटकांतून दिसते, तशीच ती प्रियदर्शिकेमध्येंही भासमान होते. आणि त्या त्या प्रसंगविशेषीं जी संभाषणांची परिपाटी भासाच्या इतर नाटकांतून वक्रोक्ति, विनोद, इत्यादिकांच्यासंबंधानें आढळते, तीच प्रियदर्शिकेमध्येंही दृग्गोचर होते. अशा प्रकारच्या या अनेक सामान्य कारणांनीं उद्भूत होत चाललेल्या एककर्तृकत्वाच्या ग्रहाला कांहीं विशेष प्रमाणांनीं जास्तच बळकटी येते. त्या विशेष प्रमाणांपैकीं कांहीं पुढें देण्यांत येत आहेत. भासाच्या काव्यांतील विशिष्ट धर्मांचीं उदाहरणें अनेक आहेत. परंतु त्या सगळ्यांचें येथें प्रयोजन नसल्यामुळें ज्या विशिष्ट धर्मांचीं प्रतिबिंबें प्रियदर्शिकेमध्यें पडलेलीं आढळून येतात, तेवढ्यांचाच फक्त येथें उल्लेख आणि उपयोग करण्यांत येत आहे.

## १ अगस्त्यपूजन

नाटकांमधून सामान्यतः जे उल्लेख येतात, त्यांत अगस्त्यपूजनाचा उल्लेख हा कांहीं सहसा कोठें येत नाहीं. परंतु भास कवीच्या अविमारकनामक नाटकामध्यें याचा उल्लेख येणेंप्रमाणें आलेला आहे.

अद्य भगवन्तमगस्त्यमाराधयितुं मलयपर्वते विद्याधरैरुत्सवः प्रारब्धः।

तत्र वयमपि संकेतिताः । इह मुहूर्तं विश्रम्य गमिष्याव इत्यवतीर्णाः । एषोऽस्माकं वृन्तातः ।

आणि याच अगस्त्यपूजनाचा उल्लेख प्रियदर्शिकेच्या दुसऱ्या अंकामध्यें सांपडतो, तो असाः—

आज्ञप्तास्मि देव्या वासवदत्तया, हञ्जे इन्दीवरिके, अद्य मया अगस्त्यमहर्षयेऽर्घो दातव्यः । तद्गच्छ त्वम् । शेफालिकाकुसुममालां लघु गृहीत्वागच्छ ।

इतकेंच नव्हे, तर पहिल्या अंकांत कञ्चुकीच्या भाषणांत एका तीर्थाचें नांवही अगस्त्यतीर्थ म्हणून आलेलें आहे.

चंद्रकामदेवादिकांच्या पूजांचे प्रसंग संस्कृत नाटकांमधून येतात. ते सामान्य आणि स्वाभाविक असल्यामुळें कोणाही कवीच्या मनाला ते सहजगत्या सुचणें शक्य आहे. परंतु अगस्त्यपूजा ही कांहीं तशांतली नव्हे. असें असून ती जर अविमारक आणि प्रियदर्शिका या दोन नाटकांमधून आढळते, तर समानकर्तृकत्वाच्या कल्पनेवांचून अन्य रीतीनें तिची उपपत्ति कशी लावतां येईल?

## २ शरदातप

याच्या उलट 'शरदृतूंमधील ऊन फार कडक असतें,' ही गोष्ट अगदीं सामान्य आहे. परंतु ही सामान्य गोष्ट अशा प्रकारची आहे कीं, संस्कृत नाटकांतून तिचा कोठें सहसा उल्लेख आलेला आढळत नाहीं, हाच तिच्यामध्यें विशेष आहे. आणि या विशेषामुळेंच तुलनेच्या प्रसंगीं या कल्पनेच्या उल्लेखाकडे कोणाचेंही लक्ष जाणें अगदीं स्वाभाविक आहे. ही कल्पना अगदीं सामान्य असूनही भासाच्या स्वप्नवासवदत्त या नाटकाच्या चवथ्या अंकामध्यें विदूषक राजाला म्हणतोः—

शरत्कालतीक्ष्णो दुःसह आतपः । तदिमं तावन्माधवीमंडपं प्रविशावः ।

आणि ही कल्पना इतकी सामान्य असूनही प्रियदर्शिकेमध्यें तिचा दोनदां उपयोग करण्यांत आला आहे. एकदां पहिल्या अंकांत प्रारंभीं कंचुकी म्हणतो कीं—

अहो अतिदारुणता शरदातपस्य। यदेवमनेकदुःखसंतापितेनापि मया तीक्ष्णोऽवगम्यते।

आणि पुढें तिसऱ्या अंकांत प्रियदर्शिका म्हणते—

अधिकं खलु शरदातपेन संतप्तान्यद्यापि न मेंऽगानि संतापं मुञ्चन्ति।

अशा रीतीनें सामान्य असूनही विशेषता पावलेली ही शरदातपाच्या तीक्ष्णतेची कल्पना समानकर्तृकत्वालाच सूचित करीत नाहीं काय?

## ३ कन्यकादर्शन

'निर्दोषदर्शना कन्यका' हें वाक्य संस्कृत नाटकें वाचणारांच्या पुष्कळ परिचयाचें असलें पाहिजे. यांतील कल्पना फार गोड आहे. ही कल्पना प्रियदर्शिकेच्या दुसऱ्या अंकांत राजाच्या तोंडीं घातलेली आढळते. प्रियदर्शिकेला पाहून राजा विदूषकाला म्हणतो—

इयं सा विंध्यकेतोर्दुहिता। चिरं मुषिताः स्मो वयम्। वयस्य, निर्दोषदर्शना कन्यका खल्वियम्। विश्रब्धमिदानीं पश्यामः।

ही कल्पना नागानंदाच्या पहिल्या अंकामध्यें 'कन्यका हि निर्दोषदर्शना भवन्ति' ह्या वाक्यामध्यें आलेली आहे. पण ही कल्पना आली कोठून? मूळची ही कल्पना कोणाची? हीच कल्पना थोड्याशा शब्दविपर्यासानें आणि रूपांतरानें मृच्छकटिकांतही ( अंक १ ) आलेली आहे. पण तेथें तरी कोठून आली? या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, ही कल्पना मूळची भासाची आहे. 'प्रतिज्ञायौगंधरायण' या नांवाचें जें भासाचें नाटक आहे, त्यांतील तिसऱ्या अंकांत वत्सराजाची आणि वासवदत्तेची पहिल्या प्रथम दृष्टादृष्ट कशी झाली याबद्दलची हकीकत यौगंधरायणाला सांगत असतां विदूषक म्हणतोः—

या सा कालाष्टमी अतिक्रान्ता तस्यां तत्रभवती वासवदत्ता नाम राजदारिका धात्रीद्वितीया कन्यकादर्शनं निर्दोषमिति कृत्वापनीतकंचुकया शिबिकयावघट्टितप्रणालीप्रसुतसलिलविषमं राजमार्गं परिहृत्य यत्तद्बन्धनद्वारस्याग्रतो भगवत्या यक्षिण्याः स्थानं तस्मिन् देवकार्यं कर्तुं गतासीत्।

या वरील उताऱ्यांत 'कन्यकादर्शनं निर्दोषं' ही जी कल्पना भासानें योजिली आहे, तीच कल्पना त्यानें निराळ्या स्वरूपामध्यें आपल्या

प्रतिमा नाटकाच्या पहिल्या अंकाच्या शेवटीं लक्ष्मण व सीता यांसह अयोध्येच्या नगरांतून वनवासाला जाण्याकरितां निघालेल्या रामाच्या तोंडीं एका श्लोकामध्यें घातली आहे. तो श्लोक येणेंप्रमाणें:--

स्वैरं हि पश्यन्तु कलत्रमेतद् बाष्पाकुलाक्षैर्वदनैर्भवन्तः ।
निर्दोषदृश्या हि भवन्ति नार्यो यज्ञे विवाहे व्यसने वने च ॥

या वर दिलेल्या उताऱ्यांवरून ही कल्पना मूळची भासाचीच होय, याबद्दल मुळींच शंका उरत नाहीं. मृच्छकटिकामध्यें ही कल्पना आलेली आहे, म्हणून वर सांगितलें आहे. परंतु 'मृच्छकटिक' तरी कोणाचें? 'चारुदत्त' हें नाटक लिहिणाऱ्या भासाचेंच! म्हणजे भासानें ह्या कल्पनेचा उपयोग केल्याचीं तीन स्थळें आपणापाशीं झालीं. आणि तीच कल्पना आतां जर आपल्याला प्रियदर्शिकेमध्यें चवथ्या ठिकाणीं आढळत आहे, तर ती कल्पना कोणाची असली पाहिजे? आणि तिच्याचबरोबर 'प्रियदर्शिका' ही नाटिकाही कोणाची असली पाहिजे ?

## ४ आपस्तावत्

आतांपर्यंत वर दिलेल्या निरनिराळ्या लहान लहान प्रमाणांनीं प्रियदर्शिकेच्या कर्तृत्वासंबंधानें जें सत्य आपल्या मनामध्यें उपचीयमान होऊं लागलें आहे, त्याला विशेष पुष्टि देणारें असें जें एक प्रमाण आढळतें, त्याच्याकडे आपण वळूं. संस्कृत नाटकांतून जलाच्या उल्लेखाचे प्रसंग कदाचित् कोठें आले असतील; परंतु रंगभूमीवर प्रयोग चालला असतां तेथें कोणत्या ना कोणत्या तरी ओघानें पाणी आणण्याच्या उल्लेखाचा प्रसंग संस्कृत नाटकांतून क्वचित् आढळतो. परंतु असले प्रसंग भासाच्या नाटकांमध्यें मात्र अनेक वेळां येतात. भासाचीं आतांपर्यंतचीं एकंदर तेरा नाटकें प्रसिद्ध झालीं आहेत. त्यांपैकीं सात नाटकांतून मिळून एकंदर दहा वेळां कोणाला तरी पाणी आणावयाला सांगण्यासंबंधींचें 'आपस्तावत्' हें ठराविक किंवा तसलेंच दुसरें कोणतें तरी एखादें वाक्य आलेलें आहे.

### १ मध्यमव्यायोग

( १ ) घटोत्कचः--कथमनेनापि न शक्यते हन्तुम्। किन्नु खलु करिष्ये। भवतु, दृष्टम्। अस्ति मातृप्रसादलब्धो मायापाशः। तेन बद्ध्वैनं

नेष्यामि । कुतः खल्वापः । भो गिरे, आपस्तावत् । हन्त स्रवति । ( आचम्य मंत्रं जपति )

( २ ) भीमसेनः— कथं मायापाशेन बद्धोस्मि । किमिदानीं करिष्ये । अस्ति महेश्वरप्रसादलब्धो मायापाशमोक्षो मंत्रः । तं जपामि । कुतः खल्वापः । भवतु, भो ब्राह्मणकुमार, आनय कमण्डलुगता आपः ।

## २ दूतवाक्यम्

( ३ ) सुदर्शनः— अये अयं भगवान् हस्तिनपुरद्वारे दूतसमुदाचारेणोपस्थितः । कुतः खल्वापः । कुतः खल्वापः । भगवति, आकाशगंगे, आपस्तावत् । हन्त स्रवति । ( आचम्योपसृत्य । )

## ३ अभिषेक नाटक

( ४ ) वाली— हनुमन्, आपस्तावत् ।

हनुमान्— यदाज्ञापयति महाराजः । (निष्क्रम्य प्रविश्य) इमा आपः ।

वाली-- ( आचम्य ) परित्यजन्तीव मां प्राणाः । इमा गंगाप्रभृतयो महानद्य एता उर्वश्यादयोऽप्सरसो मामभिगताः । एष सहस्रहंसप्रयुक्तो वीरवाही विमानः कालेन प्रेषितो मां नेतुमागतः । भवतु अयमहमागच्छामि ।

## ४ पंचरात्र

( ५ ) द्रोणः— पुत्र, ब्रवीमि खलु तावत् । बाष्पवेगस्तु मां बाधते ।

सर्वे— कथमाचार्योपि बाष्पमुत्सृजति ।

दुर्योधनः— कोऽत्र ।

( प्रविश्य )

भटः— जयतु महाराजः ।

दुर्योधनः— आपस्तावत् ।

भटः— यदाज्ञापयति महाराजः । ( निष्क्रम्य प्रविश्य ) जयतु महाराजः । इमा आपः ।

दुर्योधनः— आनय । ( कलशं गृहीत्वा ) । भो आचार्य अश्रुपातोच्छिष्टस्य क्रियतां शौचम् ।

## ५ स्वप्नवासवदत्त

( ६ ) विदूषकः— अश्रुपातक्लिन्नं खलु तत्रभवतो मुखम् । यावन्मुखोदकमानयामि ।

## ६ प्रतिमा नाटक

( ७ ) राजाः— आपस्तावत् ।

कांचुकीयः— यदाज्ञापयति महाराजः ( निष्क्रम्य प्रविश्य ) जयतु महाराजः । इमा आपः ।

राजा— ( आचम्यावलोक्य )

अयममरपतेः सखा दिलीपो रघुरयमत्र भवानजः पिता मे ।
किमभिगमनकारणं भवद्भिः सहवसने समयो ममापि तत्र ॥

राम ! वैदेहि ! लक्ष्मण ! अहमितः पितॄणां सकाशं गच्छामि ।

हे पितरः अयमयमागच्छामि ।

( ८ ) सीता— रुदन्तमार्यपुत्रं पुनरपि रोदयति तातः ।

रामः— मैथिलि, एष पर्यवस्थापयाम्यात्मानम् । वत्स लक्ष्मण, आपस्तावत् ।

लक्ष्मणः— यदाज्ञापयत्यार्यः ।

भरतः— आर्य, न खलु न्याय्यम् । क्रमेण शुश्रूषयिष्ये । अहमेव यास्यामि । ( कलशं गृहीत्वा निष्क्रम्य प्रविश्य ) इमा आपः ।

( ९ ) रामः— मैथिलि, पाद्यमानय भगवते ।

सीता— यदार्य आज्ञापयति । ( निष्क्रम्य प्रविश्य ) इमा आपः ।

## ७ प्रतिज्ञायौगंधरायण

( १० ) यौगंधरायणः— अहो नु खल्वत्रभवत्या राजवंशाश्रितं धीरवाक्यमभिहितम् । अत्रभवत्याः संभावनां पूजयामि । विजये, आपस्तावत् ।

प्रतीहारी— आर्य तथा । ( निष्क्रम्य प्रविश्य ) इमा आपः ।

यौगंधरायणः— आनय । ( आचम्य ) विजये किमाह तत्रभवती ।

हे जे पाणी मागण्याचे दहा प्रसंग वर दाखविले आहेत, त्यांचें

वर्गीकरण केलें असतां त्यापासून असें निष्पन्न होतें कीं, त्यांतील एका (९) प्रसंगीं पादप्रक्षालनासाठीं पाणी मागितलें आहे, दोन (४, ७) प्रसंगीं मरणसमयींच्या चित्तशुद्धीसाठीं नेत्रस्पर्श किंवा आचमन वगैरे करण्याकरितां पाणी मागितलेलें आहे, अश्रुप्रमार्जनाकरितां पाणी मागितल्याचे प्रसंग चार (५, ६, ८, १०) आहेत, आणि कांहीं तरी एखादा मंत्र वगैरे जपण्याच्या पूर्वी आचमनाकरितां म्हणून पाणी मागितल्याचे तीन (१, २, ३) प्रसंग आहेत. अशा रीतीनें कोणत्या ना कोणत्या तरी कारणासाठीं 'आपस्तावत्' चे भासाच्या तेरा उपलब्ध नाटकांपैकीं सात नाटकांमध्यें एकंदर दहा प्रसंग आलेले आहेत. यावरून भासाच्या नाटकांतील 'आपस्तावत्' हा एक संशयविरहित असा विशेष आहे, असें कोणालाही वाटल्यावांचून रहाणार नाहीं. आणि हा अनन्यसाधारण विशेष जर दुसऱ्या एखाद्या नाटकामध्यें आढळून येईल, तर तें नाटक बहुतकरून भासाचेंच असलें पाहिजे, असा कोणाचाही ग्रह झाल्यावांचून राहणार नाहीं. आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, ही पाणी मागण्याची भासाची विशेष खूण प्रियदर्शिका नाटिकेमध्येंही अगदीं अचुक दृष्टोत्पत्तीस येते. सदर नाटकाच्या चवथ्या अंकांत प्रियदर्शिका ही विषप्राशनाच्या योगानें बेशुद्ध झालेली असतां तिच्यावर प्रेम करणारा नायक वत्सराज हा नागलोकांतून जाऊन आलेला असल्यामुळें त्याला विषविद्या चांगली माहीत असल्याकारणानें त्या विद्येतील मंत्राचा प्रयोग करून प्रियदर्शिकेला सावध करावें म्हणून सर्वजण त्याची विनंति करूं लागतात, तेव्हां त्या प्रसंगीं पुढील वाक्यें आढळतात.

> राजा——सत्यमेवैतत् । (प्रियदर्शिकामालोक्य।) मूढ एवाहमेतावतीं वेलाम् । तदहमेनां जीवयामि । सलिलं सलिलम् ।
>
> विदूषकः—(निष्क्रम्य पुनः प्रविश्य) भोः एतत्सलिलम् ।

या वाक्यांत 'आपः'च्या जागीं 'सलिलम्' हा शब्द आलेला आहे, एवढाच काय तो शब्दभेद आहे. बाकी सर्व गोष्टी अगदीं तंतोतंत एकच आहेत. घटोत्कच, भीमसेन आणि सुदर्शन यांना मंत्रप्रयोगाच्या पूर्वी जशी जलाची अपेक्षा होती, तशाच प्रसंगाकरितां वत्सराजाला येथें जलाची अपेक्षा उत्पन्न झालेली आहे. पण इतकेंच नव्हे, तर (निष्क्रम्य पुनः प्रविश्य) हे रंगभूमीवरील सूचनेचे (Stage Directionचे) शब्दही अभिषेकनाटक, पंचरात्र,

प्रतिमानाटक, व प्रतिज्ञायौगंधरायण, ह्यांतल्याप्रमाणें अगदीं तेच आहेत. इतकें सादृश्य एककर्तृकत्वाशिवाय अन्यथा क्वचितच संभवूं शकेल. हें 'आपस्तावत्' चें प्रमाण इतकें संशयोच्छेदक आहे कीं, 'प्रियदर्शिका' ही दुसऱ्या कोणाची नसून वत्सराजाप्रमाणें ती फक्त एका भासाचीच असली पाहिजे, याच्याबद्दल कोणाचीही खात्री झाल्यावांचून रहाणार नाहीं.

## ५ आणखी कांहीं किरकोळ प्रमाणें

इतक्या बलवत्तर प्रमाणांनीं ही गोष्ट सिद्धप्राय झाल्यानंतर आणखी अवांतर गौण प्रमाणें देण्याची कांहीं विशेष आवश्यकता आहे, असें नाहीं. तरी पण तंतोतंत कळाशीनें अगदीं बरोबर जमलेल्या जोडाच्या सांध्याला देखील आणखी चार खिळे जास्त ठोकले, तर ते कांहीं अस्थानीं होणार नाहींत, अशा न्यायानें आणखी कांहीं सादृश्याच्या गोष्टी पुढें देण्यांत येत आहेत. (१) भासाच्या 'प्रतिज्ञायौगंधरायण' आणि 'स्वप्नवासवदत्त' या दोन नाटकांमध्यें वत्सराजासंबंधींचा ज्या स्वरूपाचा कथाभाग वर्णिलेला आहे, त्याच स्वरूपाचा कथाभाग 'प्रियदर्शिका' नाटिकेमध्यें आलेला आहे. (२) तसेंच गायन आणि वीणावादन यांच्याबद्दलचीं वर्णनें, हीही भासाची एक विशेष खूण दिसते. 'प्रतिज्ञायौगंधरायण' आणि 'स्वप्नवासवदत्त' या नाटकांतून तर ही खूण जागोजागीं स्पष्टच दिसत आहे. पण 'अविमारक' नाटकाच्याही तिसऱ्या अंकामध्यें अविमारक हा राजकन्येच्या मंदिराकडे रात्रीचा जात असतां रस्त्यांत दिसणाऱ्या निरनिराळ्या चमत्कारजनक गोष्टींच्या वर्णनाच्या ओघामध्यें भासानें गायन आणि वीणावादन यांच्यासंबंधानें पुढील अत्यंत मार्मिक असे उद्गार अविमारकाच्या तोंडीं घातले आहेतः—

अविमारकः-अये गान्धर्वध्वनिरिव श्रूयते। को नु खल्वयं सार्वकालसुखी पुरुषः कान्तया सह गान्धर्वमनुभवति। व्यक्तं स्वयं वीणां वादयति। कुतः

उच्चं हर्म्यं सन्निरुद्धाश्च जालाः तन्त्रीनादः श्रूयते सानुनादम्।
बाह्यस्थानं व्यक्तमेवं प्रयोक्तुं किं सामर्थ्यं स्त्रीकराग्रांगुलीनाम्॥

गीतं तु पुनः स्त्रियाः। इह हि

तानस्तु मन्दो विशदप्रवृत्तो जातश्च नादो मुखनासिकेन।
स्थूलोऽपि हेतुः करतालनादः सञ्जायते सद्बलयस्वनेन॥

तसेंच 'मृ छकटिका'मध्यें म्हणजे पर्यायानें भासाच्या 'चारुदत्त' नाटकामध्यें, तिसऱ्या अंकांत वीणावादन आणि गायन यांचे जे उल्लेख आलेले आहेत, ते संस्कृत वाचकांच्या पूर्ण परिचयाचे आहेतच. अशा प्रकारची ही वीणावादनाच्या आणि गायनाच्या वर्णनाची जी विशेष खूण, तीही 'प्रियदर्शिके'मध्यें तिसऱ्या अंकांत आढळून येते.

( ३ ) शिवाय आणखीही एक चमत्कारिक योगायोग घडून आलेला आढळून येतो, तो असा कीं, 'मृच्छकटिक' हें मूळचें नाटक 'चारुदत्त' या रूपानें भासकवीचें असून तें शूद्रक राजाला कोणाकडून तरी दत्तक देण्यांत आलेलें आहे, याबद्दल आतां शंका उरलेली नाहीं. येणेंप्रमाणें शूद्रक राजाच्या नांवावर विकल्या जाणाऱ्या या 'मृच्छकटिक' नाटकाप्रमाणेंच 'प्रियदर्शिका' या नाटकाचीही गोष्ट झालेली आहे. तें नाटकही कोणी तरी श्रीहर्ष राजाला दत्तक दिलेलें असून त्या दत्तविधानाबद्दल तें करणाराला कांहीं पैसेही मिळालेले असावेत, अशाबद्दल पुरावा सांपडतो. त्यावरूनही राजाला नांव बदलून दत्तक दिलेल्या 'चारुदत्ता'प्रमाणें 'प्रियदर्शिका' हें नाटकही मूळचें भासाचेंच असलें पाहिजे, असें दिसतें.

## ६ कालिदासाचें प्रमाण

हीं जीं येथपर्यंत अनेक प्रमाणें दाखविण्यांत आलेलीं आहेत, त्यांत आणखीही एका प्रमाणाची भर ( जर ती अजूनही पाहिजे असेल तर ) घालतां येण्यासारखी आहे. हें जें प्रमाण यापुढें देण्यांत येणार आहे, तें एका दृष्टीनें विशेष मनोरंजक आहे. कारण कीं, तें प्रमाण महाकवि कालिदासासंबंधाचें आहे. कालिदासासंबंधींचा आपणां सर्व लोकांचा असा ग्रह बनलेला आहे कीं, कालिदास हा प्रत्यक्ष सरस्वतीचा अवतार आहे. आणि कालिदासाच्या काव्यामध्यें इतकी विलक्षण सरसता भरलेली आहे कीं, तिला अनुलक्षून पहातां कालिदास हा सरस्वतीचा अवतार होय, असें मानण्यामध्यें यत्किंचितही अयथार्थता नाहीं. कालिदासासंबंधानें अशीही एक आख्यायिका व्याख्याकोविदांमध्यें प्रख्यात आहे कीं, रघुवंशाच्या रचनेच्या वेळीं त्या काव्याचा दररोज एक सर्ग रचून पुरा करावयाचा, असा कालि-

दासानें संकल्प केला होता. त्या क्रमाप्रमाणें पहिले चार सर्ग उत्पन्न होऊन पांचव्या दिवशीं पांचव्या सर्गांतील श्लोक रचण्याचें काम चाललें असतां रात्रीं कालिदासाला झोंप लागली. तेव्हां प्रत्यक्ष सरस्वतीनें येऊन त्या सर्गांतील शेवटले वसंततिलका वृत्तांतील श्लोक आपण स्वतः लिहून तो सर्ग पुरा केला. दुसरीही एक गोष्ट अशी सांगण्यांत येते कीं, कालिदास हा पूर्वी अगदीं वेडा होता. परंतु पुढें कालिदेवीच्या प्रसादानें त्याला कवित्वस्फूर्ति उत्पन्न झाली, आणि या गोष्टीवरूनच त्याचें कालिदास असें नांव पडलें. असल्या आख्यायिकांवरून कालिदासाची कवित्वशक्ति ही कांहीं तरी एक अपूर्व आणि दैवी प्रसादाची गोष्ट होती, असा कोणाचाही समज होणें अगदीं स्वाभाविक आहे. परंतु वास्तविक स्थिति अशी मुळींच नाहीं. ती दैवी चमत्काराच्या अगदीं उलट आहे. कालिदासाची बुद्धिमत्ता हा कांहीं एक विलक्षण दैवी चमत्कार नसून कालिदासानें ती बुद्धिमत्ता दीर्घ प्रयत्नानें आणि दृढ अभ्यासानेंच संपादन करून घेतलेली असली पाहिजे, असें मानण्याला बळकट पुरावा आहे. कोणतीही गोष्ट चांगली जुळून येण्याला ईश्वरी कृपाप्रसादाची केव्हांही अपेक्षा असते, याबद्दल वाद नाहीं. त्याप्रमाणें कालिदासाच्या बुद्धिमत्तेला ईश्वरी कृपा हें एक सामान्य कारण असलें पाहिजे, या उघड उघड सिद्ध असलेल्या गोष्टीचा प्रतिषेध करण्याची कोणाचीही इच्छा नाहीं. परंतु हें सामान्य कारण बाजूला ठेवून त्याच्या विशेष कारणांचा जेव्हां आपण विचार करूं लागतों, तेव्हां आपल्याला असें आढळून येतें कीं, कालिदासावर कोणत्याही देवीची किंवा देवतेची दैवी कृपा वगैरे कांहीं एक नसून मानवी दीर्घ प्रयत्नांची मात्र त्याच्यावर पूर्ण कृपा असली पाहिजे. कालिदास हा जो एवढा अत्युत्कृष्ट कवि झाला, त्याच्यामध्यें निसर्गजन्य कवित्वप्रतिभा तर मूळची अद्वितीय असलीच पाहिजे; परंतु

> शक्तिर्निपुणता लोकशास्त्रकाव्याद्यवेक्षणात् ।
> काव्यज्ञशिक्षयाभ्यास इति हेतुस्तदुद्भवे ॥

या कारिकेमध्यें मम्मटानें सांगितल्याप्रमाणें 'काव्याद्यवेक्षण' आणि काव्यज्ञ-शिक्षयाभ्यास' हीं जीं काव्यस्फूर्तीचीं साधनें, त्यांचाही कालिदासानें दृढ-

तर अवलंब केलेला असला पाहिजे, हें हल्लीं नवीन नवीन उपलब्ध झालेल्या प्रमाणांवरून व्यक्त होत आहे. कालिदासाच्या काव्यांतील ज्या सुंदर कल्पनांनीं संस्कृत वाचकांचीं मनें तल्लीन होऊन जातात, त्या सुंदर कल्पना कालिदासाच्या मनामध्यें कशा उत्पन्न झाल्या, याविषयींच्या शोधाचें काम स्वाभाविकपणेंच फार हृदयंगम आहे. एखादा पुष्पांचा समग्र हार फार रमणीय दिसतो. परंतु तो समग्र हार कांहीं एकदम निर्माण झालेला नसतो. तो गुंफणाराला त्यांतील प्रत्येक फूल निरनिराळ्या लतावृक्षांपासून निवडून आणि वेंचून आणावें लागतें. परिपक्व आणि परिपूर्ण झालेलें मधाचें पोळें अत्यंत मधुर असतें खरें; परंतु तें तयार करणाऱ्या भ्रमरांना अनेक फुलांच्याभोंवतीं घिरट्या घालाव्या लागतात, आणि त्यांतील एकेक मधुबिंदु घेऊन त्याचा संचय करावा लागतो. तशीच कालिदासाच्या काव्याची आणि कालिदासाची गोष्ट झालेली आहे. कालिदासाचें काव्य एखाद्या पुष्पहाराप्रमाणें अत्यंत परिमलास्वादयुक्त आणि एखाद्या मधुकोशाप्रमाणें अत्यंत माधुर्ययुक्त आहे, यांत शंका नाहीं; परंतु तें काव्य कांहीं एकदम नुसत्या स्फूर्तीनें तसें झालेलें नाहीं. मालाकाराप्रमाणें किंवा मधुकराप्रमाणें कालिदासालाही दुसऱ्या पूर्व कवींच्या काव्यांच्या लताकुंजामध्यें तेथील काव्यकल्पनाचीं सुंदर फुलें वेंचण्याकरितां अनेक वेळां खेपा घालाव्या लागल्या असतील, आणि त्या फुलांतील रसांचे कण गोळा करण्याकरितां त्याला त्या फुलाच्या भोंवतीं अनेक वेळां घिरट्या घालाव्या लागल्या असतील. दुसऱ्याच्या काव्यामध्यें काय चांगल्या कल्पना आहेत त्या पहावयाच्या, आणि त्या आपल्या हृत्पटलावर लिहून ठेवून आपल्या काव्यामध्यें तसा प्रसंग आला असतां त्यांचा उपयोग करून आपल्याही काव्यामध्यें पूर्व कवींच्या काव्याप्रमाणें सौंदर्य उत्पन्न करावयाचें, हा जो काव्याद्यवेक्षणाच्या अभ्यासाचा जिज्ञासु विद्यार्थ्यांचा मार्ग, त्याच मार्गानें महाकवि कालिदासासारखे महात्मे प्रथमतः जाऊन मग अखेरीस ते कविकुलगुरुत्वाच्या कैलासशिखराला पोंहोचलेले आहेत. हा देखावा पाहिला, म्हणजे दीर्घ अभ्यासाच्या विलक्षण सामर्थ्यासंबंधानें कोणीही आश्चर्यचकित झाल्यावांचून राहणार नाहीं!

कालिदासाच्या मालविकाग्निमित्र नामक नाटकाच्या प्रस्तावनेमध्यें पुढील वाक्य आहे.

पारिपार्श्वकः—भाव, तावत् प्रथितयशसां भाससौमिल्लकविपुत्रादीनां प्रबन्धानतिक्रम्य वर्तमानकवेः कालिदासस्य क्रियायां कथं परिषदो बहुमानः।

यांत कालिदासानें भासाचा उल्लेख केलेला असल्यामुळें कालिदासाच्या पूर्वी भास होऊन गेला असल्याचें स्पष्ट आहे. या भास कवीबद्दल इतके दिवसपर्यंत कोणाला कांहीं फारशी माहिती नव्हती. परंतु हल्लीं त्याचीं तेरा नाटकें प्रसिद्ध झालेलीं आहेत. आणि त्यांवरून कालिदासाच्या काव्याद्यवेक्षणाच्या अभ्यासाच्या पद्धतीवर एक प्रकारचा विशेष प्रकाश पडलेला आहे. भास आणि कालिदास यांच्या काव्याच्या अन्योन्यतुलनेवरून असें दिसून येतें कीं, कालिदासानें भासाच्या नाटकांचें फार दृढतर परिशीलन केलेलें असावें. भासाच्या नाटकांतील अनेक चांगल्या कल्पना कालिदासाच्या मनामध्यें दीर्घ अभ्यासानें इतक्या दृढ आणि बद्धमूल होऊन गेलेल्या असल्या पाहिजेत कीं, त्या मूळच्या भासाच्या कल्पना कालिदासाच्या काव्यामधून कालिदासाला न कळतही अनेक वेळां शिरलेल्या असाव्यात. कालिदासाच्या मनामध्यें त्यांना इतका आपलेपणा उत्पन्न झालेला असावा कीं, ह्या दुसऱ्याच्या कल्पना आपल्या नाटकांमधून येत आहेत, याची कल्पनाही कदाचित् कालिदासाला आलेली नसेल. परंतु हल्लीं आपण या दोघांच्या नाटकांचें परीक्षण करूं लागलों असतां कालिदासानें आपल्या कांहीं चांगल्या कल्पना कोठून घेतल्या आहेत, आणि भासाच्या कांहीं चांगल्या कल्पना कालिदासाच्या नाटकांमध्यें कशा अनुस्यूत झालेल्या आहेत, हें आपल्याला चांगलें दिसून येतें. त्रिवेंद्रम येथील पंडित गणपतिशास्त्री यांनीं स्वप्नवासवदत्त आणि प्रतिमानाटक या दोन नाटकांच्या प्रस्तावनेमध्यें या विषयाबद्दलची कित्येक सादृश्यदर्शक उदाहरणें दिलेलीं आहेत. त्यांचें वाचन— मोठे कविही कशा लहान लहान उपायांनीं बनले जातात हें दाखविण्याच्या कामीं— फार उपयोगी असल्याकारणानें तीं व दुसरींही कित्येक भासाच्या व कालिदासाच्या काव्यांतील सादृश्यदर्शक उदाहरणें पुढें देण्यांत येत आहेत.

# भास आणि कालिदास यांच्यामधील साम्यसमालोचन

| भास | कालिदास |
| --- | --- |
| १ यस्यां न प्रियमण्डनापि महिषी देवस्य मन्दोदरी स्नेहाल्लुम्पति पल्लवान् न च पुनर्वीजन्ति यस्यां भयात्। वीजन्तो मलयानिला अपि करैरस्पृष्टबालद्रुमा सेयं शक्ररिपोरशोकवनिका भग्नेति विज्ञाप्यताम् ॥ अभिषेक–अंक ४ | १ पातुं न प्रथमं व्यवस्यति जलं युष्मास्वपीतेषु या नादत्ते प्रियमंडनापि भवतां स्नेहेन या पल्लवम् । आद्ये वः कुसुमप्रसूतिसमये यस्या भवत्युत्सवः सेयं याति शकुंतला पतिगृहं सर्वैरनुज्ञायताम् ॥ शा. अक ४ |
| २ विस्रब्ध हरिणाश्चरंत्यचकिता देशागतप्रत्ययाः । स्वप्नवा. अंक १ | २ विश्वासोपगमादभिन्नगतयः शब्दे सहन्ते मृगाः । शा. अंक १ |
| ३ सर्वशोभनं सुरूपं नाम । प्रतिमा–अंक १ | ३ किमिव हि मधुराणां मंडन नाकृतीनाम् । शा. १ |
| ४ योऽस्याः करः श्राम्यति दर्पणेऽपि स नैति खेदं कलशं वहन्त्याः । कष्टं वनं स्त्रीजनसौकुमार्यं समं लताभिः कठिनीकरोति ॥ प्रतिमा. ५ | ४ इदं किलाव्याजमनोहरं वपुस्तपः क्षमं साधयितुं य इच्छति । ध्रुवं स नीलोत्पलपत्रधारया शमीलतां छेत्तुमृषिर्व्यवस्यति ॥ शा. १ |
| ५ आपृच्छ पुत्रकृतकान् हरिणान् द्रुमांश्च विंध्यं वनं तव सखीर्दयिता लताश्च । प्रतिमा. ५ | ५ आपृच्छस्व प्रियसखममु । मेघ. १२ सोऽयं न पुत्रकृतकः पदवीं मृगस्ते जहाति । शा. ४ |
| ६ अप्युपलभ्यतेऽस्य सप्तपर्णस्याधस्ताच्छुक्लत्रासस्तं भरतं दृष्ट्वा परित्रस्तं मृगयूथमासीत् । प्रतिमा. ७ | ६ तत्क्षणे स मे पुत्रकृतको दीर्घापांगो नाम हरिणपोतक उपस्थितः । त्वयायं तावत्प्रथमं पिबत्वित्यनुकंपि- |

नोपच्छन्दित उदकेन । न पुनस्तेऽपरिचयाद्धस्ताभ्यासमुपगतः । पश्चात्तस्मिन्नेव मया गृहीते सलिले अनेन कृतः प्रणयः । तदा त्वमित्थं प्रहसितोऽसि । सर्वः सगंधेषु विश्वसिति द्वावप्यत्रारण्यकाविति । शा. ५

७ न खलु न खलूत्सारणा कार्या । पश्य । परिहरतु भवान्नृपापवादं न परुषमाश्रमवासिषु प्रयोज्यम् । नगरपरिभवान् विमोक्तुमेते वनमभिगम्य मनस्विनो वसन्ति ॥

स्वप्न. १

७ यथा च सैनिकास्तपोवनं दूरादेव परिहरंति तथा निषेद्धव्याः । पश्य । शमप्रधानेषु तपोधनेषु गूढं हि दाहात्मकमस्ति तेजः । स्पर्शानुकूला इव सूर्यकांतास्तदन्यतेजोऽभिभवाद्वमंति ॥

शा. २

८ श्रुतिसुखनिनदे कथं नु देव्याः स्तनयुगले जघनस्थले च सुप्ता । विहगगणरजोविकीर्णदंडा प्रतिभयमध्यूषितास्यरण्यवासम् ॥ स्वप्न. ६

८ तव सुचरितमंगुलीय नूनं प्रतनु ममेव विभाव्यते फलेन । अरुणनखमनोहरासु तस्याः च्युतमसि लब्धपदं यदंगुलीषु ॥ शा. ६

९ कालक्रमेण जगतः परिवर्तमाना चक्रारपंक्तिरिव गच्छति भाग्यपंक्तिः ।

स्वप्न. १

९ कस्यात्यंतं सुखमुपनतं दुःखमेकान्ततो वा नीचैर्गच्छत्युपरि च दशाचक्रनेमिक्रमेण । मेघ. १११

येथपर्यंत दिलेलीं हीं सादृश्यदर्शक उदाहरणें टी. गणपतिशास्त्री यांच्या प्रस्तावनेंतील आहेत. परंतु यांच्याशिवाय आणखीही कित्येक दुसरीं उदाहरणें सांपडतात. त्यांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेत.

१० यातः कृतार्थगणनामहमद्य लोके राजेंद्रमौलिमणिरंजितपादपीठः । विप्रेंद्रपादरजसा तु पवित्रमौलिः कर्णो भवन्तमहमेत्र नमस्करोमि ॥

कर्णभार.

१० सामंतमौलिमणिरंजितपादपीठमेकातपत्रमवनेर्न तथा प्रभुत्वम् । अस्याः सखे चरणयोरहमद्य कांतमाज्ञाकरत्वमधिगम्य यथा कृतार्थः ॥

विक्रमो. ३

११ ज्याघातप्रचितकिणोल्बणप्रकोष्ठः। अवि. १

११ ज्ञास्यसि कियद्भुजो मे रक्षति मौर्वीकिणांक इति ॥ शा. १

अनतिलुलितज्याघातांकं मुहुर्मणिबंधनात्। शा. ३

१२ संघचारिणोऽनर्थाः। अवि. २

१२ अये परावृत्तभागधेयानां दुःखं दुःखानुबंधि। विक्रमो. ४

१३ अभितस्तपोवनेन भवितव्यम्। तथाहि।

विस्रब्धं हरिणाश्चरंत्यचकिता देशागतप्रत्यया वृक्षाः पुष्पफलैः समृद्धविभवा सर्वे दयारक्षिताः। भूयिष्ठं कपिलानि गोकुलधनान्यक्षेत्रवत्यो दिशो निःसंदिग्धमिदं तपोवनमयं धूमो हि बह्वाश्रयः ॥ स्वप्न. १

१३ सूत अकथितोऽपि ज्ञायत एव यथायमाभोगस्ततोवनस्येति। किं न पश्यति भवान्। इह हि

विश्वासोपगमादभिन्नगतयः शब्दं सहन्ते मृगाः। शा. १

१४ भरतः—( रथवेगं निरूप्य ) अहो नु खलु रथवेगः। एते ते

द्रुमा धावंतीव द्रुतरथगतिक्षीणविषया नदीवोद्वृत्तांबुर्निपतति मही नेमिविवरे। अरव्यक्तिर्नष्टा स्थितमिव जवाच्चक्रवलयं रजश्चाश्वोद्धूतं पतति पुरतो नानुपतति ॥ प्रतिमा. ३

१४ अग्रे यांति रथस्य रेणुपदवीं चूर्णीभवन्तो घनाश्चक्रभ्रांतिररांतरेषु जनयत्यन्यामिवारावलीं। चित्रारंभविनिश्चलं हरिशिरस्यायामवच्चामरं यन्मध्ये समवस्थितो ध्वजपटः प्रांते च वेगानिलात्।

आणि—यदा लोके सूक्ष्मं इत्यादि, शा. १

१५ राजा—बाढम्। प्रथमः कल्पः। स्वप्न. ४

याशिवाय ऊरुभंग, मध्यमव्यायोग, पंचरात्र, बालचरित, अभिषेक, आणि अविमारक, या नाटकांतूनही हाच प्रयोग आलेला आढळतो.

१५ गणदासः— प्रथमः कल्पः। मालविका १

मातलिः— प्रथमः कल्पः। शा. ७

| | |
|---|---|
| १६ कन्याया वरसंपत्तिः पितुःप्रायः प्रयत्नतः । भाग्येषु शेषमायत्तं दृष्टपूर्वे न चान्यथा ॥ प्रतिज्ञा. २ | १६ भाग्यायत्तमतः परं न खलु तद्वाच्यं वधूबंधुभिः । शा. ४ |
| १७ काष्ठादग्निर्जायते मथ्यमानात् । प्रतिज्ञा. १ | १७ ज्वलति चलितेंधनोऽग्निः । शा. ६ |
| १८ आकर्ण्य स्वरमस्य धीरमधुरं चित्रार्पितांगा इव । उत्कर्णस्तिमितांचिताक्षिवलितग्रीवार्पिताग्राननास्तिष्ठन्त्यस्ववशांगयष्टि सहसा यान्तो मभैते हयाः ॥ कर्णभार. | १८ चित्रार्पितारंभ इवावतस्थे । रघु. २-३१ आणि—चित्रन्यस्ताभिवाचलम् । विक्र. १ |
| १९ अहं हि दुःखमत्यंतमसह्यं ज्वलनोपमम् । नैव सोढुं न संहर्तुं शक्नोमि मुषितेंद्रियः ॥ प्रतिमा. २ | १९ न च खलु परिभोक्तुं नैव शक्नोमि हातुम् । शा. ५ |
| २० बाष्पस्तंभितकंठत्वादनुक्त्वैव वनं गतः । प्रतिमा. २ | २० कंठस्तंभितबाष्पवृत्तिकलुषं चिंताजडं दर्शनम् । शा. ४ |
| २१ पंचेषुर्मदनो यदा कथमयं षष्ठः शरः पातितः । स्वप्न. ४ | २१ पथिकजनयुवतिलक्ष्यः पंचाभ्यधिकः शरो भव । शा. ६ |

## रघुवंशांतील वंशावळ आणि प्रतिमा नाटकांतील वंशावळ यांचें समानत्व

२२. भास आणि कालिदास यांच्यांतील जीं एकवीस साम्यस्थळें वर दिलेलीं आहेत, त्यांच्यापेक्षां विशेष विलक्षण अशी एक साम्याची गोष्ट या दोन कवींमध्यें दृष्टोत्पत्तीस येते. पूर्वी रा. रा. सी. के. दामले, माजी संपादक, राष्ट्रमत, हे राष्ट्रोदय या नांवाचें जें एक मासिक पुस्तक काढीत असत, त्याच्या १९१० च्या जानेवारीच्या अंकामध्यें 'रघुवंशाविषयीं कांहीं विचार' या विषयावर एक लेख प्रसिद्ध करण्यांत आलेल्या असून त्यांत रघुवंशांतील वंशावळ ही रामायणांतील किंवा कोणत्याही पुराणांतील

राजांच्या पूर्ववंशावळीशीं कशी जमत नाहीं, हें साविस्तर रीतीनें दाखवून ती कालिदासानें कोणत्या आधारावरून घेतलेली असावी, अशाविषयीं पृच्छा करण्यांत आलेली होती. त्या प्रश्नावर हल्लीं प्रसिद्ध झालेल्या भासाच्या प्रतिमा नाटकाच्या योगानें कांहीं थोडासा प्रकाश पडला आहे. दिलीप, रघु, अज, दशरथ आणि राम, ही जी कालिदासाची रघुवंशांतील परंपरा, ती अगदीं जशीच्या तशी— आणि अगदीं त्याच पौर्वापर्यक्रमानें- भासाच्या प्रतिमा नाटकामध्यें चार वेळां आढळून येते.

( १ ) आसन्नमरण झालेल्या दशरथाला दुसऱ्या अंकाचे शेवटीं त्याचे पितर दिसतात, तेव्हां त्यांचें वर्णन पुढील श्लोकांत येणेंप्रमाणें केलेलें आहेः—

अयममरपतेः सखा दिलीपो रघुरयमत्रभवानजः पिता मे ।
किमभिगमनकारणं भवद्भिः सह वसने समयो ममापि तत्र ॥

( २ ) पुढें तिसऱ्या अंकांत भरत आपल्या मातुलाच्या नगराहून अयोध्येला परत येत असतां अयोध्येजवळ त्याला एक प्रतिमागृह दिसतें. त्यामध्यें दिलीप, रघु, अज, आणि दशरथ, हा चार इक्ष्वाकुवंशांतील मृतराजांच्या प्रतिमा त्याला आढळतात. या कोणाच्या प्रतिमा आहेत, असें भरत तेथील रक्षण करणाऱ्या देवकुलिकाला विचारतो. तेव्हां तो क्रमानें त्यांचें येणेंप्रमाणें वर्णन करतोः—

देवकुलिकः— अयं खलु तावत् सन्निहितसर्वरत्नस्य विश्वजितो यज्ञस्य प्रवर्तयिता प्रज्वलितधर्मप्रदीपो दिलीपः ।

अयं खलु तावत् संवेशनोत्थापनयोरनेकब्राह्मणजनसहस्रप्रयुक्तपुण्याहशब्दरवो रघुः ।

अयं खलु तावत् प्रियावियोगनिर्वेदपरित्यक्तराज्यभारो नित्यावभृथस्नानप्रशांतरजा अजः ।

देवकुलिकः— अयं दिलीपः ।

भरतः— पितृपितामहो महाराजस्य । ततस्ततः ।

देवकुलिकः— अत्रभवान् रघुः ।

भरतः— पिता तातस्य ।

( ३ ) त्यानंतर चवथ्या अंकांत सुमंत्र पूर्वजवर्णनपूर्वक भरताचें वर्णन येणेंप्रमाणें दोन ठिकाणीं करतोः--

दैत्येन्द्रमानमथनस्य नृपस्य पुत्रो यज्ञोपयुक्तविभवस्य नृपस्य पौत्रः ।
भ्राता पितुः प्रियकरस्य जगत्प्रियस्य रामस्य रामसदृशेन पथा प्रयाति ॥

( ४ ) रघोश्चतुर्थोऽयमजात् तृतीयः पितुः प्रकाशस्य तव द्वितीयः ।
यस्यानुजस्त्वं स्वकुलस्य केतोस्तस्यानुजोऽयं भरतः कुमारः ॥

या सगळ्या उताऱ्यांवरून दिलीप, रघु, अज आणि दशरथ, असाच भासाच्याही वंशावळीचा क्रम होता, हें स्पष्ट होत आहे. आणि त्या भासाच्या क्रमाला अनुसरूनच कालिदासानेंही आपल्या रघुवंशाच्या वंशावळीचा क्रम स्वीकारलेला होता, हें उघड आहे. आतां कालिदासानें भासापासून जशा इतर पुष्कळ गोष्टी घेतल्या आहेत, त्याचप्रमाणें हा क्रमही त्यानें भासापासून घेतला आहे, हें जरी निर्विवाद आहे, तरी पण भासानें तरी हा क्रम कोठून घेतला, हा प्रश्न शिल्लक राहतो. हा क्रम कोठल्याही पुराणांतल्या क्रमाशीं जुळत नाहीं, हें वर सांगितलेल्या राष्ट्रोदयांतील लेखामध्यें दाखविण्यांत आलेलें आहे. त्यांत उल्लेखिलेल्या पुराणग्रंथांशिवाय रामायणाची गोष्ट निराळ्या रीतीनें ज्यांत वर्णिलेली आहे, असे कित्येक प्रबंध आहेत. बौद्धांच्या जातककथांमध्यें दशरथ ज्ञातकाची एक गोष्ट आहे, व जैनांचेंही एक रामायण पद्मपुराण ह्या नांवानें प्रसिद्ध आहे. तसेंच कथासरित्सागरांतील आठव्या लम्बकाच्या प्रारंभींच रामचरित्राची एक हकीकत आहे. बौद्धांचें आणि जैनांचें रामचरित्र व रामायणांतील रामचरित्र यांच्यामध्यें जमीन अस्मानाचें अंतर आहे, आणि तें तसें असलें तर त्यांत कांहीं मोठेंसें आश्चर्य आहे, असेंही नाहीं. परंतु कथासरित्सागरांतील रामचरित्रामध्येंही कांहीं भिन्नता आहे. लव आणि कुश यांपैकीं कुश हा वाल्मीकीनें कुशांपासून म्हणजे दर्भांपासून उत्पन्न केल्याची कथा यांत आहे. परंतु या तिन्ही ठिकाणीं इतकी भिन्नता असूनही त्यांत सुद्धां हा वंशावळीचा भिन्न क्रम कोठेंही आढळून येत नाहीं. मग भासानें हा क्रम कोणत्या आधारावरून घेतलेला असेल तो असो. रामचरित्रावरील 'अभिषेक नाटक' आणि 'प्रतिमा नाटक' हीं नाटकें लिहीत असतांना भासानें वाल्मीकि रामायणाचें

परिशीलन केलेलें असलें पाहिजे, असें ह्या दोन नाटकांतील अंतर्गत प्रमाणांवरून दिसून येतें.

## भासाचा वाल्मीकिरामायणविषयक परिचय

( १ ) अभिषेक नाटकामध्यें पहिल्या अंकांत वालिवधाच्या संबंधानें पुढील श्लोक आलेला आहे.

वागुराच्छन्नमाश्रित्य मृगाणामिष्यते वधः ।
वध्यत्वाच्च मृगत्वाच्च भवाञ्च्छन्नेन दण्डितः ॥

आणि वाल्मीकिरामायणाच्या किष्किंधाकाण्डामध्यें याच प्रश्नाला अनुलक्षून पुढील श्लोक आलेले आहेत.

वागुराभिश्च पाशैश्च कूटैश्च विविधैर्नराः ।
प्रतिच्छन्नाश्च दृश्याश्च गृह्णन्ति सुबहून्मृगान् ।
प्रधावितान्वा वित्रस्तान् विस्रब्धानतिविष्ठितान् ॥
प्रमत्तानप्रमत्तान्वा नरा मांसाशिनो भृशम् ।
विध्यंति विमुखांश्चापि न च दोषोऽत्र विद्यते ॥ सर्ग १८.

या दोघांच्या तुलनेवरून वाल्मीकिरामायणामधूनच ही वालिवधाच्या निर्दोषतेची सप्रमाणता भासानें घेतलेली असावी, असें उघड दिसतें.

( २ ) अशीं आणखीही कांहीं बारीकसारीक स्थळें अभिषेक नाटकांत सांपडतात. परंतु असलीं स्थळें प्रतिमा नाटकांमध्यें याहूनही जास्त आहेत.

गोपहीना यथा गावो विलयं यान्त्यपालिताः ।
एवं नृपतिहीना हि विलयं यान्ति वै प्रजाः ॥

हा प्रतिमा नाटकाच्या तिसऱ्या अंकांतील श्लोक आणि

यथा ह्यपालाः पशवो यथा सेना ह्यनायका ।
यथा चंद्रं विना रात्रिर्यथा गावो विना वृषम् ।
एवं हि भविता राष्ट्रं यत्र राजा न दृश्यते ॥

अयोध्या १५-५४-५.

किंवा

अगोपाला यथा गावस्तथा राष्ट्रमराजकम् ।

अयोध्या ६७-२९.

हे श्लोक यांच्यामध्यें शब्दसाम्य आणि अर्थसाम्य इतकें आहे कीं, भासानें आपला अराजकाच्या परिणामाचा श्लोक वाल्मीकिरामायणांतील वर दिलेल्या श्लोकांना अनुसरूनच लिहिलेला असला पाहिजे, याबद्दल कोणालाही शंका उरण्याचें कारण नाहीं.

( ३ ) भासाच्या प्रतिमा नाटकामध्यें आणखी एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते. ती अशीः— भरताकरितां कैकेयीनें जें राज्य मागितलें, त्याच्याबद्दलचें कारण असें कीं, कैकेयीपासून जो मुलगा होईल, त्याला मी आपलें राज्य देईन, अशी राज्यशुल्काची कबुली दशरथ राजानें दिलेली होती. या शुल्काच्या कल्पनेचा भासानें प्रतिमा नाटकांत पुष्कळ वेळां उपयोग केलेला आहे. देवासुरसंग्रामांत कैकेयीनें दशरथाला जें साहाय्य केलें, त्याबद्दल प्रसन्न होऊन त्यानें तिला वर दिला होता आणि त्या वराच्या अनुरोधानें तिनें भरताकरितां राज्य मागितलें ही जी नेहमींची सामान्य गोष्ट, ती फारशी पुढें न आणतां भासानें ह्या नाटकांत जागोजागीं शुल्काच्या कल्पनेलाच प्राधान्य दिलेलें आहे. यांपैकीं वराची गोष्ट तर रामायणामध्यें आहेच, परंतु या राजशुल्काच्या कल्पनेचाही उल्लेख वाल्मीकिरामायणामध्यें एके ठिकाणीं सांपडतो.

पुरा भ्रातः पिता नः स मातरं ते समुद्वहन् ।
मातामहे समाश्रौषीद्राज्यशुल्कमनुत्तमम् ॥

अयोध्या १०७-३०.

या श्लोकांत शुल्काचा उल्लेख स्पष्ट आहे. व मी कैकेयीच्या मुलाला राज्य देईन असा कैकेयीचें पाणिग्रहण करते वेळीं दशरथानें राज्यशुल्काचा करार केलेला असला पाहिजे, असें दुसऱ्याही एका प्रमाणावरून दिसतें. कैकेयीशीं लग्न केल्यानंतर कौसल्या, सुमित्रा व कैकेयी यांना राम, लक्ष्मण, शत्रुघ्न व भरत असे पुत्र झाले असतां, त्यांपैकीं राम हा सर्वांत ज्येष्ठ आणि जास्त आवडता असल्याकारणानें त्यालाच यौवराज्याभिषेक करावा अशी दशरथाच्या मनामध्यें स्वाभाविकपणें इच्छा उत्पन्न होऊन त्यानें रामाला युवराजपद देण्याचा निश्चय केला. यासंबंधाचे अयोध्याकांडाच्या चवथ्या सर्गांत दशरथाच्या भाषणाचे जे श्लोक आहेत, त्यांत—

विप्रोषितश्च भरतो यावदेव पुरादिह ।
तावदेवाभिषेकस्ते प्राप्तकालो मतो मम ॥

असा एक श्लोक आलेला आहे. पण दशरथानें असें म्हणण्याचें कारण काय? वास्तविक राम हा ज्येष्ठ असल्यामुळें यौवराज्याला तो अधिकारीच होता. त्याच्या अभिषेकसमारम्भाच्या वेळीं त्याच्या बांधवादिकांना मुद्दाम बोलावून आणवावयाचें, असा प्रसंग असतां 'भरत ह्या ठिकाणीं नाहीं तोंपर्यंतच तुझा राज्याभिषेक मला उरकून घेऊं दे,' असें दशरथ, रामाला काय म्हणून म्हणतो? यावरून कैकेयीच्या मुलाला राज्य देण्याचा राज्यशुल्काचा करार झालेला असून तो मोडून आतां रामाला राज्य देण्याचा दशरथाचा विचार असला पाहिजे, असें दिसतें. यावरून तात्पर्य एवढें निश्चित होतें कीं, राज्यशुल्काचा करार प्रथमतः झालेला असला पाहिजे. व त्या राज्यशुल्काच्या कल्पनेवरच भासानें आपली बरीचशी भिस्त प्रतिमा नाटकामध्यें ठेविलेली आहे.

या वर दिलेल्या उल्लेखांवरून भास हा वाल्मीकिरामायणाचा उपयोग करीत असला पाहिजे असें दिसतें. पण असें असूनही त्यानें दिलीप, रघु, अज, ह्या वंशावळीचा क्रम वाल्मीकिरामायणांतल्या क्रमाहून अगदीं भिन्न असा घेतला आहे. आतां तो त्यानें कोठून घेतला आहे, हें जरी अद्यापि निश्चित करितां येत नाहीं, तरी कालिदासानें मात्र हा क्रम भासापासून घेतला आहे, हें अगदीं स्पष्टपणें निश्चित होत आहे.

हीं जीं कालिदासानें भासामधून आपल्या कल्पना उचलून घेतल्याचीं एकंदर बावीस उदाहरणें येथपर्यंत दाखविण्यांत आलेलीं आहेत, त्यांवरून सामान्यतः असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं, कालिदास हा भासाचें अनुकरण करीत असतो. तेव्हां या पूर्वपरामर्शापासून आपल्याला प्रस्तुतच्या 'प्रियदर्शिके'च्या कर्तृत्वासंबंधानें निश्चय करण्याला कांहीं मदत होते कीं काय, या प्रश्नाचा आतां आपण विचार करूं. भास आणि कालिदास यांच्यामधील साम्यसमालोचन, प्रतिमा नाटकांतील वंशावळ आणि रघुवंशांतील वंशावळ यांचें समानत्व, भासाचें वाल्मीकिरामायणविषयक परिशीलन, इत्यादि कित्येक प्रश्न मध्यंतरीं उपस्थित होऊन त्यांच्याकडे वळणें प्राप्त झाल्याकारणानें जरी थोडें विषयांतर झालें आहे, तरी तें विषयांतर प्रस्तुत

विषयाला उपकारक आणि आवश्यक असेंच असल्यामुळें झालेलें आहे, हें 'प्रियदर्यिका' नाटकाच्या कर्तृत्वासंबंधानें यापुढें जें मनोरंजक प्रमाण प्रतिपादित करण्यांत येणार आहे, यावरून कोणाच्याही लक्षांत येईल.

## प्रियदर्शिका आणि कालिदास यांच्यामधील साम्य

एखाद्या ग्रंथामध्यें कांहीं कल्पनासाम्य आढळलें, म्हणजे तें नमूद करून ठेवण्याची टीकाकारांची पद्धति आहे, त्याचप्रमाणें 'प्रियदर्शिका' नाटकावर आतांपर्यंत ज्यांनीं संस्कृतमध्यें किंवा इंग्रजीमध्यें टीका आणि टिप्पण्या लिहिल्या आहेत त्यांनींही या पद्धतीचा अंगीकार केलेला असल्याचें आढळून येतें आणि त्यावरून 'प्रियदर्शिका' नाटकामध्यें कालिदासाच्या कृतीचें साम्य असल्याचें फार वेळां दिसून येतें. त्या साम्याचें तुलनात्मक कोष्टक वाचकांच्या पुढें येथें आधीं सादर करून नंतर मग त्यासंबंधाचें आपण विशेष विवेचन करूं.

| प्रियदर्शिका | कालिदास |
| --- | --- |
| १ अरण्यका—( भ्रमरसंबाधं नाटयन्ती ) हा धिक् हा धिक् । एते खल्वपरे परित्यज्य कमलिनीं निलोत्पलवनानि समापतन्तो निपुणतरं बाधमाना आयासयन्ति मां दुष्टमधुकराः। हला इन्दीवरिके, परित्रायस्व मां परित्रायस्व माम्। एते दुष्टमधुकराः परिभविष्यन्ति। इन्दीवरिके, लघूपसर्प। लघूपसर्प। आकुलीकृतास्मि दुष्टमधुकरैः अंक २ | १ शकुन्तला—( ससंभ्रमं ) अम्मो सलिलसेकसंभ्रमान्नवमालिकामुज्झित्वा वदनं मे मधुकरोऽभिवर्तते। ( भ्रमर बाधां निरूपयति ) न एष दुष्टो विरमति। अन्यतो गमिष्यामि। कथमितोप्यागच्छति। हला परित्रायेथां मामेतेन दुर्विनीतेन मधुकरेण अभिभूयमानाम्। शा० १ |
| २ विदूषकः—भवति, सकलपृथ्वीपरित्राणसमर्थेन वत्सराजेन परित्रायमाणा चेटीमिदीवरिकामाक्रन्दसि। अंक २ | २ शकुन्तलाः—हला अशरणास्मि। अन्यतरा युवयोरागच्छतु। उभे—पृथिव्या यः शरणं स तव समीपे वर्तते। शा० ३ |

३ राजा—कथं गता। सखे वसन्तक, न खल्वविघ्नमभिलषितमधन्यैः प्राप्यते। अंक २

३ अहो विघ्नवत्यः खलु प्रार्थितार्थसिद्धयः।

४ मनोरमा—आज्ञप्तास्मि देव्या वासवदत्तया—"हंजे मनोरमे, यः स सांकृत्यायन्यार्यपुत्रस्य मम च वृत्तान्तो नाटकोपानिबद्धः तस्य नर्तितव्यशेषमद्य युष्माभिः कौमुदीमहोत्सवे नर्तितव्यम्" इति। ह्यः खल्वारण्यकया प्रियसख्या शून्यहृदययान्यथैव नर्तितम्। अद्य पुनर्वासवदत्ताभूमिकया तया यदि तथा क्रियते ततोऽवश्यं देवी कोपिष्यति। अंक ३

४ प्रियं०-ननूटजसंनिहिता शकुंतला।
अनसूया—अद्य पुनर्हृदयेनासंहिता।
प्रियंवदा—हा धिक् हा धिक् कस्मिन्नपि पूजार्हेऽपराद्धा शून्यहृदया शकुंतला। शा. ४

आणि, विक्रमोर्वशीय नाटकाच्या तिसऱ्या अंकाच्या आरंभींच्या विष्कंभकांतील 'लक्ष्मीस्वयंवर' नाटकाचा प्रयोग व त्यांतील उर्वशीची चुकी यांबद्दलचें वर्णन.

५ आरण्यका—कस्मै तावदेतं वृत्तांतं निवेद्य सह्यवेदनमिव दुःखं करिष्यामि। अंक ३

५ संविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति शा. ३

६ आरण्यका—अयं सखीजनः पक्षपातेन मन्त्रयते। अयि सखि पक्षपातिनि, देवीगुणनिगलनिबद्धे खलु तस्मिन् जने कुत एतत्।
मनोरमा—हला अपण्डिते, कमलिनीबद्धानुरागोपि मधुकरो मालतीं प्रेक्ष्याभिनवरसास्वादलंपटः कुतस्तामनासाद्य स्थितिं करोति। अंक ३

६ हला, देवीं चिन्तयित्वा न मे हृदयं विश्वसिति।
मुग्धे भ्रमरसंबाध इति वसन्तावतारसर्वस्वभूतः किं न च्यूतप्रसवोऽवतंसनीयः।
मालविका. ३.

७ सांकृत्यायनी— अंक ३

७ परिव्राजिका— मालविका.

८ व्यक्तिर्व्यंजनधातुना दशविधेनाप्यत्र लब्धाधुना—इत्यादि. अंक ३

८ वामं संधिस्तिमितवलयं न्यस्य हस्तं नितम्बे इ. मालविका. २

९ ( वासवदत्ता सखेदमासनादुत्तिष्ठति )
राजा–किं मुक्तमासनमलं मयि सम्भ्रमेण नोत्थातुमित्थमुचितं मम तान्तमध्ये। अंक ३

९ ( शकुन्तलाभ्युत्थातुमिच्छति )
राजा–अलमलमायासेन।
संदष्टकुसुमशयनान्याशुक्लान्तबिसभंगसुरभीणि। गुरुपरितापानि न ते गात्राण्युपचारमर्हन्ति ॥ शा. ३

१० विदूषक–ईदृशेऽभ्युदयेऽस्मिन् राजकुले एतत्करणीयम्। गुरुपूजा। ब्राह्मणस्य सत्कारः। सर्वबन्धनमोक्ष इति। अंक ४

१० विदूषकः–दैवचिन्तकैर्विज्ञापितो राजा। सोपसर्गं वो नक्षत्रम्। सर्वबंधनमोक्षः क्रियतामिति।
मालविका. ४

११ आरण्यका–( कदलीगृहाभिमुखमवलोक्य ) हंजे इंदीवरिके, अतिशिशिरतया सलिलस्योरुस्तंभ इव समुत्पन्नः। तत् शनैर्गच्छावः।

११ शकुंतला–( राजानमवलोकयन्ती सव्याजं विलंब्य सहसखीभ्यां निष्क्रांता ) शा. १
राजा–दर्भांकुरेण चरणः क्षत इत्यकांडे तन्वी स्थिता कतिचिदेव पदानि गत्वा आसीद्विवृत्तवदना च विमोचयंती शाखासु वल्कलमसक्तमपि द्रुमाणाम् ॥ शा. २
उर्वशी–( उत्पतनभंगं रूपयित्वा ) अहो लताविटपे एषैकावली वैजयंतिका मे लग्ना। ( सव्याजमुपसृत्य राजानं पश्यंती ) सखि चित्रलेखे मोचय तावदेनाम्। विक्रमो. १

हीं कांहीं मुख्य मुख्य साम्यें वर दिलीं आहेत. परंतु यांच्याशिवाय बारीकसारीक समान कल्पना आणखीही कित्येक सांपडतील. या प्रियदर्शिका आणि कालिदास यांच्यामधील कल्पनासाम्याच्या प्रश्नाबद्दलचें टीकाकारांचें आतांपर्यंतचें प्रत्युत्तर असें होतें कीं, कालिदासामधून प्रियदर्शिकेच्या कर्त्यानें या कल्पना आपल्या नाटिकेमध्यें घातलेल्या आहेत. परंतु हें

समाधान आतां भासाचीं नाटकें उपलब्ध होऊन लोक वाचूं लागल्यानंतर समाधानकारक होऊं शकणार नाहीं. कारण, प्रियदर्शिकेच्या कर्त्यानें या कल्पना कालिदासामधून घेतलेल्या नसून उलट प्रियदर्शिकेच्या कर्त्याच्या प्रियदर्शिका या नाटिकेपासूनच कालिदासानें या उपरिनिर्दिष्ट कल्पना घेतलेल्या आहेत, अशी वस्तुस्थिति आहे. या लेखाच्या प्रारंभींच्या विवेचनावरून आपली अशी निःसंशय खात्री झालेली आहे कीं, प्रियदर्शिका हें नाटक भासानें लिहिलेलें असलें पाहिजे. आणि त्यानंतरच्या कालिदासासंबंधींच्या विवेचनावरून आपण असेंही पाहिलें आहे कीं, कालिदास हा भासाच्या नाटकांमधून पुष्कळ वेळां पुष्कळ कल्पना उचलून घेतो. त्याचप्रमाणें कालिदासानें प्रियदर्शिकेमधून वरील कल्पना उचलून घेतल्या असल्या पाहिजेत, हें निःसंशय होय. आणि या गोष्टीवरूनही फिरून आणखी एकदां हेंच सिद्ध होतें कीं, प्रियदर्शिका ही भासानेंच लिहिलेली असली पाहिजे. आणि हें जर खरें आहे, तर राजशेखराच्या कविविमर्शामधील प्रारंभीं दिलेलें अवतरण हें सत्य आणि साधार असलें पाहिजे, असें निष्पन्न होतें. आणि त्याचप्रमाणें 'श्रीहर्षादेर्बाणादीनामिव धनम्' हा पाठही निराधार असला पाहिजे, हेंही मग ओघानेंच प्राप्त होतें.

'चारुदत्त' हें मूळचें नाटक भासाचेंच असून त्याचें जसें 'मृच्छकटिक' हें नाटक बनविण्यांत येऊन तें शूद्रक राजाच्या नांवानें पुढें प्रसिद्धीस आणण्यांत आलेलें आहे, त्याचप्रमाणें प्रियदर्शिकेचीही गोष्ट झालेली असली पाहिजे. प्रियदर्शिका ही नाटिका हल्लीं श्रीहर्षराजाच्या नांवावर विकली जात आहे, आणि मृच्छकटिकामध्यें ज्याप्रमाणें भासाच्या नेहमींच्या पद्धतीहून भिन्न अशी लांबलचक नांदी, प्रस्तावना, वगैरे घालण्यांत आली आहे, तसाच प्रकार प्रियदर्शिका नाटिकेमध्येंही करण्यांत आलेला आहे. आतां प्रियदर्शिका नाटिकेच्या प्रस्तावनेचा असा एक विशेष आढळून येतो कीं, ह्या बहुतेक अक्षरशः एकाच प्रकारच्या प्रस्तावनेचें टोपण प्रियदर्शिकेप्रमाणें रत्नावलि आणि नागानंद या नाटकांच्याही मूळच्या टोकाला बसविण्यांत आलेलें आहे. तेव्हां आतां श्रीहर्षाच्या प्रस्तावनेचें हें टोपण प्रियदर्शिकेच्या मूळाकडील टोकावर चढविलेलें असूनही ती प्रियदर्शिका ज्याप्रमाणें श्रीहर्षानें लिहिलेली नसून दुसऱ्याच कोणी तरी लिहिलेली आहे

असें आढळून येतें, त्याचप्रमाणें या श्रीहर्षाच्या प्रस्तावनेचा शिक्का ज्या रत्नावलि आणि नागानंद या नाटकांवरही मारण्यांत आलेला आहे, तींहीं दोन्ही नाटकें श्रीहर्षाचीं नसून दुसऱ्या कोणाचीं तरी असलीं पाहिजेत, असें प्राप्त होतें. आणि प्रियदर्शिकेमधील कित्येक शब्द, कल्पना, वाक्यें आणि श्लोक रत्नावलि आणि नागानंद ह्या नाटकांतून आढळून येत असल्याकारणानें जर प्रियदर्शिका ही भासाची आहे, तर रत्नावलि, नागानंद, हीं नाटकेंही भासाचींच असलीं पाहिजेत, असें अगदीं ओघानें प्राप्त होतें. तरी पण त्या प्रत्येक नाटकाचा निरनिराळा विचार करून त्या त्या बद्दलचा हा सिद्धान्त अस्तिपक्षीं किंवा नास्तिपक्षीं निश्चित करणें, व त्या त्या नाटकांतील स्वतंत्र प्रमाणांच्या परीक्षणाच्या अंतीं जें कांहीं फलित होईल तेंच प्रतिपादन करणें, हें सोईचें आणि सरळ असल्याकारणानें फक्त प्रियदर्शिकेमधील अंतःप्रमाणांवरून जेवढें प्रमेय प्रस्थापित करतां येण्यासारखें होतें, तेवढ्याचेंच येथपर्यंत प्रतिपादन केलें आहे.

---

# २ नागानंद

—:०*०:—

आतां आपण नागानंद हें नाटक भासाचें आहे किंवा काय, या प्रश्नाचा विचार करूं. प्रियदर्शिकेप्रमाणेंच हें नाटक आजपर्यंत श्रीहर्षाच्या नांवावर विकत आलेलें आहे; परंतु तें खरोखर श्रीहर्षाचें आहे किंवा भासाचें आहे, ह्याच्याबद्दल त्या नाटकांतील अंतर्गत प्रमाणांवरून काय तो निर्णय ठरविला पाहिजे. नाटकाच्या प्रस्तावनेमध्यें कोणाचें तरी नांव घालून दिलें असलें, तरी तेवढ्यावरून तें नाटक त्या कवीला त्यांतील अनेक अंतर्गत प्रमाणें कधींही पचूं देत नाहींत. हीं अंतर्गत प्रमाणें जी हकीकत सांगत असतात, ती नेहमीं खरी असते. ह्या प्रमाणांनीं कोणाही धनिक राजापासून यत्किंचितही द्रव्य कधीं घेतलें नसल्याकारणानें त्यांना खोटें बोलण्याची कांहीं आवश्यकता नसते. त्यांचा पुरावा नेहमीं पायाशुद्ध आणि

विश्वसनीय असाच असतो. म्हणून या नागानंदाच्या बाबतींमध्यें तो काय व कशा प्रकारचा आहे, याचें आपण परीक्षण करूं.

प्रियदर्शिकेच्या कर्तृत्वाच्या विवेचनामध्यें ज्या स्वरूपाचीं प्रमाणें उपयोगांत आणण्यांत आलीं होतीं, तेंच स्वरूप नागानंदाच्या विवेचनांतील प्रमाणांचें असणार, हें उघडच आहे. म्हणून त्यांच्यासंबंधानें उपोद्धाता-दाखल आतां येथें निराळा ऊहापोह न करितां भासाचीं नाटकें आणि नागानंद नाटक यांच्यांतील समानकर्तृकत्वप्रतिपादनोपयोगी अशीं जीं कांहीं ठळक ठळक कल्पनादृश्यें बुद्धिगोचर होतात, त्यांचें आपण प्रथमतः निरीक्षण करूं.

## १ कन्यकादर्शन आणि शरदातप

कन्यकादर्शनाचें निर्दोषत्व आणि शरदातपाचें असह्यत्व, ह्या दोन कल्पना मूळच्या खुद्द भासाच्याच असल्याबद्दल प्रियदर्शिकेच्या विवेचनामध्यें दाखविण्यांत आलेलेंच आहे. त्या दोन्ही कल्पना नागानंदामध्येंही आलेल्या आढळून येतात.

नायकः—वयस्य कदाचिद् द्रष्टुमनर्होऽयं स्त्रीजनो भविष्यति । तदनेन तावत् तमालगुल्मकेनान्तरितौ देवतादर्शनावसरं प्रतिपालयावः ।
विदूषकः—भो वयस्य कन्यका खल्वेषा तत्किं न प्रेक्षवाहे ।
नायकः—को दोषः । कन्यका निर्दोषदर्शना भवन्ति ।

अंक १.

हा कन्यकादर्शनाच्या निर्दोषत्वाचा उल्लेख नागानंदामध्यें फक्त एकदांच आलेला आहे. परंतु शरदातपाच्या तीव्रतेचा उल्लेख नागानंदामध्यें दोन ठिकाणीं आढळतो.

( १ ) द्वितीयाः—हला मनोहारिके, आज्ञाप्तास्मि भर्तृदारिकया मलयवत्या । हंजे चतुरिके, कुसुमावचयपरिश्रमनिःसहं मे शरीरं शरदातपजनितोऽयं मे संतापोऽधिकतरं बाधते । तद्गच्छ त्वं बालकदलीदलपरिक्षिप्ते चंदनलतागृहे चंद्रमणिशिलातलं सज्जीकुरु इति ।

अंक २.

( २ ) विदूषकः—एषा खलु तमालवीथिका । एतच्छरत्संतापखेदितं भवत्या वदनं लक्ष्यते । तदिह स्फटिकशिलातल उपविशतु ।

अंक ३

## २ लतावृक्षांवरील प्रेम

कन्यकादर्शन आणि शरदातप ह्या संबंधींच्या भासाच्या ठराविक कल्पना नागानंदामध्यें आढळत असल्यामुळें नागानंद हें नाटक भासाचेंच असलें पाहिजे, असें वाटूं लागतें. व या कल्पनेला नागानंदाच्या पहिल्या अंकांतील आश्रमवर्णनाच्या प्रसंगींच्या " वासोर्थं दययेव नातिपृथवः कृत्तास्तरूणां त्वचः " या चरणानें जास्तच दृढता प्राप्त होते. मागें प्रियदर्शिकेच्या विवेचनामध्यें भासाच्या अभिषेक नाटकाच्या चवथ्या अंकांतील " यस्यां न प्रियमंडनापि महिषी देवस्य मन्दोदरी स्नेहाल्लुंपति पल्लवान् " हा श्लोक देण्यांत आलेलाच आहे. तेथें " पातुं न प्रथमं व्यवस्यति जलम् " इत्यादि शाकुंतल नाटकाच्या चवथ्या अंकांतील श्लोकाशीं या कल्पना भासामधून कशा घेतल्या आहेत हें दाखविण्याकरितां " यस्यां न प्रियमंडनापि " इत्यादि श्लोक उद्धृत केलेला होता. परंतु तेथें त्याचें फळ वरच्याप्रमाणें परंपरित नसून प्रत्यक्ष आहे. आपल्याला फार इच्छा असली, तरी देखील वृक्षादिकांबद्दलच्या स्नेहातिशयामुळें त्यांना इजा होईल म्हणून त्यांचीं पानें देखील तोडावयाचीं नाहींत, ही निर्जीवांच्या सजीवतेची आणि तन्मूलक दयार्द्रतेची सुंदर कल्पना मूळची भासाची असून ती त्याच्या अभिषेक नाटकामध्यें व्यक्त झालेली आहे. आणि तीच कल्पना " वासोर्थं दययैव " या श्लोकामध्यें दृग्गोचर होत आहे. यावरूनही नागानंदाच्या भासकर्तृकत्वाचाच येथेंही बोध उत्पन्न होतो.

## ३ गायन आणि वादन

नायकः—यथा कोमलांगुलितलाभिहन्यमाना नातिस्फुटं क्वणन्ति तन्त्र्यः काकलीप्रधानं च गीयते तथा तर्कयामि अस्मिन् देवतायतने देवतामाराधयन्ती काचिद् दिव्ययोषिदुपवीणयति ।

नागानंद नाटकाच्या पहिल्या अंकांतील हें वाक्य आहे. देवाल्यामध्यें गौरीच्यापुढें मलयवती वीणा वाजवून आणि गाऊन देवीची सेवा करीत आहे, हा देखावा प्रत्यक्ष दृष्टिगोचर होण्याच्यापूर्वी नुसत्या आवाजावरून धोरण बांधून जीमूतवाहन हा तर्क करीत आहे कीं, ही कोणी तरी स्त्रीच वीणा वाजवीत आणि गात असली पाहिजे. अगदीं असाच प्रसंग भासाच्या अविमारक नाटकामध्यें आलेला पूर्वी प्रियदर्शिकेच्या विवेचनामध्यें देण्यांत आलेला आहे. तेथेंही अविमारक रस्त्यानें चाललेला होता, आणि माडीवर कोणी पुरुष वीणा वाजवीत असून कोणी स्त्री गात होती. परंतु यांपैकीं अविमारकाला रस्त्यांतून कांहीं एक प्रकार प्रत्यक्ष दिसणें शक्य नसतांही केवळ पुरुषांच्या आणि स्त्रियांच्या वाजवण्यांतील व आवाजांतील भेदांच्या खुणांनीं आणि इतर परिणामांनीं अविमारकानें असें अनुमान बांधलें आहे कीं, हा पुरुषच वीणा वाजवीत असला पाहिजे, आणि हें गाणें कोणा तरी स्त्रीचेंच असलें पाहिजे. या अनुमानपद्धतीच्या सादृश्यावरूनही नागानंदाचें कर्तृत्व भासाकडेच ज्यास्त ज्यास्त जाऊं लागल्याचें दिसून येतें.

## ४ उद्बंधन

अविमारकांतील नायिका जी कुरंगी ती अविमारकाशीं पुन्हा आपला समागम होण्याच्या बाबतींत अगदीं निराश होऊन जाऊन आपल्या वस्त्रानें आपल्या गळयाला फास लावून घेण्याचा चवथ्या अंकामध्यें प्रयत्न करीत असतां नायक अविमारक हा तेथें येऊन तिला सोडवितो. ही उद्बंधनाची कल्पना मूळची भासाची असल्याचें अविमारकांतील या वर दिलेल्या प्रसंगावरून स्पष्ट होत आहे. आणि याच कल्पनेचा उपयोग नागानंदाच्या दुसऱ्या अंकामध्यें अगदीं तशाच प्रसंगीं करण्यांत आलेला आहे. यावरूनही अविमारकाचा आणि नागानंदाचा कर्ता एकच असला पाहिजे, असें प्राप्त होतें.

## ५ इतर किरकोळ प्रमाणें

या वर दिलेल्या प्रमाणांशिवाय नागानंदाचें कर्तृत्व भासाकडे ओढून

आणणारीं दुसरींही कित्येक विचारसादृश्यें विचारमार्गांमध्यें अवतीर्ण होतात. त्यांपैकीं कांहीं पुढें दिलीं आहेतः—

| भास | नागानंद |
|---|---|
| ( १ ) सव्ये करे समुपवेश्य मुखं सुदीनं कालं मनोभवसहायममृष्यमाणा । व्यग्रा विचिन्तयति किंचिदलोलदृष्टिर्बाष्पं निवारयितुमूर्ध्वमवेक्षमाणा ॥ अविमारक अंक ५. | ( १ ) शशिमणिशिला सेयं यस्यां विपाण्डुरमाननं करकिसलये कृत्वा वामे घनश्वासितोद्गमा । चिरयति मयि व्यक्ताकूता मनाक्स्फुरिताधरा नियमितमनोमन्युर्दृष्टा मया रुदती प्रिया ॥ अंक २. |
| ( २ ) धात्री–(चित्रफलकं दर्शयति) पद्मावती–आर्यपुत्र, सदृशी खल्वियमार्यायाः । राजा–न सदृशी । सैवेति मन्ये । स्वप्नवासवदत्त ६. | ( २ ) चेटी–( चित्राकृतिं नायिकां च निर्वर्ण्य ) भर्तृहारिके किं भणस्यहमिवालिखितेति । ईदृशमस्याः सादृश्यं येन न ज्ञायते किं तावन्मणिशिलायां भर्तृदारिकायाः प्रतिबिम्बं संक्रांतमुत त्वमालिखितेति । अंक २. |
| ( ३ ) विदूषकः–दास्याःपुत्रैर्मधुकरैः पीडितोस्मि । * स्वप्नवासवदत्त ४. | ( ३ ) विदूषकः–(भ्रमरबाधां नाटयन् ) अरे कस्मात्पुनरेते दुष्टमधुकरा मामेवाभिभवंति. अंक ३. |

* सुंदर नायिकांच्या मुखकमलांसभोंवतीं भ्रमर गुंजारव करीत फिरत असल्याचीं जीं वर्णनें शाकुंतल, प्रियदर्शिका, इत्यादिकांमधून आलेलीं आहेत, तीं कविसंप्रदायाच्या अनुरोधानें स्वाभाविक असल्याकारणानें त्यांचें सामान्यत्व निर्विवाद आहे. परंतु विदूषकासारख्याच्या अंगावर भ्रमरांनीं तुटून पडण्याचें वर्णन जर कोठें आलें, तर तें खरोखरच विशेष होय. आणि हा विशेष स्वप्नवासवदत्त आणि नागानंद या दोन्ही नाटकांमध्यें दृग्गोचर होत असल्यामुळें तो नागानंदाच्या भासकर्तृकत्वाकडेच बोट दाखवितो, हें उघड आहे.

| भास | नागानंद |
|---|---|
| ( ४ ) नारदः–निष्ठितो विहितो विवाहो ननु गांधर्वः स्वसमय एव । अविमारक ६. | ( ४ ) विदूषकः––भो भो निवृत्त इदानीं ते गांधर्वो विवाहः । अंक २. |

(५) दुर्योधनः–(गांधारीमुद्दिश्य) नमस्कृत्य वदामि त्वां यदि पुण्यं मया कृतम्। अन्यस्यामपि जात्यां मे त्वमेव जननी भव ॥ ऊरुभंग.

(५) शंखचूडः– समुत्पत्स्यामहे मातर्यस्यां यस्यां गतौ वयम्। तस्यां तस्यां प्रियसुते माता भूयास्त्वमेव नः। आणि

नायकः—संरक्षता पन्नगमद्य पुण्यं मयार्जितं यत्स्वशरीरदानात्। भवे भवे तेन ममैव भूयात्परोपकाराय शरीरलाभः।

† मृच्छकटिक नाटकाचे ५ ते १० हे अंकही भासाचेच असले पाहिजेत, असें पूर्वी एकदां दाखविण्यांत आलेलें आहे. त्या मृच्छकटिक नाटकाच्या ८ व्या अंकामध्यें वसंतसेनेच्या वधानंतर विट तिला उद्देशून पुढील श्लोक म्हणतो—

अन्यस्यामपि जातौ मा वेश्या भूस्त्वं हि सुंदरि।
चारित्र्यगुणसम्पन्ने जायेथा विमले कुले ॥

या श्लोकाचे वर दिलेल्या श्लोकांशीं शब्दसादृश्य आणि विचासादृश्य किती आहे, हें कोणाच्याही सहज लक्षांत येण्यासारखें आहे. व हा विटाचा श्लोक समग्र मृच्छकटिक भासाचेंच आहे हें ठरविण्याला आणखी एक कारण होतो, हेंही प्रमाणपटूंच्या लक्षांत येईल.

## ६ पादवंदन

भास हा प्रियदर्शिकेचा कर्ता असला पाहिजे हें जें (मृच्छकटिका-प्रमाणें) पूर्वी दाखविण्यात आलें, व नागानंदाचाही तोच कर्ता असला पाहिजे हें जें हल्लीं दाखविण्यांत येत आहे, तें मुख्यत्वेंकरून समान कल्पनांच्या प्रामाण्यावरच होय. परंतु इष्टप्रमेयाचें प्रामाण्य प्रस्थापित करण्याच्या या पद्धतीविरुद्ध कोणाला असेंही म्हणतां येईल कीं, हा समान कल्पनांचा पाया अगदीं पोकळ आहे. एकच कल्पना अगदीं भिन्न भिन्न माणसांना कधीं सुचणार नाहींत कीं काय? यावर उत्तर असें आहे कीं, एकच कल्पना भिन्न मनांना सुचणें अगदीं शक्य आहे, हें खरें. व वाङ्मयाच्या इतिहासांतून अशीं कांहीं उदाहरणेंही काढून दाखवितां येतील. इतकेंच नव्हे, तर ज्या भासाच्या अनेक नाटकांमधील एककर्तृत्व उद्घाटित

करण्याचा हा प्रयत्न करण्यांत येत आहे, त्या भासानेंही सादृश्यावरून ऐक्य प्रस्थापित करण्याच्या प्रसंगीं आपल्या कित्येक नाटकांतून असाच संशय समुत्थापित केलेला आहे. स्वप्नवासवदत्त या नाटकाच्या सहाव्या अंकामध्यें वासवदत्ता आणि तिची तसबीर यांच्यामध्यें सादृश्य दिसत असतांही त्यांच्यामधील ऐक्य अंगीकृत करण्याच्या पूर्वी राजा उदयन हा 'परस्परगता लोके दृश्यते रूपतुल्यता' असें म्हणून आपल्या मनाची संशयित वृत्ति व्यक्त करतो. तसेंच मृच्छकटिकाच्या नवव्या अंकामध्यें वसंतसेनेच्या अंगावरील दागिन्यांच्या सादृश्यासंबंधानें भासानें अधिकरणिकाच्या तोंडीं वरच्या सारख्याच अर्थाचा पुढील श्लोक घातलेला आहे.

वस्त्वन्तराणि सदृशानि भवन्ति नूनं रूपस्य भूषणगुणस्य च कृत्रिमस्य ।
दृष्ट्वा क्रियामनुकरोति हि शिल्पिवर्गः सादृश्यमेव कृतहस्ततया च दृष्टम् ॥

तेव्हां केवळ सादृश्यावरून नेहमींच ऐक्याचें अनुमान करणें बरोबर होणार नाहीं, हें अगदीं खरें आहे. परंतु प्रस्तुत लेखांतील सिद्धान्त ज्या सादृश्यांवर संस्थापित केलेले आहेत, तीं सादृश्यें अगदीं भिन्न प्रकारचीं आहेत. बहुधा सादृश्यें दोन प्रकारचीं असतात. एक सामान्य सादृश्यें आणि दुसरीं विशेष सादृश्यें. मुख हें कमलासारखें आहे, किंवा चंद्रासारखें आहे अशा प्रकारच्या सहज सुचणाऱ्या कल्पना हीं सामान्य सादृश्यांचीं उदाहरणें होत. असल्या कल्पना भिन्न भिन्न काव्यांतून कितीही वेळां आढळल्या, तरी त्यांच्यावरून त्यांमधील एककर्तृकत्व कोणाला कधींही प्रस्थापित करितां यावयाचें नाहीं. पण ज्या सादृश्यामध्यें अनन्यसाधारण असा कांहीं तरी विशेष असतो, त्या सादृश्याला हेतु करून त्यापासून जर समानकर्तृकत्वाचें अनुमान काढलें, तर तेंच अनुमान काय तें हेत्वाभासविरहित होऊन प्रामाण्यपदवीला पोंचूं शकेल. आणि याच नियमाला अनुसरून ज्यांत कांहीं विशेष आहे, अशींच सादृश्यें आतांपर्यंत अनुमानाकरितां उपयोगांत आणण्यांत आलेलीं आहेत. आणि अशांच्याच तोडीचें आणखी एक विशेषसादृश्य नागानंदामध्यें नयनगोचर होतें. तें असें कीं, तिसऱ्या अंकाच्या प्रारंभीं शेखरक विट हा दारूच्या धुंदीमध्यें रक्तवस्त्राचा बुरखा घेऊन चाललेल्या विदूषकालाच ही चेटी वनमालिका आहे असें समजून त्याच्या पायां पडत असतां तो विट पुढील श्लोक म्हणतोः—

हरिहरपितामहानामपि गर्वितो यो न जानाति नन्तुम् ।
स शेखरकश्चरणयोस्तव नवमालिके पतति ॥

आतां समग्र मृच्छकटिक हें भासाचेंच असलें पाहिजे, ही गोष्ट अगदीं सिद्धवत् झालेली आहे. त्या मृच्छकटिकाच्या आठव्या अंकामध्यें शकारही येथील शेखरक विटाप्रमाणें वसंतसेनेच्या पायां पडत असतांना तिनें त्याला लाथ मारल्यानंतर तो रागावून जाऊन पुढील श्लोक म्हणतोः—

यच्चुंबितमंबिकामातृकाभिर्गतं न देवानामपि यत्प्रणामम् ।
तत्पातितं पादतलेन मुण्डं वने शृगालेन यथा मृतांगम् ॥

येथें "गतं न देवानामपि यत्प्रणामम्" आणि "हरिहरपितामहानामपि गर्वितो यो न जानाति नन्तुम्" या दोहोंमधील कल्पना अगदीं अन्योन्यसदृश असून त्या सादृश्यामध्यें एक प्रकारचा विशेष आहे, हें कोणाच्याही लक्षांत येईल. तेव्हां ह्या विशेष सादृश्यावरून हें उघड होत आहे कीं, जर 'मृच्छकटिक' हें भासाचें आहे, तर नागानंद हेंही भासाचेंच असलें पाहिजे. पण ज्यांच्या मतें मृच्छकटिकाच्या भासकर्तृकत्वाबद्दल अद्यापि शंका असेल, त्यांच्याकरितां हीच विशेष कल्पना ज्यामध्यें आहे, असें भासाचें दुसरें एक निर्विवाद वाक्य आपण उद्धृत करूं.

त्वत्पादमात्रप्रणताग्रमौलिर्ज्वलंतमप्यग्निमचिन्तयित्वा ।
येनैव मानेन समं प्रसूतस्तेनैव मानेन दिवं प्रयामि ॥

हा अभिमानानें ओथंबलेला उत्कृष्ट श्लोक ऊरुभंगनामक नाटकामध्यें धृतराष्ट्राशीं बोलणाऱ्या राजा दुर्योधनाच्या तोंडीं घालण्यांत आलेला आहे. यांतील कल्पना आणि वरच्या दोन श्लोकांतील कल्पना अगदीं एक आहे. आणि ऊरुभंग हें नाटक भासाचेंच आहे, याबद्दल शंका नाहीं. तेव्हां यावरून नागानंदांतील विटाच्या तोंडची कल्पनाही भासाचीच असली पाहिजे, हें उघड होतें; आणि त्याच्याचबरोबर मृच्छकटिकांतील शकाराची कल्पना हीही भासाचीच होय, हेंही पण स्पष्ट रीतीनें सिद्ध होतें.

## ७ मृच्छकटिकाची मदत

समग्र मृच्छकटिक हें भासाचें असल्याबद्दल आणखी प्रमाणांची आवश्यकता आहे, असें मुळींच नाहीं. तेव्हां आतां मृच्छकटिकामधील कांहीं विशिष्ट शब्द किंवा कल्पना जर नागानंदामध्यें आढळून आल्या, तर तें देखील— 'नागानंद हें भासानेंच केलेलें एक नाटक आहे,' असें ठरविण्याला– एक निःसंदेह साधन होईल, याबद्दल मतभेद होण्याला जागा नाहीं. म्हणून मृच्छकटिक आणि नागानंद यांच्यामधील कित्येक साम्यस्थळें येथें देण्यांत येत आहेत.

( १ ) कः श्रद्धास्यति भूतार्थं सर्वो मां तुलयिष्यति ।
शंकनीया हि लोकेऽस्मिन्निष्प्रतापा दरिद्रता ॥

इत्यादि कांहीं ठिकाणीं मृच्छकटिकामध्यें "तुलयिष्यति" या शब्दाचा एक विशेष प्रकारचा प्रयोग आढळून येतो; आणि अशाच प्रकारचा प्रयोग नागानंदाच्या दुसऱ्या अंकामध्यें नायिकेच्या तोंडीं " हंजे, मेदृशमाकारं प्रेक्ष्य कोपि मे हृदयं तुलयिष्यति । तदुत्तिष्ठ । अनेन रक्ताशोकपादपेनांतरिते प्रेक्षावहे क एष इति ।" या वाक्यामध्यें आलेला आहे. तसेंच मृ. अंक ८ 'अलंकृतभूषणे' ही कल्पना आणि नागानंद अंक ५ यांतील 'आभरणानामपि कृतशोभमेवैतदवस्थं पुत्रकस्य मे शरीरं कृतम्' ही कल्पना, यांत फार साम्य आहे. आणि नागानंदाच्या ३ ऱ्या अंकाच्या प्रारंभीं शेखरक विट, नवमालिका चेटी, विदूषक, वगैरेचा जो एक प्रवेश आहे, त्याचें मृच्छकटिकाच्या पहिल्या अंकांतील शकार, विट, विदूषक, वगैरेच्या प्रवेशाशीं पुष्कळ बाबतींत फार निकट साम्य आहे.

( २ ) मृच्छकटिकाच्या १० व्या अंकामध्यें "आघातमद्याहमनुप्रयामि" या ठिकाणीं वधस्थान या अर्थी जो 'आघात' हा शब्द आलेला आहे, तोच नागानंदाच्या चवथ्या अंकांतील नायकाच्या तोंडच्या "कदाचिदियमालोक्य सन्निकृष्टमाघातस्थानं स्त्रीस्वभावकातरतया प्राणान् जह्यात्" या वाक्यामध्यें त्याच अर्थी घातलेला आहे.

( ३ ) वध्यशिलेचा उल्लेख आणि रक्तवस्त्रांचा वधप्रसंगीचा उपयोग या गोष्टी मृच्छकटिकाच्या १० व्या अंकातल्याप्रमाणें नागानंदाच्या चवथ्या आणि पांचव्या अंकामध्येंही पुष्कळ वेळां आढळून येतात.

( ४ ) मृच्छकटिकाच्या आठव्या अंकामध्यें वसंतसेनेला मारण्यापूर्वी शकार कांहीं तरी निमित्तानें विटाला तेथून घालवूं पाहात असतां विट थोडेंसें गेल्यासारखें करून म्हणतो, "अथवा मयि गते नृशंसो हन्यादेनाम्। तदपवारितशरीरः पश्यामि तावदस्य चिकीर्षितम्।" आणि अगदीं हाच विचार नागानंदाच्या दुसऱ्या अंकामध्यें आलेला आहे. तेथें नायिका मलयवती ही आपल्या गळ्याला फांस लावून घेण्याची संधि सांपडण्याकरितां आपल्या चेटीला कांहीं तरी निमित्तानें दुसरीकडे पाठविण्याचा प्रयत्न करीत असतां, त्या प्रसंगीं चेटीच्या तोंडीं अगदीं हीच कल्पना घालण्यांत आलेली आहे.

> चेटी—( कतिचित् पदानि गत्वा स्वगतं ) अन्यादृशमस्या हृदयं प्रेक्षे। न तावदग्रे गमिष्यामि। इहैवापवारिता प्रेक्षे किमेषा प्रतिपद्यत इति।

हें मृच्छकटिकांतील शेवटलें सादृश्य इतकें निश्चयोत्पादक आहे कीं, त्यावरून ही कल्पना एकाच डोक्यांतून निघाली असली पाहिजे, याबद्दल मुळींच शंका उरत नाहीं. आणि मृच्छकटिकांतील हीही कल्पना जर भासाची आहे, तर नागानंदांतील ही कल्पनाही आणि तिच्याबरोबर नागानंद हें नाटकही भासाचेंच असलें पाहिजे, हें सांगितल्यावांचून सिद्ध होतें!

## आपस्तावत्

हीं आतांपर्यंत दिलेलीं सगळीं प्रमाणें खात्री पटण्यासारखीं आहेत, यांत शंका नाहीं. परंतु प्रियदर्शिकेच्या विवेचनामध्यें "आपस्तावत्"ची भासाची जी एक अचुक खूण बहुतेक नाटकांतून येणारी म्हणून दाखविण्यांत आलेली होती, ती या नागानंद नाटकामध्यें कोठें आहे काय, अशी आकांक्षा कोणाही चिकित्सक मनुष्याच्या मनामध्यें उत्पन्न होणें अगदीं साहजिक आहे. आणि ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे कीं, या आकांक्षे-

च्या प्रश्नाला अंशतः तरी अस्तिपक्षीं उत्तर देण्याला या नाटकामध्येंही थोडीशी जागा आहे. भासाच्या इतर नाटकांइतका "आपस्तावत्"चा स्पष्ट उल्लेख हल्लींच्या नागानंदाच्या प्रचलित पाठामध्यें नाहीं, हें खरें. परंतु हल्लीं ज्या स्वरूपामध्यें नागानंद नाटक आपणांपुढें आहे, त्याच स्वरूपामध्यें तें भासानें लिहिलें असेल, असें मानतां येत नाहीं. मध्यंतरींच्या कालगतींत त्याच्यामध्यें किती तरी बारीकसारीक फेरफार झालेले असतील. तरी पण एवढें खरें कीं, त्यांतील मुख्य मुख्य भाग बरेच अबाधित राहिलेले असले पाहिजेत, आणि तशा दृष्टीनें पाहतां भासाच्या इतर नाटकांतल्याप्रमाणें या नागानंद नाटकामध्येंही पाण्याची अपेक्षा उत्पन्न करणारा एक प्रसंग कायम आहे, यांत शंका नाहीं. नागानंदाच्या पांचव्या अंकाच्या शेवटीं नायक जीमूतवाहन हा अगदीं मरणोन्मुख झाला असतां तेथें अशा प्रकारचीं वाक्यें आहेतः—

नायकः—अहह परार्थसंपादनरसाक्षेपादेतावतीं वेलां न वेदिताः संप्रति तु मां बाधितुमारब्धा मर्मच्छेदिन्यो वेदनाः । ( मरणावस्थां नाटयति )

जीमूतकेतुः—( ससंभ्रमं ) वत्स वत्स किमेवं करोषि ।

वृद्धा—हा किं नु खल्वेष वदति । परित्रायध्वं परित्रायध्वं । एष खलु मे पुत्रको विपद्यते ।

नायिका—आर्यपुत्र मां परित्यज्य गमनं ते न युक्तम् ।

नायकः—( अंजलिं कर्तुमिच्छन् ) शंखचूड समानय मे हस्तौ ।

शंखचूडः—( तथा कुर्वन् ) कष्टमनाथीकृतं जगत् ।

नायकः—( किंचिन्दुमीलिताक्षः पितरौ पश्यन् ) तात अम्ब अयं मे पश्चिमः प्रणामः ।

भासाच्या अभिषेक व प्रतिमा या नाटकांतून वाली व दशरथ यांनीं आपल्या मरणसमयीं जसें पाणी मागितलें आहे, तसा पाणी मागण्याचा प्रसंग येथें नायकाच्या बाबतींत "( अंजलिं कर्तुमिच्छन् ) शंखचूड समानय मे हस्तौ ।" हें वाक्य उच्चारण्याच्या वेळीं खरोखर प्राप्त झालेला आहे. आणि आश्चर्याची व कर्मधर्मसंयोगाच्या योगायोगाची गोष्ट अशी कीं, याच ठिकाणीं "मे हस्तौ" यांच्याऐवजीं नागानंदाच्या कित्येक प्रतींमधून

"जलम्" असा पाठभेद आढळून येतो! (शिराळकर आणि कंपनी, पुणें, यांनीं १८९३ सालीं प्रसिद्ध केलेल्या नागानंद प्रतींतील पान ९९ मधील पाठभेद पहा.) आणि त्या पाठभेदाप्रमाणें वरील भाषण वाचावयाचें झालें, तर तें "नायकः—शंखचूड समानय जलम्!" असें वाचलें जाईल; व हाच खरा पाठ असला पाहिजे. परंतु भास अशा प्रसंगीं जलाचा उल्लेख करतो, या गोष्टीचें ज्ञान भासाच्या नाटकांबरोबरच मध्यंतरीं लुप्त होऊन गेलेलें असल्यामुळें येथें पाण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं असें पाहून आणि आधींचा 'अंजलि' आणि पुढील 'प्रणाम' हे शब्द पाहून कोणी तरी "जलम्" याच्या जागीं "मे हस्तौ" असा "समानय" या क्रियापदाशीं जुळणारा पाठ घालून दिला असला पाहिजे, आणि त्यामुळें 'जलाचा' खरा आणि खास भासाचा असा पाठ मागें पडला असावा, असेंच मानणें प्राप्त होतें. तो खरा पाठ आपण पूर्वस्थानापन्न केला म्हणजे भासाची "आपस्तावत्"ची जी बिनचूक खूण, तीही या नागानंद नाटकामध्यें सांपडते, असें म्हणण्याला हरकत नाहीं. आणि इतकें झालें म्हणजे नागानंदाचें भासविरचितत्व हें सर्व संशयांच्या अगदीं पार जाऊन बसतें, यांत संशय नाहीं.

## ९ कालिदासाचें प्रमाण

आतांपर्यंत वर दाखविलेल्या अनेक प्रमाणांनीं नागानंदाचें भासकृतकत्व जरी निखालसपणें सिद्ध होत आहे, तरी ज्या वेळीं एखादा नवीन सिद्धान्त स्थापित करावयाचा असतो, त्या वेळीं त्याच्या बळकटीसाठीं जितकीं अधिक प्रमाणें देतां येतील, तितकीं देणें आवश्यक आहे. या दृष्टीनें प्रियदर्शिकेच्या विवेचनाच्या वेळीं प्रियदर्शिका आणि कालिदास यांच्या तुलनेवरूनही जसें एक परंपरित प्रमाण पुढें मांडण्यांत आलेलें होतें, त्याचप्रमाणें या नागानंदाच्या बाबतींतही त्या प्रमाणाचा चांगला उपयोग करतां येण्यासारखा आहे. कालिदास हा भासामधून पुष्कळ कल्पना उचलून घेतो, असें पूर्वी दाखविण्यांत आलेलें आहे. तसेंच नागानंद हें नाटकही भासाचेंच असलें पाहिजे, हेंही येथपर्यंत स्वतंत्र प्रमाणांनीं सिद्ध करण्यांत आलेलें आहे. तेव्हां त्या भासकृत नागानंद नाटकांमधील पुष्कळ कल्पना जर कालिदासाच्या काव्यांमधून आपल्याला उपलब्ध होऊं लागल्या,

तर कालिदास हा भासाच्या नाटकांतून आपल्या कल्पना उचलून घेतो, या म्हणण्याला हें आणखी एक नवीन प्रत्यंतर मिळाल्या· सारखें होतें. आणि भासामधून आपल्या कल्पना उचलून घेणाऱ्या कालिदासाच्या काव्यांमधून जर नागानंदामधील पुष्कळ कल्पना आढळून येऊं लागल्या, तर त्यावरून नागानंद हें भासानेंच केलेलें एक नाटक असलें पाहिजे, असेंही फिरून निष्पन्न होतें. या प्रमाणप्रपंचावर अन्योन्याश्रयाचा दोष येईल, असें जर कदाचित् कोणाला वाटेल, तर तें बरोबर नाहीं. कां कीं, नागानंदाचें भासकृतकत्व हें निराळ्या स्वतंत्र प्रमाणांनीं आधीं पूर्णपणें प्रस्थापित होऊन गेलेलें आहे. तसें नसतें, आणि त्याचें भासकृतकत्व हें जर फक्त कालिदासाच्या कल्पनासाम्यावरूनच अनुमित करावयाचें असतें, तर मात्र अन्योन्याश्रयाच्या दोषाला येथें अवसर मिळाला असता. परंतु तशी वस्तुस्थिति येथें मुळींच नाहीं. आणि म्हणूनच या प्रमाणाला जरी प्रत्यक्ष प्रमाणाची नाहीं, तरी परंपरित प्रमाणाची किंमत देण्याला कोणताही प्रत्यवाय नाहीं, हें कोणाच्याही लक्षांत येईल. म्हणून 'द्विर्बद्धं सुबद्धं भवति' या न्यायानें अनेक प्रमाणांनीं पूर्वी सिद्ध झालेलें नागानंदाचें भासकर्तृकत्व आणखी पुन्हा या कालिदासाच्या कल्पनासाम्याच्या प्रमाणानेंही जास्त उद्भासित करण्याकरितां नागानंद आणि कालिदास यांच्यांतील कित्येक साम्यस्थलें यापुढें तुलनेसाठीं अवतीर्ण करण्यांत येत आहेत.

| नागानंद | कालिदास |
| --- | --- |
| अंक १<br>(१) **सूत्रधारः**-अस्मत्स्वामिना श्रीहर्षदेवेन अपूर्ववस्त्वलंकृतं विद्याधरजातके प्रतिनिबद्धं नागानंदं नाम नाटकं कृतमिति अस्माभिः श्रोत्रपरंपरया श्रुतं न तु प्रयोगतो दृष्टम् । तत्तस्यैव राज्ञो बहुमानादस्मासु चानुग्रहबुद्ध्या यथावत्प्रयोगेण त्वया नाटयितव्यम् । | (१) **सूत्रधारः**-प्रणयिषु वा दाक्षिण्यादथवा सद्वस्तुपुरुषबहुमानात् । शृणुत जना अवधानात्क्रियामिमां कालिदासस्य । विक्र. १ |

(२) विदूषकः—भो वयस्य एतत्खलु सविशेषघनस्निग्धपादपविशोभितं सुरभिहविर्गन्धगर्भितोद्दामधूमनिर्गममनुद्विग्नसुखनिषण्णशावकगणंतपोवनमिव लक्ष्यते ।

(२) कुल्यांभोभिः पवनचपलैः शाखिनो धौतमूला भिन्नो रागः किसलयरुचामाज्यधूमोद्गमेन । एते चार्वागुपवनभुवि च्छिन्नदर्भांकुरायां नष्टाशंका हरिणशिशवो मन्दमन्दं चरन्ति ॥ शा. १

(३) वासोऽर्थं दययेव नातिपृथवः कृत्तास्तरूणां त्वचः ।

(३) नादत्ते प्रियमंडनापि भवतां स्नेहेन या पल्लवम् । शा. ४

(४) तापसकुमारिकापूर्यमाणबालवृक्षालवालस्य प्रशांतरमणीयता तपोवनस्य ।

(४) अये एतास्तपस्विकन्यकाः स्वप्रमाणानुरूपैः सेचनघटैर्बालपादपेभ्यः पयो दातुमित एवाभिवर्तंते । शा. १

(५)नायिका-(ससाध्वसमुत्तिष्ठति)

नायकः—तनुरियं तरलायतलोचने श्वसितकंपितपीनघनस्तनि । श्रममलं तपसैव गता पुनः किमिति संभ्रमधारिणि खिद्यते ॥

(५) (शकुंतला अभ्युत्त्थातुमिच्छति)

राजा—अलमलमायासेन ।

संदष्टकुसुमशयनान्याशुक्लांतबिसभंगसुरभीणि । गुरुपरितापानि न ते गात्राण्युपचारमर्हंति ॥ शा. ३

(६) तापसः—चिरात्खलु युक्तकारी विधिःस्याद्यदि युगलमेतदन्योन्यानुरूपं घटयेत् ।

(६) शार्ङ्गरवः— समानयंस्तुल्यगुणं वधूवरं चिरस्य वाच्यं न गतः प्रजापतिः । शा. ५

(७) तापसः—वत्से अनुरूपभर्तृगामिनी भूयाः ।

(७) यद्यपि गांधर्वेण विवाहविधिना निर्वृत्तकल्याणा शकुंतलानुरूपभर्तृगामिनी संवृत्तेति निर्वृत्तं मे हृदयं तथाप्येतावत्चिंतनीयम् । शा. ४

(८) नायिका—एकतो गुरुवचनमन्यतो दयितदर्शनसुखानि । गमनागमनविमूढमद्यापि दोलायते मे हृदयम् ।

(८) राजा—इतस्तपस्विकार्यं । इतो गुरुजनाज्ञा ।... सत्यमाकुलीभूतोऽस्मि । कृत्ययोर्भिन्नदेशत्वाद्द्वैधीभवति मे मनः । शा. २

| | |
|---|---|
| अंक २ (९) परिमुक्तकुसुमबाण इव मकरध्वजो भर्तृदारिकया दृष्टः । | (९)मामियमभ्युपतिष्ठति देवी विनयादुपस्थिता प्रियया । विस्मृतहस्तकमल्या नरेंद्रलक्ष्म्या वसुमतीव ॥ मा. ५ |
| (१०) नायकः—कस्य वान्यस्यैतत् कथनीयम् । | (१०) शकुंतला—कस्य वान्यस्य कथयितव्यम् । शा. ३ |
| (११) न खलु न खलु मुग्धे साहसं कार्यमेतत् । अंक ३ | (११) न खलु न खलु बाणः संनिपात्योऽयमस्मिन् । शा. १ |
| (१२) नायिका—हंजे चतुरिके कथं मामेकाकिनीमुज्झित्वा गच्छसि । अंक ५ | (१२) शकुंतला—हला अशरणास्मि । अन्यतरा युवयोरागच्छतु । शा. ३ |
| (१३) स्वगृहोद्यानगतेऽपि स्निग्धे पापं विशंक्यते स्नेहात् । | (१३) अतिस्नेहः पापशंकी । शा. ४ |
| (१४) चूडामणिपतन. | (१४) संगमनीयमणिपतन. विक्र.५ |
| (१५) आवेदय ममात्मीयं पुत्रदुःखं सुदुःसहम् । मयि संक्रातमेतत्ते येन सह्यं भविष्यति ॥ | (१५) स्निग्धजनसंविभक्तं हि दुःखं सह्यवेदनं भवति । शा. ३ |
| (१६) अये कथमनभ्रा वृष्टिः । | (१६)अपमेघोदयं वर्षम् । कुमारसं६ |

नागानंद आणि कालिदास यांच्यामधील अन्योन्य औपम्याची जी हीं उपरिनिर्दिष्ट उदाहरणें आपल्यापुढें आलेलीं आहेत, त्यांवरून नागानंद हें भासकृतच असलें पाहिजे, हें ज्ञान कोणालाही स्पष्टपणें झाल्यावांचून रहात नाहीं.

प्रियदर्शिका आणि नागानंद यांच्यामधील आतांपर्यंतच्या विवेचनाचे मुद्दे बहुतेक एकसारखेच होते; परंतु नागानंदाच्यासंबंधांत एक अगदीं नवीन आणि स्वतंत्र गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. ती ही कीं, त्याच्या प्रारंभीं—

ध्यानव्याजमुपेत्य चिन्तयसि कामुन्मील्य चक्षुः क्षणं
पश्यानंगशरातुरं जनमिमं त्रातापि नो रक्षसि ।
मिथ्याकारुणिकोऽसि निर्घृणतरस्त्वत्तः कुतोऽन्यः पुमान्
सेर्ष्यं मारवधूभिरित्यभिहितो बुद्धो जिनः पातु वः ॥

हा जो नांदीचा म्हणून श्लोक आलेला आहे, तो पंचतंत्रापैकीं पांचव्या तंत्रामध्यें उपयोगांत आणण्यांत आलेला आहे. पंचतंत्र हा ग्रंथ ख्रिस्ती शकानंतरच्या सहाव्या शतकामध्यें झालेला असला पाहिजे, असें मानण्यांत येतें. आणि श्रीहर्षाचें म्हणून मानलें गेलेलें नागानंद हें सातव्या शतकांतील होय, असें मानण्यांत आलेलें आहे. व म्हणूनच सातव्या शतकांतील नागानंदाच्या नांदीचा श्लोक सहाव्या शतकांतील पंचतंत्रामध्यें कसा जावा, हा एक मोठा अडचणीचा प्रश्न असल्याबद्दल कै. का. त्रि. तेलंग यांनीं आपल्या भर्तृहरीच्या प्रस्तावनेमध्यें उल्लेख केलेला आहे. परंतु आतां भासाच्या नाटकांच्या प्रसिद्धीमुळें नागानंदासंबंधानें जीं अनुमानें काढतां येतात, त्यांवरून पाहिलें असतां वरील सर्व अडचण दूर होते; कारण, आतां नागानंद हें श्रीहर्षाचें नसून भासाचें आहे, असें सिद्ध होत असल्याकारणानें पंचतंत्राच्या पूर्वीं होऊन गेलेल्या भासाच्या नाटकांतील 'ध्यानव्याजमुपेत्य' हा श्लोक पंचतंत्रामध्यें येण्याला कांहीं अडचण नाहीं. हा श्लोक शाङ्र्गधरपद्धतीमध्यें हरगणाचा म्हणून दिलेला आहे. परंतु असल्या स्फुट श्लोकांच्या संग्रहांमधून जीं कर्त्यांचीं म्हणून नांवें त्यांच्या श्लोकांच्या पुढें दिलेलीं असतात, तीं पुष्कळ वेळां बरोबर असतात, असें नाहीं. अशी किती तरी उदाहरणें आहेत. परंतु तेवढ्यामुळें कोणाला बरोबर खात्री पटत नसेल, तर आणखीही एक उदाहरण देतां येण्यासारखें आहे. कै. तेलंग यांनीं 'ध्यानव्याजमुपेत्य' या एकाच श्लोकाचा वर सांगितल्याप्रमाणें उल्लेख केलेला आहे; परंतु नागानंदांतील आणखीही एक आर्या अशाच रीतीनें पंचतंत्रापैकीं दुसऱ्या तंत्रामध्यें उद्धृत केलेली आढळून येते. चित्रांग या नांवाचा मृग अरण्यांत गेल्यानंतर तो पुष्कळ वेळ परत आला नाहीं, म्हणून त्याच्या आप्त इष्ट मंडळींच्या मनामध्यें अनेक शंका उत्पन्न होऊं लागल्या असतां 'अथवा साध्विदमुच्यते' या अवतरणानें नागानंदाच्या पांचव्या अंकाच्या प्रारंभींची--

स्वगृहोद्यानगतेपि स्निग्धे पापं विशंक्यते स्नेहात् ।
किमु दृष्टबह्वपायप्रतिभयकांतारमध्यस्थे ॥

ही आर्या पंचतंत्रांत उपयोगांत आणलेली आहे. यावरूनही सातव्या शतकांतील श्रीहर्षाचें नागानंद हें नाटक असणें अशक्य आहे, हें कोणालाही कबूल करणें भाग पडेल.

या गोष्टीवरून आणि वर दिलेल्या दुसऱ्या अनेक प्रमाणांवरून नागानंद हें नाटक भासाचेंच असलें पाहिजे, असें उघड रीतीनें सिद्ध होतें.

---